# माझे दोन शब्द

'अनुग्रह' वाचकां हातीं देण्यास मला एक प्रकारचें समाधान होत आहे. कै. गु. गंगाधरराव देशपांडे यांनीं एकंदर सत्तेचाळीस वर्षांच्या त्यांच्या व माझ्या सहवासांत मला पाठविलेल्या पत्रांपैकीं कांहीं निवडक पत्रांचा हा संग्रह किंवा जुडा आहे. वास्तविक मला पत्रें लिहिण्याची संधीच गंगाधररावांना विशेष मिळण्यासारखी नव्हती. कारण आम्ही मिळूनच रहात होतों. केवळ बाहेरच नव्हे तर तुरुंगांत देखील आम्हास मिळून रहाण्यास अनेकदां मिळालें. हिंडलगा आणि नाशिक या दोन्ही तुरुंगांत आम्ही मिळूनच होतों. नामवंत, अखिल भारतीय कीर्तीच्या पुढाऱ्यांच्या बरोबर त्यांचाच कोणीतरी जवळचा व माहितगार मनुष्य ठेविलेला बरा, असें ब्रिटिश सरकारचें धोरण त्यावेळीं असल्यामुळेंच, मला ही संधी तुरुंगांतहि मिळूं शकली. गांधीजींच्या बरोबर त्यांचे सेक्रेटरी महादेवभाई देसाई किंवा प्यारेलालजी यांना तुरुंगांत सोबती म्हणून ठेवीत असत कीं नाहीं? ४७ वर्षांच्या सहवासामध्यें गंगाधररावांनीं सुमारें चारशें पत्रें मला लिहिलेलीं आहेत. त्यानीं मला एखादा छोटासा चिटोरा जरी लिहिला तरी तोहि मीं श्रद्धापूर्वक जपून ठेविलेला आहे. त्यांच्या या चारशें पत्रांपैकीं निवडक १९४ पत्रें मी या 'अनुग्रहा'मध्यें घेतलेलीं आहेत. माझ्यासारख्या सामान्य मनुष्याला त्यांनीं हीं इतकीं अशीं पत्रें लिहिणें, हा त्यांचा माझ्यावर एक प्रकारचा 'अनुग्रह'च होय.

वर्षानुवर्षे चोवीस तास सतत एकत्रित राहणाऱ्या दोन व्यक्तींमध्यें रुसण्याचें-समजावण्याचें, रागालोभाचें, गरमनरम असे अनेक प्रसंग येणें स्वाभाविक तसेंच अपरिहार्यहि आहे. त्यायोगें प्रेमाची व लोभाची वृद्धि होते, एकमेकांचे स्वभाव एकमेकांना अधिक स्पष्ट होतात आणि एकमेकांच्या गुणदोषांचें दर्शन अधिक जवळून घडूं शकतें. 'अनेक आशीर्वाद' पासून 'कृ. सा. न. वि वि.' किंवा 'कृतानेक साष्टांग नमस्कार विनंति विशेष' असे पत्रांतील मायन्यांचे हेलकावे घड्याळाच्या लंबकाप्रमाणें या टोकापासून त्या टोकापर्यंत येरझारा घालीत असलेले या पत्रांतून दिसून येतील. "शक्य असेल तितका लोभ ठेवावा" (पत्र नं. २६ पान नं. ४०), "एवढा गांधींचा लेख वाचल्यानें तुम्ही गांधींच्या वर्चस्वाखालीं जाणार नाहीं अशी मी खात्री देतों." (पत्र नं. १९ पान नं. ३५) असे पत्रांतील मजकुरामध्येंहि चढउतार किंवा आरोहअवरोह अथवा आपपर भाव आलेले आढळून येतील. या दुराव्यांत देखील आपुलकीच विशेषपणें व्यक्त होते ही गोष्ट निराळी. हें मी लिहीत असतांना आमच्या सहजीवनांतील अनेक प्रसंगांच्या आठवणी माझ्या मनांत गर्दी करीत आहेत; आणि त्यामुळें थोडा वेळ थांबल्यावांचून पुढील मजकूर लिहिणें जवळजवळ अशक्य होऊन बसलें आहे.

'अनुग्रह'मधील बहुतेक सर्व महत्त्वाच्या पत्रांपूर्वी त्या त्या ठिकाणीं त्या पत्रांची पार्श्वभूमि व प्रसंग मीं थोडक्यांत दिलेले आहेत. त्या सर्वांचा पुनरुच्चार येथें करुन जागा अडवीत नाही. हिंडलगा, विजापूर, येरवडा, या तीन तुरुंगातून त्यांनीं मला 'कशी तरी' पोचवलेलीं पत्रें, मी त्यांच्याशीं भांडून त्यांना सोडून कांहीं काळ दूर गेल्यानंतर त्यांनीं मला लिहिलेलीं पत्रें, मिरजेच्या 'रयतां'च्या सत्याग्रहाच्या चळवळीच्या वेळीं मला निर्भीड मार्गदर्शन करण्यासाठीं त्यांनीं लिहिलेलीं पत्रें, अखिल भारतीय अस्पृश्यता निवारण कमिटीचा चिटणीस या नात्यानें स्वामी आनंद याच्याबरोबर मी मुंबईस काम करीत असतांना त्यांनीं मला लिहिलेलीं पत्रें, बिहारमध्यें भूकंपाच्या आपत्तींत सांपडलेल्या लोकांच्या सेवेसाठीं मला डॉ. राजेंद्रबाबूजी (आजचे राष्ट्रपति) यांच्याकडे गांधीजींनीं गंगाधररावांच्या कडून मुद्दाम मागवून घेऊन पाठविलें होतें त्यावेळीं गंगाधररावांनीं मला लिहिलेलीं पत्रे, तुरुंगांतील दैनंदिनीमध्यें गंगाधररावांनीं माझ्याविषयीं लिहून ठेविलेल्या मजकुराचा उतारा आणि मी महात्माजींकडे असतांना मला त्यांनीं लिहिलेलीं सद्य पत्रें, विशेष महत्वाचीं आणि बोधप्रद आहेत.

देव-भक्त, पिता-पुत्र, गुरु-शिष्य, किंवा समान ध्येयाचे व समान पातळीवरील स्नेही यांच्यातील परस्पर संबंध किंवा नात्यापेक्षांहि अधिक जवळचा संबंध गंगाधररावांनीं माझ्याशीं राखलेला होता. शब्दांमध्यें मांडून तो विशद करण्याची कला माझ्यामध्यें नाहीं व मला त्याची आवश्यकताहि वाटत नाहीं. पण एवढी गोष्ट मात्र निर्विवाद आहे कीं, धनी-नोकर अथवा सेव्य-सेवक हा भाव आमच्या वागणुकीमध्यें कधींच नव्हता व तो येऊंहि दिलेला नाहीं. आणि याचमुळें त्यांनीं माझ्याच काय, पण कोणाच्याही व्यक्तिगत मतावर अंकुश चालविलेला नाहीं. एवढेंच नव्हे तर आपल्या मताप्रमाणें निर्भीडपणें पण विनयानें चालणाऱ्यांविषयीं त्यांना आदर वाटत असे. "पांडुआण्णा शिराळकर यांनीं तूं माझी सेवा करतो आहेस असें लिहिलें आहे. पण मला ती सेवा असें वाटत नाहीं. 'सेवा' अशी मला कल्पना असती तर ज्या गोष्टी तूं माझ्या संबंधानें केल्या आहेस किंवा करीत आहेस त्या मी तुला करूं दिल्या नसत्या. मी स्वतः केल्याप्रमाणेंच तूं केल्याचें वाटतें. (पान नं. १८)" "तुमच्याकडून कोणतीहि सेवा घेण्यास मला मुळींच संकोच वाटत नाहीं. (पान नं. १५९)" असें त्यांनीं मला अनेकदां लिहिलें आहे व सभाषणामध्यें ओघानें सांगितलेलें आहे. असो.

पत्र नं. ७६ मधील विनोद त्याची पूर्वपीठिका समजल्यावांचून वाचकांना गुदगुल्या करूं शकणार नाहीं. तुरुंगामधून, बाहेर बेळगावच्या सौ. रमाक्का याळगी यांना माझ्यासाठीं 'क्विनाइन' पाठविण्यासाठीं मी लिहीत असे. पण त्या क्विनाइनच्या गोळ्याचा अर्थ 'लाडू' असा समजावयाचा असे. माझ्या पत्राप्रमाणें मला या 'क्विनाइनच्या गोळ्या' तुरुंगांत वारंवार पोचवल्या जात असत. अशाच प्रकारच्या माझ्या एका

पत्राप्रमाणें सर्व 'व्यवस्था' करण्यांत आली होती. माझ्या पत्रांतील भाषेचा हा सांकेतिक अर्थ गंगाधररावांना माहीत नव्हता. अशा तऱ्हेचें माझें एक पत्र गंगाधररावांनीं पाहिलें व मला त्यांनीं आपण होऊन पत्र लिहिलें. त्यांत 'क्विनाइनच्या गोळ्या नाहींत. डॉ. याळगीकडे मिळतात काय तपास करीन. तोंपर्यंत दुसऱ्या गोळ्या आहेत त्या पाठवीत आहे,' (पा. नं. ८७) असें म्हटलें आहे. आमची सांकेतिक भाषा गंगाधररावांना माहीत नसल्यामुळें ही गंमत झाली होती. पुढें तुरुंगांत लाडूचा डबा मला पोहोचल्या नंतर, जेव्हां 'क्विनाइनच्या गोळ्या मला मिळाल्या' असें मी लिहिलेले उत्तरहि त्यांना समजलें त्यावेळीं त्यांनीं 'झालें ना! पुंडलीकला क्विनाइनच्या गोळ्या पोहोंचल्या ना!' असें उद्गार काढले. मला ते नेहमीं बोलण्याचालण्यामध्यें 'पुंडलीक' म्हणत असत आणि लिहिण्यामध्यें किंवा लोकांमध्यें एकवचनीं व अनेकवचनीं 'पुंडलीकजी' नांवानें संबोधीत असत. वरील उद्गार त्यांनीं काढले त्यावेळीं मर्मज्ञ मंडळीमध्यें हशा पिकला होता. पुढें माझी तुरुंगांतून सुटका झाल्यानंतर 'क्विनाइनच्या गोळ्यांचा उपयोग चांगला झालेला दिसतो. तूं तुरुंगांतून आतांच मुक्त होऊन आला आहेस असें तुला पाहून कोण म्हणेल!' असें ते मला म्हणाले. यावेळीं मी त्यांना आमची पत्रांतील सांकेतिक भाषा सांगितली. तेव्हां त्यांना कळून आलें कीं, आपल्या सरळ पत्रानें अनायासें विनोद कसा निर्माण झाला होता. त्यांना त्यावेळीं आलेलें हसूं माझ्या डोळ्यापुढें अद्यापि ताजेंच आहे.

पत्र नं. १३८ची भूमिका आणि तें पत्र त्यांच्या स्वभावावर विशेष प्रकाशझोत फेकणारें आहे. मी त्यांना लिहिलेल्या खोचक प्रश्नाला त्यांचें तें उत्तर आहे. त्या पत्राचा मायना व भाषा यांमध्यें क्रोधाची छटा आहे. जीवनाकडे पहाण्याची त्यांची दृष्टि आणि त्यांचीं जीवनमूल्यें यांचाहि अंदाज त्या पत्रावरुन लागतो. 'मला तुम्ही म्हणतां तशा प्रकारची निवृत्ति आलेली नाहीं व यावी असेंहि वाटत नाहीं. शरीर थकल्यामुळें मी निष्क्रिय झालों आहें. मनानें मी निष्क्रिय नाहीं व व्हावें असेंहि मला वाटत नाहीं. आपण म्हणतां तशा प्रकारची निवृत्ति माझ्या स्वभावाच्या विरुद्ध आहे. तेव्हां घर लवकर होत नाहीं याबद्दल वाईट वाटल्यास त्यांत अस्वाभाविक कांहींच नाहीं. पण तें वाईट वाटणें फार वेळ टिकलेंहि नाहीं. लवकर घर झाल्यास आयुष्यांतील कांहीं दिवस तेथें घालवावेत असें वाटतें, हें खरें आहे. आयुष्य संपल्यानंतर शरीर कोठें ही पडलें तरी त्यांत विशेष नाहीं, हें मी जाणतो. पण घरीं रहावें असें वाटल्यानें मात्र मी लंपट झालों आहें असें ठरत नाहीं. लंपटपणा पदरांत न घेतां स्वाभाविक प्रवृत्ति निर्दोष असूं शकते. (पान नं १३९ व १४०); या उताऱ्यावरुन मी वर केलेल्या विधानांची सत्यता प्रत्ययास येईल.

गंगाधररावांचे जिवलग स्नेही श्री. दा. वि. अर्थात् बाबुराव गोखले यांना गंगाधररावांनीं तुरुंगाच्या उंबरठ्यांतून लिहिलेलें पत्र, श्री जीवनराव याळगी यांचें गंगाधररावांना पत्र व त्याला गंगाधररावांनीं लिहिलेलें उत्तर, श्री. काकासाहेब कालेलकर

यांचीं दोन पत्रें, श्री. किशोरलालजी मश्रुवाला यांना गंगाधररावांनीं लिहिलेलें पत्र, या महत्त्वाच्या पत्रांना देखील या 'अनुग्रह' पत्रसंग्रहांत मुद्दाम अंतर्भूत केलें आहे. कै. ती. गंगाधररावांच्या रहाणी-करणी-विचारसरणीवर या पत्रांच्या द्वारां अधिक प्रकाश पडत असल्यामुळें मीं तीं पत्रें येथें उद्धृत केलीं आहेत.

पत्रावर नंबर घालतांना १७६ नंबर घालण्याचें राहून गेलें आहे. हें सहज ध्यानांत येण्यासारखें आहे.

या 'अनुग्रहा'च्या शेवटीं पांच परिशिष्टें जोडलेलीं आहेत; कै. सरदार वल्लभभाई पटेल यांच्या निधनानें गंगाधररावांना किती दुःख झालें होतें याची कल्पना परिशिष्ट नं. १ मधील मजकुरावरून कोणासही येण्यासारखी आहे. परिशिष्ट नं. २ मध्यें महान योगी बाबू अरविंद घोष यांचें अस्सल 'राजकीय मृत्युपत्र' दिलेलें असून, तें अनेक दृष्टींनीं महत्वाचें आहे. त्याचें मराठी भाषांतर ही मुद्दाम दिलेलें आहे. परिशिष्ट नं. ३ मध्यें 'कर्नाटकसिंहाचे अखेरचे क्षण' अर्थात् त्यांच्याशीं झालेला संवाद दिलेला आहे. परिशिष्ट नं. ४ दुसऱ्या एका दृष्टीनें अत्यंत महत्त्वाचें आहे. भारताला मिळालेलें स्वातंत्र्य 'याच देहीं याच डोळां' पहाण्याचें सुख अनुभवीत असतांना, गंगाधररावांच्या मनांत काय शिजत होतें, हें त्यांनीं आपले पणतू श्री. नानासाहेब देशपांडे यांना पाठविलेल्या पत्रानें कळून येतें. ते म्हणतात कीं,

> "या आनंदाच्या प्रसंगीं, आपल्या पवित्र देशाचे तुकडे झाले, त्यामुळें आमच्या आनंदांत दुःखाचें मिश्रण झालें आहे. **या दुःखाचें परीमार्जन करून आपला देश पुनः अखंड करणें, हें या पुढील कार्य आहे. या कार्याचा भार तरुण पिढीनें उचलला पाहिजे.**"

आणि शेवटीं परिशिष्ट ५ मध्यें अबोटाबादहून गांधीजींनीं गंगाधररावांना लिहिलेलें पत्र दिलें आहे. हीं सर्व परिशिष्टें स्वतःच बोलकीं असल्यामुळें त्यांच्याविषयीं मी येथें यापेक्षां अधिक कांहीं लिहिण्याची आवश्यकता नाहीं.

'मौज प्रिंटिंग ब्यूरो'चे मालक श्री. भागवतबंधू यांनीं हें पुस्तक केवळ एका पंधरवड्याच्या आंत छापून दिल्याबद्दल मी त्यांचा आभारी व खरोखरच ऋणी आहें. या 'अनुग्रहां'त प्रसिद्ध होणाऱ्या सर्व पत्रांची छापखान्यासाठीं प्रत लिहून काढण्याचें काम, आमचे मित्र व 'श्रीअंबाबाई तालीम संस्थे'चे एक आधारस्तंभ श्री. रामचंद्र चिंतामण अर्थात् भाऊराव आपटे यांनीं मोठ्या आपुलकीनें सत्वर करून दिलें. याबद्दल त्यांचा मी अत्यंत आभारी आहे. 'अनुग्रहां'तील नांवांची सूची तयार करण्यास, 'आसेतुहिमाचल' व 'श्रीवेणीरामायण' या पुस्तकांचे लेखक, कवि विनायक गोविंद साठये यांनीं जी मदत केली त्याबद्दल त्यांचे आभार मानावेत तेवढे थोडेच आहेत.

त्यांच्या साह्याशिवाय हें काम हातावेगळें होण्यास आणखी कालावधि लागला असता यांत शंका नाहीं. माझे मित्र चि. कृष्णाजी बाबुराव मराठे यांनीं संबंध 'अनुग्रह' बारकाईनें वाचून 'शुद्धिपत्र' तयार करून दिलें, याबद्दल त्यांचा ही मी आभारी आहे.

आपल्या कार्यबाहुल्यामधून मुद्दाम वेळांत वेळ काढून, महाराष्ट्रांतील एक थोर विचारक श्रीयुत रावसाहेब पु. ह. पटवर्धन यांनीं या पत्रसंग्रहाला हार्दिक, सुंदर, व जिव्हाळ्याची प्रस्तावना वेळेवर लिहून दिल्याबद्दल मी त्यांचा आभारी व ऋणी आहे.

प्रजासत्ताक दिन
२६ जानेवारी १९६२

पुंडलीकजी कातगडे

## हार्दिक आभार

'अनुग्रह' अर्थात् कै. गु. गंगाधरराव देशपांडे यांच्या निवडक पत्रांच्या
संग्रहाचीं हस्तलिखितें तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी व प्रा. न. र.
फाटक यांनीं मुद्दाम सवड काढून वाचून पाहिलीं व संतोष
व्यक्त केला त्याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहे.
आणि 'महाराष्ट्र-राज्य साहित्य व संस्कृति
मंडळा'नें हा पत्रसंग्रह पुरस्कृत
केल्याबद्दल मी मंडळाचा
अत्यंत आभारी व
ऋणी आहे.

*पुंडलीकजी कातगडे*

# प्रस्तावना

कै. श्री. गंगाधरराव देशपांडे यांनीं श्री. पुंडलीकजी कातगडे यांना लिहिलेल्या खाजगी पत्रांचा हा एक संग्रह आहे. पिता-पुत्र, गुरु-शिष्य, नेता-अनुयायी, स्नेही-सल्लागार, विश्वस्त सेवक व सहकारी असें गंगाधरराव व पुंडलीकजी यांचें जिव्हाळ्याचें नातें आहे. पुंडलीकजींची गुरुभक्ति त्यांच्या नांवाला साजेल अशी अभिजात आहे. गंगाधररावांचीं त्यांना आलेलीं पत्रें हा पुंडलीकजींच्या जवळ असलेला अमोल ठेवा आहे. पण पुंडलीकजींनीं आपलें सारें जीवन समाजसेवेला अर्पण केलें असल्यामुळें, हा बहुमोल ठेवा स्वतःसाठीं ते कसा ठेवणार ? या संग्रहाला औपचारिक प्रस्तावनेची मुळींच आवश्यकता नाहीं. पण पुंडलीकजींचा शब्द मोडवेना म्हणून प्रस्तावने दाखल चार शब्द लिहिण्याचें मीं कबूल केलें. श्री. गंगाधररावजींचा व माझा अनेक वर्षांचा ऋणानुबंध असल्यामुळें, या निमित्तानें त्यांच्या थोर व्यक्तिमत्वाची आठवण ताजी झाली, हा माझा लहानसहान फायदा नाहीं.

पुंडलीकजी व गंगाधरराव यांच्यामध्यें जो जिव्हाळा होता तसा सार्वजनिक कार्य करणारांमध्यें विरळा आढळतो. लो. टिळक, ना. गोखले, डॉ. बेझंट, किंवा म. गांधी अशा लोकोत्तर विभूति भोंवतीं अनेक निष्ठावंत अनुयायी जमतात. पण त्यांचा त्या विभूतींच्या दैनंदिन जीवनांत विशेष संबंध येत नाहीं. या थोर नेत्यांनीं आरंभिलेल्या अनेक कार्यांत ही मंडळी श्रद्धेनें सहभागी होतात. अशा विभूतींच्या समीप राहून कार्य करण्याची संधी फार थोड्यांना मिळते. इंग्रजींत अशी एक म्हण आहे कीं, खाजगी सेवा करणाराला आपल्या सेव्य नायकाबद्दल खरा गौरव किंवा आदरभाव कधींच असूं शकत नाहीं. (No one is a hero to his valet.) पराक्रम व कीर्ति ही शौर्याची व कर्तबगारीची खूण असली तरी मनाच्या थोरपणाची किंवा निरहंकार वृत्तीची त्यावरून परीक्षा होत नाहीं. लो. टिळक, ना. गोखले, डॉ. बेझंट किंवा म. गांधी यांच्याबद्दल असें निश्चित सांगतां येईल कीं, त्यांचें शील इतकें आवाहकरी होतें कीं, त्यांच्या सान्निध्यांत येणाऱ्या प्रत्येक स्त्री-पुरुषावर त्याचा आपोआप संस्कार होई. पण इतर नेत्यांबद्दल असें हमखास सांगतां येणार नाहीं. राजकारणांत तर असें दिसतें कीं, आज जे उत्कट स्नेहभावनेनें एकत्र येतात ते उद्यां क्षुल्लक मतभेदावरून परस्परांचे वैरी बनतात.

आध्यात्मिक प्रेरणेमधून भारतीय संप्रदायांची आरंभीं मशागत झालेली आहे. लो. टिळक, ना. गोखले, डॉ. बेझंट व म. गांधी यांनीं शेंकडों स्त्री-पुरुषांना नवीन दृष्टि दिली. या थोर विभूतींच्या संस्कारामुळें हजारोंचीं मामुली जीवनें उजळून निघालीं.

दिव्यानें दिवा लावावा असें देशभक्तीचें मत घेतलेल्या साधारण स्त्री–पुरुषांचें जाळें देशभर पसरलें. देशभक्ति हा एक दैनंदिन आचार व जीवनदृष्टि बनली. श्री. पुंडलीकजी कातगडे हे या परंपरेंत वाढलेले देशसेवक आहेत. स्वातंत्र्य व स्वदेशीचा त्यांना निदिध्यास होता. 'चिंता करतों देशाची' अशी त्यांची वृत्ति आहे. स्वातंत्र्यप्राप्तीच्या महायज्ञांत आपली आहुति पडावी एवढीच त्यांची महत्त्वाकांक्षा होती. उच्च शिक्षण, मोठा तनखा, सुखाचा संसार, मानमरातब, या सर्वांकडे पाठ फिरवून, ही तरुण मंडळी वहिर्जी नाईकाप्रमाणें देशभर वणवण हिंडत. लब्धप्रतिष्ठित जग अशांना 'वेडेपीर' समजून त्यांची उपेक्षा करी. पण भारतीय राष्ट्रवादाचा पाया अशा अज्ञात 'वेडेपीरांनींच' घातलेला आहे. देशाच्या स्वातंत्र्यासाठीं धडपडणाऱ्या 'वेडेपीरां'च्या मालिकेपैकीं पुंडलीकजी हे एक आहेत.

पुंडलीकजींनीं आपल्या आत्मचरित्राचा पहिला खंड १९५० सालीं प्रसिद्ध केला आहे. त्या काळच्या परिस्थितीचें व तरुणांच्या अंतःकरणांत माजलेल्या अस्वस्थतेचें चित्र त्यांत पहावयास मिळेल. आपल्या आत्मचरित्रांत ते लिहितात कीं,

"मात्र 'नारायण' हें सुंदर नांव असूनहि ल्हानपणापासून 'पुंडगिरी' करीत असल्याचा आरोप माझ्यावर लादला गेला तेव्हां प्रथम मी 'पुंड' व नंतर 'पुंड्या' झालों. आणि पुंड्या हें नांव शाळेंतील गुरुजनांना चमत्कारिक वाटल्यामुळें त्यांनीं त्याचें 'पुंडलीक' बनवून मला 'द्विज' केलें. पुढें उत्तर हिंदुस्थानामध्यें महात्माजींच्या आज्ञेनुसार काम करीत असतांना त्या 'पुंडलीक'ला 'जी' लागून 'पुंडलीकजी' झालों."

शक्तीची उपासना करणारे, व रामदासांचा 'दासबोध' नित्य पठण करणारे ते एक स्वातंत्र्यसैनिक आहेत. मिरजेच्या "श्री अंबाबाई तालीम संस्थे'मध्यें प्रथम त्यांनीं सेवा व संघटनेचें काम केलें. राष्ट्रीय कीर्तनकार ह. भ. प. दत्तात्रय विनायक पटवर्धन यांनीं, श्री. दा. वि. तथा बाबुराव गोखले यांच्या साहाय्यानें, पुंडलीकजींना श्री. गंगाधरराव देशपांडे यांच्याकडे बेळगांवांत पोहोंचविलें. बॉंब तयार करण्याचें शिक्षण घेण्याच्या उद्देशानें पुंडलीकजी गंगाधररावांच्याकडे गेले; ही गोष्ट ऐकली कीं, आजहि हसूं येतें! त्यावेळची तरुण मंडळी किती भोळीभाबडी, भावनाप्रधान, व आर्त होती याची थोडी कल्पना त्यावरून येते!! बेळगांवला गंगाधररावांच्या घरीं बॉंब करण्याची विद्या त्यांना मिळाली नाहीं, तरी जीवनाला वळण लावणारा उदार, प्रेमळ, कर्तबगार, सल्लागार 'मित्र–नेता व पिता' त्यांना मिळाला. इंग्रजी साहित्यांत बॉसवेल व जॉनसन यांची जोडी जशी चिरकाल टिकली आहे, तशी पुंडलीकजी व गंगाधरराव देशपांडे यांची भारतीय राजकारणांतील गट्टी आहे. नेता व अनुयायी यांचा एक आदर्श या उभयतांनीं दाखविला आहे.

पुंडलीकजींचें उभें आयुष्य देशसेवेसाठीं धडपड करण्यांत गेलें आहे. कोणतीहि निवडणुक किंवा पद मिळविण्याचा हव्यास त्यांनीं केलेला नाहीं. अद्यापहि अज्ञात राहून वहिर्जी नाईकाप्रमाणें त्यांचा देशभर संचार असतो. गोव्यांतील लष्करी कारवाई-

पूर्वी 'भारत सेवक समाजा' मार्फत परवां गोव्याच्या सरहद्दीवर कार्यकर्त्यांचें एक शिबिर घेण्यांत आलें. त्या शिबिरांत आमचे पुंडलीकजी संचालक व मार्गदर्शक म्हणून हजर होते. त्यांच्या 'पुंडलीक' नांवाच्या आत्मचरित्राला लिहिलेल्या छोट्या प्रस्तावनेंत गंगाधरराव म्हणतात कीं,

"तथापि सन १९२० पासून १९४२ पर्यंत त्यांच्या वृत्तीमध्यें तितकीशी स्थिरता आलेली नव्हती. त्यांचा हूडपणा उफाळून येत असे व प्रयत्नानें तो मला दाबावा लागत असे. पण स. १९४२ च्या चळवळीनंतर त्यांना जे अनुभव आले व जो अभ्यास त्यांनीं केला त्याचा परिणाम होऊन ते आज पूर्ण अहिंसावादी झालें आहेत असें मला वाटतें.......हिंदी भाषेचा त्यांचा अभ्यास चांगला असून त्यांनीं 'हिंदी व्याकरण अथवा स्वराज्याच्या भाषेशीं परिचय', 'हिंदी-मराठी-कोश' वगैरे ग्रंथ प्रसिद्ध केले आहेत."

ते कानडी व मराठी दोन्ही भाषांमधून उत्तम वक्तृत्व करूं शकतात. चंपारण्यांतील सत्याग्रह, मिरजेंतील सावकारीविरुद्ध रयतांचा सत्याग्रह, बिहारमधील भूकंप, व स्वातंत्र्य आंदोलनांत झालेले सत्याग्रह-संग्राम, यांत पुंडलीकजींनीं मनोभावें सेवा बजावलेली आहे. राष्ट्राध्यक्ष डॉ. राजेंद्रप्रसादजी, सरदार वल्लभभाई पटेल, वगैरे नामवंत देशभक्तांबरोबर कार्य करण्याची त्यांना संधीं मिळाली आहे.

श्री. गंगाधररावांचें आत्मचरित्र छापून प्रसिद्ध झालें आहे, त्याचें श्रेय सर्वस्वीं पुंडलीकजींनाच दिलें पाहिजे. पुंडलीकजींची गुरुभक्ति अनन्य व अभिजात आहे. 'शिष्यादिच्छेत् पराजयम्' म्हणतात तसें पुंडलीकजींनीं करून दाखविलें आहे. लो. टिळक व म. गांधी अशा दोन लोकोत्तर विभूतींचा गंगाधररावांना अनुग्रह मिळाला होता. त्या दोन राष्ट्रनायकांचे, गंगाधरराव कर्नाटकमधील सुभेदार होते. गंगाधररावजींचें मूल्यमापन करतांना त्या काळांतील सामाजिक व राजकीय परिस्थितीचें चित्र डोळ्यापुढें ठेविलें पाहिजे. गंगाधररावजींचा निकट परिचय होण्याचें भाग्य मला लाभलें होतें. माझ्यावर व माझे बंधु अच्युतराव यांचेवर गंगाधररावजींनीं अलोट माया केली. आम्हांला त्यांनीं आपल्या स्नेहसागरांत व वात्सल्यांत अक्षरशः बुडवून टाकलें होतें. वयानें आमच्या वडिलांपेक्षांहि ते थोडे मोठे होते; पण आम्ही जणुं त्यांच्या बरोबरीचे आहों अशा समबुद्धीनें व स्नेहभावनेनें ते आम्हांला वागवीत. लहान मुलाला मांडीवर घेऊन पित्यानें आंजारा-गोंजारावें असें गंगाधरराव आमचें कौतुक करीत. मी इंग्रजी चौथ्या इयत्तेंत होतों त्यावेळीं. स. १९१६ साली नगरमध्यें बॅ. बॅप्टिस्टा यांच्या अध्यक्षतेखालीं मुंबई प्रांतिक परिषदेचें अधिवेशन झालें. गंगाधररावांचें भाषण प्रथम मीं त्यावेळीं ऐकलें. साऱ्या गांवांत लोक त्यांच्या जहाल व भावनाप्रधान भाषणाची कित्येक दिवस प्रशंसा करीत होते!

लोकप्रियतेमध्यें होणारे चढउतार गंगाधररावांनीं किती धीरोदात्त वृत्तीनें सहन केले हें पहाण्याची संधी मला मिळाली. कै. केशवराव गोखले आणि श्री. रंगराव

दिवाकर यांच्यासारख्यांकडून गंगाधररावांच्या बहुरंगी नेतृत्वांतील गुण-दोषांचें मूल्यमापन मला ऐकावयाला मिळालें! कर्नाटकसिंह म्हणून ज्यांची कीर्ति, त्यांना बेळगांव धारवाडमध्यें सार्वजनिक सभेंत भाषण करणें कांहीं काळ अशक्य झालें होतें! गंगाधररावांच्यामध्यें क्रांतिकारकांचा कणखरपणा व घरंदाज माणसाचा दिलदारपणा एकवटला होता. त्यांचें अंतःकरण 'मवाळ'च होतें. त्या पिढीतील लोकनायकांमध्यें अशी सहिष्णुता, औदार्य, गुणग्राहकता, व लोकसंग्रहवृत्ति क्वचितच कोठें दिसली असती. गंगाधररावजींच्यामुळें बेळगांवच्या याळगी कुटुंबीयांचा, श्री. दा. वि. तथा बाबुराव गोखले यांचा आम्हांला स्नेह लाभला. श्री. गोविंदराव याळगी यांच्या थोरवीच्या कित्येक कथा मीं ऐकल्या पण मी त्यांना कधीं पाहिलें नाहीं. श्री. जीवनराव याळगी व याळगी कुटुंबांतील इतर मंडळी गंगाधररावांना पितृतुल्य मानीत असत, व त्यांच्या सर्व कार्यांना जातीनें मदत करीत. गंगाधररावांचा एक दरबारच असे. काकासाहेब कालेलकर, स्वामी आनंद, आण्णासाहेब लठ्ठे अशा विविध स्वभावाची व वृत्तींचीं थोर माणसें त्यांना वडीलधारे, मित्र व सल्लागार मानीत, व त्यांच्या दरबारांत येत.

आपल्या देशांत पत्रें लिहिण्याची कला एकंदरीनेंच कमी. साहित्यिकांत देखील कोणी ढंगदार पत्रें लिहून तीं प्रसिद्ध केल्याचीं उदाहरणें नाहींत. पाश्चात्य देशांत मोठमोठे मुत्सद्दी, प्रशासक व राजकीय नेते यांचीं किंवा त्यांच्या निकटवर्ती आप्तेष्टांचीं पत्रें प्रसिद्ध केलीं जातात. प्रचलित घडामोडींचा संदर्भ समजण्याला अशा खाजगी पत्रांचा खूप उपयोग होतो. गंगाधररावांचीं जीं सुमारें १९४ पत्रें या 'अनुग्रह' संग्रहांत प्रसिद्ध झाली आहेत, त्यांवरून त्या काळच्या राजकीय नेत्यांची मनोभूमिका समजण्यास मदत होईल. कायदेभंग करून तुरुंगांत जाणें हें आतां सरोस झालें आहे; पण पहिले कांहीं दिवस तें एक मोठें दिव्य समजलें जाई. उदाहरणार्थ, या पत्रसंग्रहांतील पत्र नं. १० मध्यें गंगाधररावांनीं व्यक्त केलेले विचार ध्यानांत ठेवण्यासारखे आहेत. ते म्हणतात :

> "मला तुरुंगांत काम देतील याबद्दल तुला काळजी कां वाटावी? काम न देतील तर माझी तपश्चर्या पुरी झाली असें मला वाटणार नाहीं. या सरकारकडून कोणत्याहि प्रकारची मेहेरबानी करून घेण्याचा प्रसंग येऊं नये असें देवाजवळ मागणें आहे."

या संग्रहाच्या अखेरीस योगी अरविंदांनीं बॅ. बॅप्टिस्टांना स. १९२० सालीं लिहिलेलें एक पत्र दिलें आहे. तें अनेक दृष्टींनीं महत्त्वाचें आहे. तें हस्तगत करून या पत्रसंग्रहांत प्रसिद्ध करण्याचें पुंडलीकजींचें कौशल्य प्रशंसनीय आहे.

पुंडलीकजींची गुरुनिष्ठा व गंगाधररावांचें वात्सल्य कोणाहि सहृदय माणसास आदरणीय वाटावींत अशीं अव्वल दर्जाचीं आहेत. हा पत्रसंग्रह प्रसिद्ध करून पुंडलीकजींनीं गंगाधररावांच्या आत्मचरित्राला पुस्ती जोडली आहे. पुंडलीकजींची भारतभक्ति व सेवाकार्य असेंच अखंड चालू राहो.

महाशिवरात्र, ता. ३ मार्च १९६२ — पु. ह. पटवर्धन

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २ | १३ | थोडक्यांस | थोडक्यांत |
| ५ | ११ | ज्यास्ती | जास्ती |
| ११ | २१ | is do the same | is to do the same |
| १२ | ११ | वेळगाव | वेळगांव |
| २२ | १ | नदिल्यास | न दिल्यास |
| २२ | ९ | वगैर | वगैरे |
| ३२ | २ | पूरपर्यंत | विजापूरपर्यंत |
| ३३ | १९ | ऊफ | ऊर्फ |
| ५० | २१ | नेतत्त्वाखालीं | नेतृत्त्वाखालीं |
| ७५ | २० | त्मार्गांत | मार्गांत |
| ७६ | ७ | बामनराव | वामनराव |
| ७७ | ११ | नहीं | नाहीं |
| ८७ | २९ | वेंकटरामयाचें | वेंकटरामय्याचें |
| ११९ | १५ | आकत | आहेत. |
| १२२ | ५ | नासवें | नसावें |
| १२९ | २१ | प्रतापसिह | प्रतापसिंह |
| १३२ | १८ | सागलीच्या | सांगलीच्या |
| १३३ | २३ | आमत्रणावरून | आमंत्रणावरून |
| १३४ | २१ | बाधवल्यास | बांधवल्यास |
| १७६ | २५ | rublıng | rubbling |
| १८४ | २८ | यशवतराव | यशवंतराव |
| १९२ | २७ | दिवेकर वासुदेव कृष्ण | दिवेकर दि. वा. |
| १९३ | ९ | देशमूख डॉटर | देशमूख डॉक्टर |
| १९३ | १९ | कर्नाटक एक्सप्रेसचे | कर्नाटक एक्सप्रेस मोटार कंपनीचे |
| १९४ | १५ | कार्यकते | कार्यकर्ते |



ता–पुत्र, गुरु–शिष्य, नेता–अनुयायी, स्नेही–सल्लागार, विश्वस्त, सेवक व सहकारी असें
धरराव व पुंडलीकजी यांचें जिव्हाळ्याचें नातें आहे.'      — श्री. रावसाहेब पु. ह. पटवर्धन

[श्री. दा. वि. तथा बाबूराव गोखले यांना श्री. गंगाधरराव देशपांडे यांनी —श्री. गंगाधरराव स. १९२१ मध्यें अटक होऊन तुरुंगांत जातांना— लिहिलेलें पत्र.]

खाजगी श्री १९२१

सा. न. वि. वि.

चि. पुंडलीकजवळ पत्र दिलें आहे, तें वाचून Statement कशी द्यावयाची तें कळवावें. धोरण सांगितलें म्हणजे कचेरींत मी त्याप्रमाणें सांगेन. लेखीच दिली पाहिजे असें नाहीं.

परवां पुण्याहून येतांना वाटेंत तुम्हाला मी विचारलें कीं, तुमची व माझी ओळख होऊन १२ वर्षे झालीं. याला तुम्ही 'हो' म्हणून सांगितलें, व मला पुनः प्रश्न केलात कीं 'हें कां तुम्हाला आठवलें?' मी त्या वेळीं स्वस्थ बसलों, व तुमचा हात माझ्या हातांत घेतला. त्या वेळीं जे विचार माझ्या मनांत आले तेच तुम्हाला थोडक्यांत कळवितों. या बारा वर्षांत बऱ्याच उलाढाली झाल्या. निरनिराळ्या नात्यानें तुमचा व माझा संबंध आला. संकटकालीं व सुखाचे कालीं वगैरे निरनिराळ्या परिस्थितींतहि संबंध आला. पण अतिशय आनंदाची गोष्ट ही कीं, केव्हांहि प्रेमांत अंतर पडलें नाहीं. इतकेंच नव्हे तर मतभेद देखील फारसा झाल्याचें आठवत नाहीं. तुमची कर्तबगारी वगैरे पाहून एक प्रकारचें कौतुक व अभिमानहि मला वाटत असे. याबद्दल मी बाबासाहेबांजवळ व पुंडलीकजवळ देखील पुष्कळ वेळां व पुष्कळ प्रसंगीं बोललों आहें. पुष्कळ लोकांची अशी समजूत आहे कीं, केसरी ऑफिसांत तुमचा प्रवेश होण्याला मी कारण आहें. ही गोष्ट खरी नाहीं. फार झालें तर तुमच्या संबंधानें गुरुवर्य लोकमान्य जेव्हां गोष्ट काढीत असत, त्या वेळीं तुमच्या स्वभावाबद्दल व वागणुकीबद्दल मी दोनतीन वेळां बोललों असेन, व तुमच्यावर कोणत्याहि बाबतींत पूर्ण विश्वास ठेवण्यालायक तुम्ही आहांत असें सांगितलें असेन. पण यापेक्षां मी कांहीं केलें नाहीं.

तथापि लोक माझ्याविषयीं बाबुराव इतक्या लहान वयांत केसरी ऑफिसांत गेले ते तुमच्यामुळें गेले असें जेव्हां म्हणत, त्या वेळीं मी स्वस्थ बसत असें. याचें कारण तुम्हांला मी Patronage दिला म्हणून समाधान वाटत असे असें नाहीं, तर मला तुमच्याबद्दल एक प्रकारचा अभिमान वाटत असे व तुमच्या कर्तबगारीचें श्रेय मला देतात याबद्दल हसूं जरी येत असे तरी कौतुकानें स्वस्थ बसत असें. ही माझी चूक झाली असेल तर क्षमा करावी. खरोखर तुमच्याबद्दल मला फार आशा आहे. कार्यकर्ता कोणी दिसत नाहीं. तुमची स्तुति करावी म्हणून मी हें लिहीत नाहीं व तशा प्रसंगहि नाहीं. कदाचित् हें पत्र शेवटचें देखील होण्याचा संभव आहे. तेव्हां विनाकारण कांहीं तरी लिहीत नाहीं. मनाला जें वाटलें तें लिहिलें. तुम्ही जास्ती कर्तृत्ववान झालेले मी असेन त्या ठिकाणीं मला ऐकावयाला मिळावें अशी माझी इच्छा आहे. तुमच्याबद्दल इतका आपलेपणा वाटतो कीं, लोकमान्य गेल्यानंतर महाराष्ट्राचा व माझा संबंध कदाचित् तुटलाहि असता, पण तुमच्यामुळें तो राहिला, इतकेंच नव्हे, तर कांहीं बाबतींत तो वाढला हेंच त्याचें थोडक्यांत सार आहे.

कांहीं काळपर्यंत मी बेळगांवास नाहीं म्हणून बेळगांवचा संबंध कमी करूं नका. गोविंदराव, बाबासाहेब वगैरे आहेतच. त्यांचेबद्दल मी तुम्हाला सांगावें असें नाहीं. गोविंदरावांचा स्वभाव थोडा उतावळा आहे. वरचेवर त्याचेकडून हकीकतीचें पत्र आणवून त्यांना कामाची वगैरे दिशा लावून देण्याचें काम करा. मधूनमधून बेळगांवला भेट देत जा. बेळगांवचें घर बंद ठेवूं नका, असें मी माझ्या आईला लिहिलें आहे. ती असली तर जाऊन येत चला. रा. मजली, करगुप्पीकर मंडळी बरी आहेत, काम करणारी आहेत. त्यांचें व तुमचें सूत चांगलें जुळलें पाहिजे.

रा. नरसोपंत, अंतुकाका वगैरे मंडळींना नमस्कार सांगावा. माझी प्रकृति बरी आहे. मन शांत आहे. गुरुजींचें स्मरण नेहमीं होत असतें. त्यांच्या हयातींत हा प्रसाद मिळाला असता तर बरें झालें असतें. ते गेल्यानंतर एक वर्षाच्या मुदतीनें तो मिळत आहे, यांतहि कांहीं गैर नाहीं. माझ्या विश्रांतीचा उपयोग मी चांगला करीन, याबद्दल शंका बाळगूं नका; व बाहेर आल्यानंतर जास्त जोरानें कामाला लागेन अशी उमेद आहे. गेल्या चित्रमय जगतांत तुम्ही माझी स्तुति केली आहे, तितक्या स्तुतीला मी पात्र होऊन बाहेर येईन अशी आशा आहे. परमेश्वराची कृपा असेल तर तसें होईलहि. पुण्यास राहून 'एक काम' करण्यास सवड मिळाली यांत किती तरी समाधान होत आहे. तुम्ही व नरसोपंत नसतां तर तें राहून गेलें असतें. एकंदरींत सर्व प्रकारें आनंदरूप आहे. आईची काळजी वाटत होती. पण तिनें आजच एक पत्र लिहून काळजी दूर केली. पुंडलिकाचे वरचेवर समाचार घेत असावें. तो फार झपाट्यानें सुधारत आहे, व प्रगति दाखवीत आहे. कळावें ही विनंति.

गंगाधर देशपांडे

[१९२१ सालीं कै. ती. गंगाधरराव देशपांडे यांच्यावर १२४ अ प्रमाणें खटला भरला असतां, दोन महिनेपर्यंत धारवाडच्या तुरुंगांत ते 'अंडरट्रायल' कैदी म्हणून होते. रोज सकाळीं चहासाठीं, दोनप्रहरीं भोजन नेण्यासाठीं, तिसऱ्या प्रहरीं पुनः चहा पोहोंचविण्यासाठीं आणि सायंकाळीं पुनः जेवण पोहोंचविण्यासाठीं मी धारवाडच्या तुरुंगांत जात असें. त्यावेळीं मी वारंवार पत्र लिहून गंगाधररावांना माझे विचार, कल्पना व अपेक्षा कळवीत असें. आणि माझ्या पत्रांचीं उत्तरेंहि त्यांच्याकडून मिळत असत. पत्रांची ही सर्व देवघेव तुरुंगाच्या अधिकाऱ्यांना अर्थात् न कळूं देतां चोरूनच होत असे. गंगाधररावांना मी त्या वेळीं लिहिलेलीं पत्रें वाचून गंगाधररावांनीं अर्थात् तुरुंगांत फाडून टाकलेलीं आहेत. मीहि माझ्या त्यांना पाठविलेल्या पत्रांच्या नकला ठेविलेल्या नाहींत. पत्र नं. १ ते पत्र नं १८ पर्यंतचीं सर्व पत्रें अशा प्रकारें चोरून झालेल्या देवघेवींपैकीं आहेत. कै. ती. गंगाधररावांनीं मला लिहिलेल्या पत्रांपैकीं मी एकहि पत्र नाहींसें केलेलें नाहीं. —पुंडलीकजी ]

## पत्र नं. १

श्रीगजानन

चि. पुंडलीक बाळ ऊर्फ पुंड्या

आज कोर्टांत जी मंडळी बसली होती, त्यांच्या चेहऱ्याकडे मी पहात होतों. तुझ्या चेहऱ्याचेंहि निरीक्षण केलें. तुझ्या चेहऱ्यावरून तुझ्या अंतःकरणांत काय चाललें आहे हें स्पष्ट दिसत होतें. इतरांपैकीं कांहींच्या चेहऱ्यावरून त्यांच्या मनांतहि काय चाललें आहे हें समजण्यासारखें होतें. विशेष तपशील न लिहितां इतकें सांगतों कीं, *ज्यांच्याकरितां मी बाहेर यावें असें मला वाटत होतें*, अशी मंडळी बरीच कमी झाली. पुष्कळ मंडळींकरितां तसें वाटत असल्याकारणानें डोक्यावर भलें मोठें ओझें वाटत होतें, व तें कमी कसें करावें याचा पुष्कळ विचार करावा लागत असे; पण आजपासून तें ओझें आपोआप हलकें झालें, ही परमेश्वराची कृपा. माझ्या स्वतःबद्दल मला जितकी काळजी वाटते त्यापेक्षां जास्त, निदान तितकीच, कांहीं मंडळी-संबंधानें वाटत होती. पण आतां या मुद्दयाबद्दल मन जरी पूर्ण निश्चित झालें नाहीं तरी बरेंच समाधान वाटत आहे. तूं मात्र विनाकारण उतावीळ होऊं नकोस. आजच्या धोरणावरून शिक्षा होणार हें खास. *स्टेटमेंटच्या योगानें कांहीं निराळा प्रकार होईल* असें वाटत नाहीं. मग विनाकारण तुझ्या चेहऱ्यावर आशेची व उत्सुकतेची छटा कां दिसावी ? मला शिक्षा व्हावी व ती सहन करण्याचें सामर्थ्य माझ्या अंगीं यावें असाच

मनाचा दृढ संकल्प करून स्वस्थ रहा. तुझ्या संबंधानें मी, बाबुराव, बाबासाहेब, गोविंदराव वगैरे सर्व मंडळींना लिहून ठेविलें आहे. माझी इतकी गोष्ट ते चालवितील असा मला भरंवसा आहे. मी हें तुला सांगणार नव्हतों. पण सांगितलें झालें! दुसऱ्यांनीं तुला धीर दिला पाहिजे अशा प्रकारचा वेहिमती तूं आहेस असें मला वाटतें व म्हणून मीं त्यांना लिहिलें, असें मुळींच नाहीं. फक्त माझ्या मनाच्या समजुतीकरितां मीं लिहिलें आहे. तुझ्या एकंदर वागणुकीवरून तूं हें सहन करशील व पुन्हा तुझ्या देशसेवेंतहि अंतर पडूं देणार नाहींस अशी मला खात्री वाटते.

जॉइंट कॉन्फरन्सला जाण्याबद्दल कोणी खटपटहि केली नाहीं असें तूं लिहिलेलें मला कळलें. मला हें बाकीत माहीत होतें व त्याचीं कारणेंहि माहीत आहेत. म्हणूनच मी रा. मजलींना वगैरे कांहीं लिहूं नये असें म्हणत होतों, पण आपलें कर्तव्य करावें, परिणाम कांहींहि होवो. सर्व मंडळीची व्यवस्था चांगली ठेविली आहेस ना?

आणखी कांहीं सांगावयाचें नाहीं. सर्व सांगितलेंच आहे. तुला कांही सांगावयाचें असल्यास सांग. दुपारींच निकाल लागेल. परत आल्यानंतर काय व कसें करावयाचें याबद्दल आता विचार येऊं लागले आहेत व तेंच ठरविण्यांत मी पुढील वेळ घालवीन. व आल्यानंतर ते तुझ्या मदतीनें अंमलांत आणण्याचा प्रयत्न करीन. कळावें हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

ता. क. :—हें लिहून झाल्यानंतर रात्रीं झोपलों. झोप उत्तम लागली. गीतेंत विश्वरूपदर्शनाच्या योगानें ज्याप्रमाणें अर्जुनाची शंका निवारण झाली, त्याप्रमाणें कालचा कोर्टांतील देखावा वाटला. कालपासून ज्याप्रमाणें मन अगदीं निःशंक वाटतें तसें या महिन्यांत कधींच वाटलें नव्हतें. आता मला जन्मठेप झाली तरी मला कांहीं वाटणार नाहीं. इकडून मला नेल्यानंतर जेथें कोठें ठेवतील तेथें कोणीहि येऊं नका. मी आनंदांत राहीन. जिवालाच कांहीं अपाय वगैरे झाल्यास कळतच आहे. "देहिनोऽस्मिन् यथा देहे कौमारं यौवनं जरा" वगैरे श्लोक तुला माहीतच आहेत. परंतु मी बाहेर येईन असें वाटतें. कांहीं झालें तरी अगदीं शांत राहीन. याबद्दल बिल्कुल काळजी नको. हें पत्र ठेवण्याची जरुरी नाहीं.

## पत्र नं. २

श्री

चि. पुंडलीक यास आशीर्वाद. तूं माझ्याकडे येतोस त्या वेळीं तुझा चेहरा असा उतरलेला कां दिसतो! माझ्या नशिबीं भाग्य आलें आहे असें तुला वाटत नाहीं काय! पूर्वपुण्याईखेरीज देशभक्तीकरितां देहदंड भोगण्याचें नशिबीं येत नसतें हें तुला केव्हां कळणार! त्या आनंदांत मी आहें. तूंहि त्या आनंदांतच रहावेंस अशी माझी इच्छा आहे.

माझ्या घरच्या मंडळींना व विशेषेंकरून मातोश्रींना व चिरंजीव ताराकाला तसेंच वाटलें पाहिजे. माझें मन स्वस्थ आहे इतकेंच नव्हे तर एकप्रकारें एकांतवासाच्या व परमेश्वर-निष्ठेच्या आनंदांत मग्न होऊं लागलें आहे. त्यामुळें शरीर निरोगी आहे हें सांगण्याची आवश्यकताच नाही. माझ्या या जन्मीच्या (व पुढील जन्मींच्यामुद्धां) उन्नतीकरितां हा अनुभव जरूर पाहिजे होता, तो परमेश्वराच्या कृपेनें लाभला यांत वाईट काय आहे ? याला संकट म्हणण्याचा आमचा अधिकार नाहीं; व तुम्ही सर्वांनी तसेंच समजलें पाहिजे. मिळून अगर शरीरसुखाकरितां, मी धर्मापासून च्युत होईन कीं काय याची काळजी तुम्ही बाळगली पाहिजे; व परमेश्वराजवळ तसें होऊं न देण्याबद्दल सारखा धावा करीत बसलें पाहिजे. रा. गोविंदराव याळगी, बाबासाहेब सोमण, सर्वांस माझें हेंच सांगणें आहे. माझा वेळ आनंदांत जात असतो. घरीं सर्वांना धीर देत जा. काळजी करण्यासारखें कांहीं नाहीं. खटल्याचें कांहींहि होवो. ज्यास्ती कीर्ति व आनंद-रूपानें सर्वांच्या भेटी होतील अशी खात्री दे. तुला स्वतःला खर्चाला पाहिजे असल्यास गोविंदरावांना लिही, मीं त्यांना सांगून ठेविलें आहे, माझ्यासंबंधानें तुझ्या मनांत निष्ठा फार. म्हणून या प्रसंगीं देखील देवानें तुझी योजना करून माझी सेवा तुला घडत आहे. असो. सर्वच आनंदी आनंद.

माझ्यापेक्षां घरच्या मंडळीची जास्त काळजी घे. त्यांना हळुहळु जास्त उच्च पायरीवर नेण्याची खटपट कर. कर्मयोग्याचीं लक्षणें सांगून सरळ मार्ग दाखव. माझ्या सरक्षणापेक्षां हें कर्तव्य जास्त पवित्र आहे. तुझ्या मातापितरांची सेवा करण्याचा योग तुला घडला नाहीं म्हणून हा योग आला आहे. पुन्हा आणखी लिहीन. कळावें हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

ता. क. :—सर्व बरें आहे असें रोज घरीं सांगत जा.

## पत्र नं. २

श्री

चि. पुंडलीक

अनेक आशीर्वाद विशेष. कालच संध्याकाळीं मला वाटलें कीं, तुला कांहीं तरी लिहावें. म्हणून कालच मीं एक पत्र लिहिलें व तें सकाळीं दिलें त्या पत्रांत तुझ्या पत्राचें मीं उत्तर दिलें आहे. हा योगायोग विलक्षण आहे. मनाला मन साक्षी असतें म्हणतात तें यालाच.

माझ्या संबंधानें मला पाहून तुला जो अनुभव येत आहे, त्यापेक्षां निराळ्या प्रकारचा अनुभव बाबासाहेबांना आला आहे, असें त्यांच्या पत्रावरून समजतें. मी भ्यालों आहें व कसेंहि करून यांतून सुटका करून घेण्याच्या विवंचनेंत आहे असें

त्यांना, मला पाहून वाटलें. असें कां व्हावें समजत नाहीं. त्याचेंच बरोबर असेल का ! असें वाटून मी माझ्या आत्मनिरीक्षणाला प्रारंभ केला आहे. याचा परिणाम काय होतो तो कळवीन. माझ्याकडून शक्य तो प्रयत्न करून मी माझ्या मनाला दार्ढ्य आणण्याचा प्रयत्न करीत आहें. आणि या प्रयत्नांत सिद्धि मिळावी म्हणून परमेश्वराची प्रार्थना करीत आहें. दार्ढ्य आणण्याचा प्रयत्न करीत आहे याचा अर्थ दार्ढ्य नाहीं असा करावयाचा नाही; तर आहे तें दार्ढ्य जास्ती शुद्ध व सात्विक पायावर उभारलें जावें अशी इच्छा आहें. म्हणजेच तें कायमचें टिकतें. तुझ्या पत्रांत माझ्या कीर्तीसंबंधाचा मजकूर आहे. तो गौणपक्ष आहे. कीर्ति वाढो किंवा कमी होवो. देशाकरितां देहदंड भोगणें जरूर आहे, त्यातच आपला मोक्ष आहे आणि तूं म्हणतोस त्याप्रमाणें हें तप साध्य होण्याला तुरुंग हीच तपोभूमि आहे अशी उत्कट भावना अंतःकरणात पूर्णपणें रुजणें अत्यंत जरुरीचें आहे. तुरुंगांत जाण्यांत मोक्ष आहे असें नाही. पुष्कळ लोक तुरुंगांत जातात व जातीलहि, पण ज्या भावनेनें आम्ही या तुरुंगवासाचा अनुभव घेतों ती भावना प्रधान आहे. या दृष्टीनें माझी भावना दिवसेंदिवस शुद्ध होत चालली आहे. शिक्षेच्या दिवसापर्यंत ती बरीच निवळेल अशी आशा आहे. श्रीदासबोध व श्रीमत् भगवत् गीता आणि गुरुवर्य लोकमान्यांचें गीतारहस्य ही तयारी करण्याला समर्थ आहेत. माझ्यांत जे दोष आहेत ते घालविण्यासाठीं हा अनुभव जरूरच होता. मागें एकदां थोडासा अनुभव मिळाला होता. पण ती स्थिति व हल्लींची स्थिति यांत महदंतर आहे. दोन्ही अनुभवांची जेव्हां माझ्या मनाशीं मी तुलना करितो त्या वेळीं हल्लींच्या स्थितीबद्दल धन्यता व समाधान वाटत आहे. तरुणांना उद्देशून मी कांहीं तरी लिहावें असें तुला वाटतें. पण अद्यापि तो अधिकार माझा नाहीं. लोकमान्यांचें व म. गांधींचें चरित्र हा त्यांना आदर्श आहे. देशांतील हल्लींच्या तरुणांचें केवढें भाग्य ! अशा महाव्यक्ती देशांत वावरत असलेल्या त्यांना दिसाव्यात, त्यांचें स्मरण त्यांना ताजें असावें, यापेक्षां माझ्या शब्दात जोर तो काय असणार ? लोकमान्यांचें पुण्यस्मरण त्यांनीं करावें, महात्मा गांधींच्या वर्तनाचें अवलोकन करून पवित्र भावनेनें युक्त होऊन पुढील मार्ग आक्रमावा. देशाच्या उद्धार त्यांच्या हातीं आहे, ही गोष्ट सदैव त्यांच्यापुढें असली म्हणजे परमेश्वर त्यांना आवश्यक लागणारी बुद्धि व धैर्य देईल याबद्दल मला शंका वाटत नाहीं. असो. पुन्हा कांहीं वाटल्यास लिहीन पण पुष्कळ लिहिण्यांत काय होशील ? तुला लांब पत्र लिहिण्यात व वाचण्यांत मौज वाटते म्हणून मलाहि लांब पत्र लिहिण्यास सांगत आहेस. पण तुझें मी कां ऐकावें ? तुझें ऐकूनच मी आज हजामत करवीत आहें. नाहीं तर माझ्या मनांत दाढी ठेवावयाची होती. सर्वच गोष्टी तुझ्या मीं कां ऐकाव्यात ?

बाबासाहेब, गोविंदराव वगैरे माझे स्नेही माझ्यासारखेच तुला आहेत. निदान बाबासाहेबांसंबंधानें मीं तुला लिहावें असें नाहीं. त्यांना तूं ओळखतोसच. त्यांच्या-इतपत शुद्ध मनुष्य विरळा. त्यांचा व तुझा संबंध जुना आहे. मग माझ्या वियोगाची तुला इतकी फिकीर कां वाटावी ? हा तुझ्या मनाचा दुबळेपणा आहे. शिवाय तुला

वाचण्यालिहिण्याचा नाद आहे. तुझें मन सुसंस्कृत आहे. सत्संगाचा योग तुला लाभला आहे. इतकी सामुग्री सिद्ध असतां, काळजी व कमकुवतपणा कां? याशिवाय तुला मीं माझ्या मातोश्रीच्या वगैरे संरक्षणाचें काम दिलें आहे. परमेश्वर सर्व कांहीं करीतच आहे. यांत आनंद मानून समाधान दृष्टीनें रहावें. कळावें. हा आशीर्वाद.

• गंगाधर देशपांडे

ता. क. :—बाबासाहेबांचा समज दूर करण्याची खटपट कर. इतरांनाहि बाबासाहेबांप्रमाणेंच वाटतें कां?

## पत्र नं. ४

श्री

चि. पुंडलीक यास अनेक आशीर्वाद विशेष

*तुझ्या लांब पत्रांचा मला कंटाळा येत नाही.* मीं मौज केली. फार सावधगिरीनें पत्रव्यवहार झाला पाहिजे. नाहीं तर अब्रू जावयाची. याकरितां कारणाशिवाय पत्र न लिहिणें बरें.

कोणाला कांहींहि वाटो, त्याबद्दल बाटाघाट करण्यांत अर्थ नाहीं. तुरुंगवासांतील भावी कष्टाकरितां मी मुळींच भ्यालों नाहीं. तुम्ही मात्र आतांशा दररोज चांगलें चांगलें खायला घालून भलती सवय मला लावीत आहांत. आतां जिभेला फार चटोर करून चालावयाचें नाहीं. पण हें लिहून कांहीं उपयोग होणार नाहीं. यदृच्छेनें जें जें येईल तें तें अनासक्त होऊन उपभोगलें पाहिजे!

अंधेरीला जाण्याचें तुझ्या इच्छेवर सोपविलें. ती. मातोश्रीला विचारल्यास माझ्या मर्जीप्रमाणें कर असेंच त्या सांगतील. त्यांना तूं पाहिजे असशीलच असें मला खात्रीपूर्वक सांगतां येणार नाहीं. माझ्या समाधानाकरितां त्यांच्याजवळ तूं रहावेंस असें मला वाटतें. म्हणून तुला मी बाबासाहेबांचेकडे जेव असें सांगितलें होतें. असो. तुझ्या इच्छेप्रमाणें कर. मला त्याबद्दल कांहीं वाटणार नाहीं. बाबासाहेब आले तर त्यांना मी तूं लिहिल्याप्रमाणें कळवीन; त्यांना विनाकारण तसदी देणें मला बरें वाटत नाहीं. तूं लिहून भागण्यासारखें असेल तर पहा. येण्याजाण्याची *यातायात नको.*

पुष्पळांना पाहून "नेति नेति" असें कां वाटावें? तुझी ही चूक आहे. दुरुस्त कर. तुझ्या पत्रावरून तुझ्या मनाची स्थिति लक्षांत आली. असा अधीर होऊं नकोस. तुझें पुण्य देशाच्या उद्धाराकरितां ठेवलेंस तर जास्त बरें नाहीं का? तुझें पुण्य माझ्या *खर्चीं पडावें इतकी माझी योग्यता नाहीं. तें राखून ठेव. मी आल्यानंतर त्याचा* विनियोग कोठें करावयाचा तें ठरवूं.

माझी जागा स्वच्छ ठेवण्याचा बराच प्रयत्न केला जातो. तथापि धारवाडची

देशभक्त मंडळी याच जागेंत होती व ती जातांना थोडें ढेकूण ठेवून गेली आहेत. तथापि फारसा उपद्रव नाहीं. मला एक कॉट मिळाली आहे. झोप बरी लागते.

माझी तुरुंगांतील दिनचर्याः—पहांटे ५-६ च्या दरम्यान जागा होतों. सहाच्यापूर्वी जागा झाल्यास गीता म्हणतों. ६ ला जागा झाल्यास शौचास जातों. नियमानें ६ ला शौचमुखमार्जन वगैरे होत आहे. खोली विस्तृत आहे. रात्रीं १ टॉर्च असतो. बाहेर वरंड्यांत पहारेकरी निजतो. रात्रभर दिवा असतो. संध्याकाळीं खोलीच्या दाराला कुलूप असतें. सकाळीं ६ ला उघडतात. माझ्या एकट्याकरितांच शौचकूप आहे. रात्रींहि सोय आहे. पण उपयोग करण्याची पाळी आली नाहीं. फिनाईल वगैरे रोज घालतात. तसेंच मुखमार्जन झाल्यानंतर जेलर वगैरे समाचार घेऊन जातात. कांहीं पाहिजे काय असें विचारतात. उत्तर 'Thank you, I am alright.' त्यांचें विचारणें तसें माझें सांगणें. खोली, सभोंवारची जागा स्वच्छ ठेवण्याबद्दल रोज ताकीद दिली जाते व त्याप्रमाणें काम होतें. तूं येईपर्यंत गीतापाठ करीत फिरत असतो. दररोज निदान २ तास तरी फिरतों. तूं आल्यानंतर चहापान. पुन्हा गीता, पुन्हा शौच. स्नान उन्ह पाण्यानें, पाणी मुबलक. त्यानंतर गीतारहस्यवाचन, भोजन, थोडी विश्रांती (झोंपत नाहीं.) गीतारहस्य, दासबोध, थोडें चिंतन (काळजी नव्हे), इतक्यांत आपली स्वारी पुन्हा येते. आपण गेल्यानंतर वर्तमानपत्र वगैरे असल्यास वाचन. ५ पासून ६ पर्यंत फराळ वगैरे. पंक्तीला एक मांजर असतें. शेपमागाचे धर्मी पहारेकरी असतात. याकरितां दुपारीं भात व पोळी थोडी जास्ती असली तरी उपयोग होतो. चहाचाहि तसा उपयोग होतो. सर्व बरे वागतात. एका मनुष्यानें सुंदर लावणी म्हणून दाखविली. त्यानेंच केली आहे. देशस्थितीवर आहे. मनुष्य अंत्यज आहे. हुषार आहे. स्वतः कविता या स्थितींत करतो. ध्यानांत ठेवतो. म्हणून दाखवतो. या चळवळीची काळजी पुष्कळांना. माझ्यासंबंधानें सार्वत्रिक सहानुभूति. असो.

सायंकाळीं ६ पासून ८।९ पर्यंत कोणी नसतें. पहारेकरी घरीं जातो तो वेळ ईश्वरचिंतनांत, पुढील कार्यक्रम आंखण्यांत वगैरे. स्नेही, आप्त वगैरेंबद्दल अंतःकरण जात्या मृदु, त्या वेळीं भावी वियोगाबद्दल मनाला केव्हां तरी हुरहुर. पण पुन्हा विचारानें त्याचें निराकरण. या हुरहुरींत तुझाहि संबंध येतोच. तुझा स्वभाव मला माहीत. त्यामुळें तुझ्याबद्दल चिंता. पण परमेश्वरावर पूर्ण भरंवसा ठेवून सर्व चिंतेचें निराकरण. प्रतिदिवशीं आत्मशुद्धीची तालीम जोरावत आहे. शरीरव्यथा कांहीं नाहीं. म्हणून काळजी करूं नका म्हणून सर्वांना सांग. बाहेर खात्रीनें येईन, पुन्हा जोरानें काम करीन असा आत्मविश्वास वाटतो.

इतिहासपुराणांतील व हल्लीं चालू असलेल्या स्थितींतील दाखले देऊन घरच्या मंडळींचें समाधान कर. कळावें. हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. ५

श्री

चि. पुंडलीक यांस

आशीर्वाद विशेष,

तुझें पत्र वाचून बरें वाटलें. काल जें दिलें होतें त्यांपैकीं सौभीदारांचे संबंधानें व नोकरशाही वगैरेच्या संबंधानें जो मजकूर आहे तेवढाच ठेवावा असें बाबुरावांना वगैरे वाटत असल्यास तो ठेवावा; व तो कोठें घालावयाचा हेंहि ठरवावें. मी स्टेटमेंट पुन्हा पहात नाहीं. कोर्टांत तुम्ही जें द्याल तें वाचीन. वेळेवर तयार मात्र पाहिजे. कोणी आलें असतें तर बरें झालें असतें. घाई झाली नसती.

However grateful we may all feel असें दुरुस्त केलें तर चालेल असें मला वाटतें. जोशी यांचा दाखला मी "स्वराज्यझेंडा" हा शब्द सर्वसाधारण आहे हें दाखविण्यापुरता घेतला आहे.

And also because हे शब्द मलाहि नको आहेत, काढतों. हें मीं सकाळींच कळविलें आहे.

पेंटरसंबंधानें मीं म्हटलें नाहीं असें मला पक्के स्मरतें म्हणून मीं घातलें आहे. बाबुराव किंवा बाबासाहेब यांना, बहुतकरून बाबुरावांना, मीं विचारलें होतें व त्यांनीं घाला म्हणून सांगितलें म्हणून मीं घातलें. नको असेल तर माझा आग्रह नाहीं.

मन घट्ट करण्याचें एक काम आणि तें घट्ट झालें आहे असें दुसऱ्यांना वाटण्याजोगें वर्तन करण्याचें दुसरें काम, अशा दुहेरी चिमट्यांत सापडल्याप्रमाणें होत आहे. यांत लोकांचा दोष आहे असें मी म्हणत नाहीं, आणि पुनः मला स्वतःला काल तुला सांगितल्याप्रमाणें Bravado म्हणवून घेण्यांत कमीपणा वाटत असल्याकारणानें, तो प्रसंग कसा टाळावा हें तिसरें ओझें! कांहीं न बोलतां वीर वामनरावांसारखें स्वस्थ बसावें असाहि विचार येतो. मंडळींना तसें बरें वाटत असल्यास सगळीच कटकट गेली. गांधींनीं, जीं वाक्यें बोलली गेली नसतील तीं दाखवावीं, चुका दाखवाव्या म्हणून सांगितलें आहे असा निरोप बाबुरावांनीं, बाबासाहेबांचा म्हणून आणिला. पुढें बाबासाहेबांनींहि प्रत्यक्ष तसेंच सांगितलें; म्हणून मधला भाग घालावा लागला. नाहीं तर पहिलीं दोनतीन पानें व शेवटचीं दोनतीन पानें एवढ्यावरच भागलें असतें. *Wonder why prosecution should continue against me* या शब्दावरून मी सरकारजवळ फिर्याद काढून घेण्याबद्दल याचना करीत आहें असा अर्थ कसा निघतो तें मला तरी समजत नाहीं. सरकारचें दुटप्पी वर्तन एखाद्या गोष्टीमुळें बाहेर पडत असेल तर तें उघडकीला आणूं नये हा Nonco-operation चा भाग आहे असें मला खरोखर वाटत नाहीं. दुसऱ्या कोणाचा असाच खटला असता तर याच युक्तिवादावर मी सरकारावर टीकेचा भडिमार केला असता व सरकारला न्याय अन्याय याची चाड नसून जे लोक त्यांना नकोत त्यांना येन केन प्रकारेण तुरुंगांत पाठविण्याची

सरकारची नीति (?) आहे असें मी म्हटलें असतें. आणि सरकारकडे नकला अमुक कारणाकरितां पाहिजे आहेत असें कळवून, त्या मागितल्या असतां सरकार देत नाहीं, यामुळें त्यांचा खुनशीपणा चव्हाट्यावर आणावयाला किती तरी उत्तम साधन मिळालें आहे व त्याप्रमाणें तूं उपयोग कर असें मी काल्च तुला सांगितलें आहे. असो. गोविंदरावांसारख्यांना देखील अद्यापि अज्ञान असावें हें आश्चर्य ! खरें. या तारेवरून कांहीं उपयोग झाल्यास तो कां टाकावा हेंहि मला समजत नाहीं. प्रतिपक्षाकडून एखादी चूक झाल्यास तिचा फायदा आपण घेऊं नये म्हणजे राजकारण बुडविणें असें मला वाटतें. झाला तर उपयोग होईल. नाहीं तर प्रतिपक्षाला ठेचायला एक साधन होईल या दुहेरी हेतूनें एखादी गोष्ट केली तर त्यांत नुकसान काय ? फक्त आपल्या तत्वाला सोडून कांहीं करूं नये म्हणजे झालें. यांत तत्व कुठें सुटतें, हें विचारून मला मुद्दाम उद्यां कचेरींत कळव. अथवा पत्रानें कळव. नकला मागणें, अमुक कामाकरितां पाहिजेत असें सांगणें व सरकारच्या खुनशीपणाबद्दल आश्चर्य प्रदर्शित करणें यांत N. C. O. चा भंग कोठें होत आहे हें मला कळलेंच पाहिजे, नाहींतर माझ्या जिवाला चुटपुट लागेल. मला बरें वाटावें म्हणून मला उत्तर नको. चूक असली तरी ती समजली म्हणजे बरें वाटतें. मी तरी प्रामाणिकपणानें सांगतों कीं, तत्वाच्या विरुद्ध यांत वागल्याप्रमाणें मला तरी वाटत नाहीं. माझ्यावर हा जो खटला झाला आहे तो civil disobedience मुळें झालेला नाहीं हें लक्षांत ठेविलें पाहिजे. कल्पना कर कीं, उद्यां मला जज्जानें सोडलें तर मला तुरुंगांत घाला म्हणून मी हट्ट धरावा कीं काय ? कोर्टावर विश्वास नाहीं हें दाखविणें मला समजतें. तसेंच सरकारवरहि विश्वास नसावा हें सिद्ध करण्याकरितां ही सामुग्री म्हणून मी नकला मागितल्या व त्याच तारेंत त्यांना म्हणजे हिन्दी सभासदांना लाजविण्याचा प्रयत्न केला, यांत तत्व कोठें चुकलें ? बाबुरावांचा अभिप्राय मला पाहिजे आणि तो उद्यांच पाहिजे. कारण, उद्यां संध्याकाळपर्यंत सर्व संपेलहि कदाचित्. माझी चूक असेल तर तसा अभिप्राय स्पष्ट पाहिजे म्हणजे मला बरें वाटेल.

इंग्रज सरकार हें आमच्या राष्ट्राच्या घाताला प्रवृत्त झालें आहे म्हणून तें आमचा शत्रु आहे ही गोष्ट मी कशी विसरूं ? "गीतारहस्य" वाचल्यानंतर महात्मा गांधींच्या कांहीं विचारांबद्दल मला शंका आली, असें मी बाबासाहेबांना एका पत्रांत कळविलें होतें. मी ज्याला गुरु म्हणून अंतःकरणांत एकदां जागा दिली त्याला एकदम काढून टाकणें शक्य नाहीं. गांधीची चळवळ मला मान्य आहे, याचा अर्थ गांधी हे माझ्या गुरुस्थानीं आले असा नसून, त्यांच्या चळवळीनें व मार्गानें माझ्या गुरूचें कार्य सुकर होत आहे, असें मला वाटलें, हा त्याचा खरा अर्थ आहे. याच प्रकारचा मार्ग व असाच मनुष्य या वेळीं पाहिजे होता; व तो परमेश्वरकृपेनें मिळाला म्हणून देशाचा भाग्योदय लवकर होणार असें मला वाटतें. असो. मलत्या विषयांत संचार होऊं लागला.

गोविंदरावांसारख्यांना माझ्या अब्रूची इतकी काळजी वाटते याबद्दल मला

आनंद होत आहे. माझ्याबद्दल आदर, प्रेम, अभिमान, असाच ठेवा असें त्यांना सांग. तसें कांहीं असतें तर परवां त्यांची गाठ पडल्यावेळीं मी त्यांना कळविल्याशिवाय राहिलों नसतों. एवढी मात्र त्यांची गल्ती झाली. माझ्यांत व माझ्या जवळ असणाऱ्या मंडळींत हाच भेद. त्यामुळें केव्हां केव्हां गैरसमज होत गेले. झालें तें झालें. तपस्वी बाबा परांजपे यांनीं वकील दिला म्हणून अथवा बापूजी अणे यांनीं वकिली घेतली म्हणून त्यांची चूक झाली असें मी म्हणेन; पण ते मित्र आहेत अथवा देशद्रोही आहेत असें मी कधींहि म्हणणार नाहीं, व गांधीहि म्हणतील असें मला वाटत नाहीं. Civil Disobedience ची गोष्ट निराळी आहे.

गांधींच्या मार्गानें पुष्कळ काम झालें आहे पण समज कीं, दुर्दैवानें पूर्ण यश नाहीं आलें व उद्यां अरविंद घोषची स्वारी आली व त्यांनीं त्या वेळच्या परिस्थितीला अनुकूल असा एखादा मार्ग काढला व गांधींच्या मार्गाशीं कोठें तरी तो थोडा विसंगत असला तर तो टाकावयाचा कीं काय? गांधींनीं एक वर्षाची प्रतिज्ञा केली व साध्य झाली नाहीं तर त्यांना दोषहि द्यावयाचा नाहीं, अगर त्यांची थट्टाहि करावयाची नाहीं. पण पुढील मार्गक्रमण ध्येय प्राप्त होईपर्यंत सतत उद्योग करीत रहावयाचें.

मला उत्तम statement हें वाटतें. मंडळींना पसंत असेल तर तसें सांगण्यास मी तयार आहें.

Though the report of the speech is inaccurate and contains statements which I had not made and though the evidence is fabricated, I admit that the effect to my speech was calculated to create disaffection against this Govt. and I believe that the secred duty of every N.C.O. is do the same—किंवा शेवटचें and I...वगैरे काढून बाकी ठेविल्यासहि हरकत नाहीं, माझ्या समजुतीप्रमाणें आतां तयार केलेल्या स्टेटमेंटमध्यें जाणूनबुजून कांहीं खोटें घातलेलें नाहीं. पण disaffection उत्पन्न करण्याचा माझा इरादा नव्हता असें जरी म्हटलें नाहीं तरी तोच माझा इरादा होता असें मात्र म्हटलें नाहीं. सत्य झाकून मात्र ठेविलें आहे, असत्य कांहीं नाहीं अशी स्थिति आहे. या सर्व गोष्टींचा विचार करून, जेवण आणशील त्यावेळीं उत्तर घेऊन ये. कोणत्या धोरणावर statement करावयाची हें ठरलें म्हणजे मी तोंडीं देखील करीन, लेखीच दिली पाहिजे असें नाहीं. तर आतां गेल्याबरोबर वेळ न घालवितां, हें काम कर. मंडळीच जर आली नसतील तर इलाज नाहीं.

कांहीं तरी वैतागून मी लिहीत आहें अशी समजूत होईल; पण तसें नाहीं. कांहीं केलें तरी या खटल्यांतून सुटत नाहीं. मग कार्याला उत्तेजनकारक काय मिळेल तितके पदरांत पाडून घेऊं. वकील देऊन किंवा स्वतः काम चालविलें असतें तर मात्र मी सुटलों असतों. पण तो मार्गच इष्ट नाहीं. म्हणून चळवळीला अनुकूल व पोषक असा जबाब

दिला पाहिजे. मला कांहीं सांगावयाचें नाहीं म्हणून सांगून स्वस्थ बसणें हाहि एक प्रकार आहे. यांपैकीं कोणता मार्ग पसंत तो ठरवा.

कळावें हा आशीर्वाद. गंगाधर देशपांडे.

## पत्र नं. ६

श्री

चि. पुंडलीक यांस,

अनेक आशीर्वाद वि.

कालच्या पत्रांत तूं मला एक अति कठीण काम करण्याला सांगितलें आहेस. तें काम म्हणजे ती. मातोश्रीचें वगैरे समाधान करण्यासंबंधानें. हें काम मला बिकट वाटण्याचें कारण हेंच कीं, आज माझ्यावर जो प्रसंग आला आहे असें लोकांना वाटत आहे, त्याबद्दल मला कांहींच वाटत नाहीं. उलट, मी बेळगाव सोडतेवेळीं जमलेल्या मंडळीला उद्देशून, हें मोठें भाग्य माझ्या वाटणीला आलें आहे असें बोललों. कदाचित् हे शब्द घरच्या मंडळीच्या कानावर गेले असतील. लो. टिळक (ज्यांचा मी पट्टशिष्य आहें असें लोक समजतात) अशाच एका प्रसंगाला हें सतीचें वाण आहे असें म्हणाले. ज्या साध्वीच्या नशिबाचें भाग्य उदयाला येतें तिलाच पतीबरोबर सहगमन करण्याचा आनंद लाभतो. त्याचप्रमाणें हल्लींच्या दिवसांच्या परिस्थितींत देहदंड सोसून देशभक्तीचें पुण्य ज्याच्या पदरीं पडेल तोच खरा भाग्यवान. सतीचें वाण काय, देशभक्तीचें वाण काय, दोन्ही सारखींच आहेत. या न्यायानें पहातां माझ्यावर आलेला प्रसंग दुःखाचा कसा हेंच मला कळत नाहीं; म्हणून ह्याबद्दल समाधान कोणाचें, को व कसें करावें हें समजणें अत्यंत कठीण आहे.

फार दिवसांचा सहवास असल्यामुळें थोडासा वियोग व त्या वियोगांत शरीरक्लेश इत्यादि कल्पनांनीं मनाला थोडासा खेद होणें साहजिक आहे. पण थोडासा विचार केला तर तो सहज होणारा खेद एक क्षणहि टिकूं नये. सुखदुःखें हीं मनाच्या कल्पनेवर आहेत. देशासाठीं देहदंड भोगण्यांतच मला सुख वाटतें. वास्तविक पहातां माझ्या वडिलांच्या पुण्याईनें मला घरीं खावयाला व चैन करावयाला देखील पुष्कळ आहे. पण मला त्यांत सुख वाटत नव्हतें. ज्या देशांत मी जन्माला आलों, ज्या देशानें मला लहानाचें थोर केलें, ज्या देशानें मला खायला देऊन पुष्ट केलें, ज्या देशानें मला आजपर्यंत आपल्या मांडीवर खेळविलें, त्या देशाची अशी हीन दीन स्थिति पाहून मी स्वस्थ चैन करीत बसावें हें योग्य आहे काय? निदान मातृभक्ति व पितृवात्सल्य यांची ज्यांना थोडी तरी माहिती आहे त्यांना तरी तें योग्य वाटणार नाहीं. मी वरच्या वाक्यांत देश असा शब्द घातला आहे त्या ठिकाणीं आई असा शब्द घाल म्हणजे अर्थ बरोबर कळेल.

जन्म देणारी माय व जन्म देणारा मायदेश यांत अंतर काय? आजपर्यंत मी घरच्या लोकांच्या हिताच्या दृष्टीनें कांहीं गैर केलेलें नाहीं. सर्वांना मी प्रेमानेंच वागवीत आलों. आतां यानंतर तरी मला देशसेवा करण्याचें पुण्य मिळालेंच पाहिजे. शिवाय, *मी म्हणजे कोण?* माझ्यांत कांहीं गुणधर्म आहेत, म्हणून मला तरी मीपणा आहे. त्या गुणांनाच कांहीं तरी किंमत आहे. माझ्यांतील हे गुण गेल्यानंतर मी असून नसून सारखाच आहें. हा माझ्यांतील मीपणा असावा, व तो वाढावा असें मनांत असेल तर हा माझ्यावर आलेला प्रसंग म्हणजे एक भाग्यच होय, असें मानणें भाग आहे. *या प्रसंगांतून मी तावून सुलाखून शुद्ध झाल्यानंतर माझ्यांतील मीपणाची योग्यता मला* जास्ती समजेल. याकरितांच महात्मा गांधींना देखील माझ्याबद्दल मत्सर वाटतो. म्हणून तुम्ही सर्वांनीं परमेश्वराजवळ मागणी करावी कीं, देवा, या प्रसंगांत याला धैर्य दे, आनंदानें शरीरक्लेश भोगण्याचें सामर्थ्य दे, तुरुंगवासानें देशभक्ति जास्ती उद्दीपित होवो व जास्ती कीर्तिरूपानें व आनंदरूपानें हा लवकर बाहेर येवो. बाहेर येण्यापूर्वी देश मुक्त झाला तर बरें, दुर्दैवानें तसें न झाल्यास पुन्हा देशासाठीं क्लेश भोगण्यास तयार झालेंच पाहिजे. माझ्यासारख्याला काय किंवा इतर कोणत्याहि खऱ्या हिंदपुत्राला सद्गति यांतच आहे. नुसत्या जिवंत राहाण्यांत व सृष्टिनियमानुसार एखाद्या दिवशीं मरण्यांत गति नाहीं. कुटुंबाच्या दृष्टीनें तरी यांत वाईट काय आहे? कोणत्याहि प्रकारें यांत अपकीर्ति आहे असें वाटण्याचें कारण नाहीं. होईल तर कीर्तीच होईल. या शरिरापेक्षां कीर्तिरूप शरिराची योग्यता जास्त नाहीं का? रघुवंशांत दिलीप राजाचें व सिंहाचें भाषण आहे तें वाच. दिलीप गाय राखायला गेल्यावेळीं त्याचें सत्व पहाणेकरितां शंकरांनीं सिंहाचें रुप घेऊन गाईवर झडप घातली त्यावेळीं दिलीपानें सिंहाची प्रार्थना केली व सिंहाला आपलें शरीर देऊं करून गाईला सोडणेबद्दल सांगितलें. कारण, दिलीपादेखत सिंहानें गाय नेली आणि दिलीप जिवंत राहिला ही गोष्ट त्याच्या अपयशाची खास आहे असें त्याला वाटलें. त्याचें हें भौतिक शरीर नाहींसें झालें तरी त्याला त्याची दिक्‍त वाटली नाहीं. यशःशरीराबद्दल *त्याला काळजी वाटली. हरिश्चंद्राच्या कथानकांत तेंच आहे.* पुराणांतरीं असे प्रसंग पुष्कळ आहेत. असे प्रसंग परमेश्वर आणतो यांत त्याचा कांहीं तरी अतवर्य सद्हेतूच असतो. हे प्रसंग वाईट म्हणण्याचा व त्याबद्दल कष्टी होण्याचा अधिकार आम्हाला नाहीं. त्याबद्दल परमेश्वराचे कृतज्ञतापूर्वक आभार मानले पाहिजेत. श्रीरामचंद्राचा वनवास, पांडवांचा वनवास इत्यादिकांवरून हाच बोध घेतला पाहिजे. इतिहासांत देखील असे दाखले पुष्कळ आहेत. तूं इतिहास जाणतोस त्यांतील गोष्टी आईला सांग. लोकमान्य टिळकांचें उदाहरण ताजें नाहीं काय? महात्मा गांधी काय करीत आहेत? माझे स्नेही वीर वामनराव, तपस्वी बाबा परांजपे, अलीबंधु, किचलू यांच्यावर प्रसंग यावा आणि आम्ही चैन करीत बसावें हा न्याय कोठला? त्यांना आया, बायका, बहिणी, मुलें नाहींत काय?

ही मोठी पर्वणी आली आहे. ज्याचा नंबर आधीं लागेल तो जास्त पुण्यवान. आणखी २–३ महिन्यांत एक स्वराज्यप्राप्ति तरी होईल नाहीं तर सर्व देशभक्तांना तुरुंगांत तरी जावें लागेल, अशीं स्पष्ट चिन्हे दिसत आहेत. देशभक्ताचें तुरुंगात जाणें म्हणजेच स्वराज्याचा पल्ला गांठणें होय. दोन्हीपैकीं कांहीं झालें तरी देश-हिताच्या दृष्टीनें इष्टच आहे. म्हणूनच गांधींनीं मला लिहिलें आहे कीं, या वर्षाच्या अखेरपर्यंतच मला फार झालें तर विश्रांति. या शब्दांत मला सत्य भरलें आहे असें वाटतें.

आज जर मी माफी मागेन तर मला खास सोडतील. पण अशा प्रकारें मी बाहेर यावें असें घरच्या मंडळींना देखील आवडेल असें मला वाटत नाहीं. आमच्या कामांत यश यावें म्हणून परमेश्वराजवळ आम्ही मागून घेत आहोंत असें चि. तारकांनीं मला—मी पुण्यांत असतांना—लिहिलें याचा अर्थ माझ्यापेक्षा आमच्या कामाची योग्यता ती जास्ती समजते. यांतच मला आनंद आहे. म्हणून माझ्या-बद्दल कोणत्याहि प्रकारची काळजी न करतां परमेश्वरावर विश्वास ठेवून आम्ही घेतलेल्या कामांत हातभार लावणेस सांग. माझ्या घरचीं माणसें माझ्याबद्दल काळजी करीत रडत बसलीं आहेत, असें होणें माझ्या कीर्तीला डाग लावण्याप्रमाणें आहे. अलीबंधूंच्या आईचें उदाहरण डोळ्यांपुढें ठेवण्यास आई-बहिणीला सांग. नेहमीं गोषांत असणाऱ्या वृद्ध वीरमातेला काय स्फुरण आलें आहे पहा. सिंहासारखे दोन मुलगे मृत्यूच्या जबड्यांत असतांना यांच्याबद्दल रडत न बसतां व्याख्यानें देऊन लोकांमध्यें धर्माबद्दल व देशाबद्दल जागृति उत्पन्न करण्याचा सपाटा अलीबंधूंच्या मातोश्रीनें चालविला आहे. अशीच स्फूर्ति परमेश्वरानें माझ्या घरच्या मंडळींना दिली तर मला किती बरें वाटेल ? हें सर्व नीट समजावून सांग. त्या सर्व शहाण्या व समजूतदार आहेत. केव्हां तरी मोहाचें पटल येत असेल, तें दूर सार. आणि त्या काय म्हणतात तें मला लिही. आतां ८॥ वाजले, मला झोंप येऊं लागली म्हणून पुरें करतों.

तूं रात्रीं फार जागूं नकोस. तूं काय करावेंस हें मीं अद्याप ठरविलें नाहीं. ठरवून कळवीन. कळावें हे आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. ७

रात्रीचे साडेसात श्री तपोभूमि

चि. पुंडलीक यांस आशीर्वाद वि.

तूं काशीला जागार म्हणून मला कळविल्या दिवसापासून मी विचार करीत आहें, व आज शेवटीं असें ठरलें कीं, मी परत घरीं येईपर्यंत तूं कोठेंहि जाऊं नयेस. कारण तूं बेळगांवच्या आसपास नाहींस असें झालें म्हणजे मला तुझ्याबद्दल काळजी उत्पन्न

होत्ये. मला ज्यांच्याबद्दल अत्यंत काळजी वाटते त्यांपैकीं तूं एक आहेस हें मी तुला सांगावें असें नाहीं. मग विनाकारण माझ्या काळजींत भर कां? माझ्या मंडळींत तूं असलास म्हणजे तितकी माझी काळजी कमी झाल्यासारखें होतें. म्हणून मी सांगितल्याप्रमाणें बेळगांवच्या शाळेंत काम करावें व कांहीं दिवस माझी वाट पहात राहावें. मी आल्यानंतर आपण दोघे ठरवून वाटेल तिकडे जाऊं. ती. अण्णांच्या मनांत रामेश्वराकडे जावयाचें आहे. पण तिलाहि सांगावें कीं मी येईपर्यंत घरचा सर्व कारभार चांगल्या प्रकारें पाहून आनंदांत राहावें. ती जर सर्वांना घेऊन आनंदांत राहील तर मला कशाचीहि काळजी नाहीं. माझ्यावर हा प्रसंग माझ्या उद्धाराकरितां आला आहे असें वाटून मी आनंदांत आहें. त्यामुळें माझ्या शरिरावरसुद्धां परिणाम होऊन माझी प्रकृति सुधारत चालली आहे. खटला निकालांत येईपर्यंत पुढील मुक्काम गांठण्याला मी समर्थ होईन असें मला खात्रीपूर्वक वाटूं लागलें आहे. तुरुंग ही पुण्यभूमि आहे, ती तपोभूमि आहे असें मी ऐकत होतों. पण आतां अनुभवीत आहें. मागें एकदां असाच प्रसंग आला होता. पण त्या स्थितींत व आजच्या स्थितींत जमीनअस्मानाचें अंतर. तो आरोप कोठें व हा आरोप (!) कोठें! याला आरोप म्हणून कोणत्या तोंडानें कोण म्हणणार? मला येथें भेटावयास येणारे बरेच लोक माझ्या पायावर डोकें ठेवून नमस्कार करतात. याची मला लाज वाटते. देशकार्यासाठीं एवढीशी झीज सोसण्याची मी तयारी दाखविली तर इतका कां मान मिळावा? खरोखर देशकार्याकरितां देह कष्टविणारे लोक देशांत इतके थोडे का आहेत? हा विचार मनांत येऊन वाईट वाटतें. पण खरोखर ती स्थिति नाहीं असें मला वाटतें. आणि जर असेल तर मी बाहेर आल्यानंतर ती घालविण्याचे मी जास्ती जोरांत प्रयत्न करीन असा मला भरंवसा वाटतो. या कामाला मला सर्व प्रकारचा अनुभव यावा व हें काम माझ्याकडून पायाशुद्ध व्हावें याच हेतूनें परमेश्वरानें अत्यंत कृपाळू होऊन माझ्यावर हा प्रसंग आणला आहे असें वाटूं लागलें आहे. याकरितां माझा अभ्यास पुरा होऊन तपश्चर्या संपवून मी पुढील उद्योगाला लागण्याकरितां सुखरूपपणें यावें म्हणून परमेश्वराची आराधना करा. सिंध प्रांतांतील पीराप्रमाणें मी करावें असें तुम्हांला कोणालाहि वाटणार नाहीं. असो. उगीच कांहीं तरी बरळत चाललों.

तूं काय करणार हें स्पष्ट मला कळीव. एक कळवून दुसरें करावयाचें असें तूं करणार नाहींसच. कळावें हे आ.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. ८

श्री

चि. पुंडलीक यास

आशीर्वाद विशेष. मलाहि काल रात्रींपासून स्टेटमेंट पुनः पहावें असें वाटत होतें. म्हणून तुला मी स्टेटमेंटबद्दल प्रथम प्रश्न केला व याचकरितां स्टेटमेंट कोणाला दाखवूं नको असें काल तुला मीं सांगितलें होतें. ज्या वेळीं जो मुद्दा सुचतो तो कागदावर टिपून ठेवीत आहें. तथापि, तुझी सूचना योग्य आहे. व मी ती आनंदानें स्वीकारतो. तुला इतकें समजूं लागलें हें पाहून मला अभिमान वाटतो. व तूं आणखी कांहीं दिवस माझ्याबरोबर राहिला असतास तर तुझ्यापासूनच मला पुष्कळ शिकावें लागलें असतें. यांत मला कमीपणा कांहींच वाटत नाहीं. यालाच म्हणतात 'शिष्यादिच्छेत् पराजयं.' ठीक आहे. तुझ्या सूचनेप्रमाणें करतों. आणखी स्टेटमेंट वाचून पहा. कोठें कांहीं आढळल्यास कळीव. भीतीनें असें होतें असें नाहीं. तर वकिलीच्या संबयीनें. हा खटला चालवावयाचा असता तर एक दिवसांत याच्या मीं ठिकऱ्या उडविल्या असत्या. असो. तुझे आभार मानणें तुला ओझें होणार.

ती. अव्वांचें पत्र वाचलें. अतिशय आनंद झाला. माझ्या मनांत कमजोरपणा कोणत्याहि कारणानें येण्यासारखा असेल तर आईच्यामुळें येत होता. आतां हें तिचें पत्र वाचल्यापासून मनांतील सर्व कमकुवतपणा समूळ गेला व माझी सर्वतोपरी तयारी झाली. तिचा मला आशीर्वाद मिळाला, आतां मला कांहीं होणार नाहीं. खरा देशभक्त कधींच मरत नाहीं. परमेश्वराच्या कृपेनें सर्व कांहीं सुरक्षित होऊन लवकरच भेटेन असें आईला सांग. व मीं परत आल्यानंतर समेत बोलण्याला तिला शिकवीन असें कळीव. परंतु तोंपर्यंत स्वराज्य मिळून जाणार. तेव्हां त्यावेळची भाषा व हल्लींची भाषा यांत फरक पडणार. व बाहेर राहणारी मंडळीच आम्ही कसें बोलावें हें आम्हाला शिकवणार. बरें आहे.

Statement मध्यें पान ५ यावर शेवटच्या प्याऱ्यांत असलेलें वाक्य "and also become aware of the Govt. Policy of meeting it with counter propaganda" काढावें असें वाटतें. हें घातलें याचें कारण सरकारनें आतां दडपशाही सुरू करून लोकांना फसविलें असें दाखविण्याचें आहे. उद्यां पाहूं.

ती. अव्वांचें पत्र तसेंच ठेव. मी आल्यानंतर तें पुन्हा वाचीन. मौ. शौकतअल्लींनें तिला नमस्कार केला व माझी आई काय, तुझी आई काय, दोघीहि मला सारख्यान आहेत म्हणून मला सांगितलें. हें तो उगीच कांहीं तरी औपचारिक बोलला होता असें मला वाटलें नाहीं. पण त्याची आई जशी धैर्यशील आहे तशीच माझी असेल का असें त्यावेळीं वाटलें, पण प्रसंग आल्याबरोबर माझी आईहि तशीच आहे असें वाटून मला आनंद झाला. मौ. शौकत अल्लीची पुनः ज्या वेळीं भेट होईल, व ती लवकरच होणार, त्या वेळीं ही गोष्ट मी मोठ्या अभिमानानें त्यांना सांगेन. मी आईला भेटावयाला बोलाविलें असतें, पण विनाकारण तसदी नको. आतां यशस्वी होऊनच भेटेन. बाकी

कांहीं काळजी नाहीं. सर्व ठीक आहे. आज अगदीं हलकें वाटून मन फारच शांत आहे. हुरहुर नाहीं. इतक्या दिवसांत काल रात्रीं उत्तम झोप लागली होती. मला वाटतें, उद्यां यापेक्षां बरें वाटेल. गीता पाठ येते व या खेपेला चांगला अभ्यास झाला, त्यामुळें शांतीचें एक मोठें साधन मिळाल्याप्रमाणें झालें आहे. उगीच किती लिहूं. दिवेकर वगैरे मंडळी उद्यां भेटतीलच. तूं काल पाया काय म्हणून पडलास? असें केल्यानें माझ्या वृत्तींत चलबिचल होते. माझे दोष मला माहीत आहेत. याकरितां मला हा मोठेपणा नको. मी नेहमीं मागें मागें येत असतों याचें कारण हें एक आहे. दोष असून निर्दोषी पुण्यवानाप्रमाणें टेंभा मिरविणें मला आवडत नाहीं. कदाचित् माझी शुद्धि करण्याकरितांच परमेश्वरानें हा योग आणलेला असावा. तेव्हां परत आल्यानंतर तुला काय करावयाचें तें कर. आतां नको. मला असें वाटतें. अंतर्मुख वृत्तीनें मी माझें निरीक्षण करीत असतों. ही संवय मला पूर्वीपासून आहे. आतां ती दृढ होत आहे. यामुळेंच माझ्या सहवासानें लोकांना कंटाळा येत नाहीं. पण त्यामुळें माझ्यावर विनाकारण मोठेपणाहि लादला जातो. गुण असेल तर एवढाच कीं, अहंकारबुद्धि कमी असल्यानें लोकांना मी बरा दिसतों. पण जितका दिसतों तितका मी बरा नाहीं, याची जाणीव मला आहे. असो, आतां मी पत्र लिहिणार नाहीं. वेळ मिळणार नाहीं. १।२ दिवसांत हें सर्व नाटक संपेल. कळावें हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. ९

श्री

चि. पुंडलीक यांस,

आशीर्वाद. वि. हें पत्र मी तुझ्याचकरितां लिहीत आहें. घरच्या मंडळींना यांतील मजकूर कळवावयाचा नाहीं. फराळ झाल्यानंतर एकदम मनांत कांहीं विचार आले, तेच तुला कळवितों. हें पत्र वाचून माझ्या मनाची शांति बिघडली किंवा काय असें तुला वाटण्याचा संभव आहे. पण तसें नाहीं हें प्रथमच तुला सांगून ठेवतों. काल गीतारहस्यांतील अध्यात्म प्रकरण वाचून झालें. मागें दोनतीन वेळां हेंच प्रकरण वाचण्यांत आलें होतें. पण कालच्या वाचण्यानें जसा बोध झाला तसा मागें कधींच झाला नव्हता. आतां हा टिकवण्याची खटपट राहिलेल्या १०।१२ दिवसांत करणार आहें. यांतच पुष्कळ वेळ जाईल. म्हणून ज्ञानेश्वरी नसली तरी चालेल म्हणून मी तुला सांगितलें.

या खटल्यांत मला शिक्षा होणार यांत शंका नाहींच. १८६० सालीं (साल बरोबर लक्षांत नाहीं) केलेला कायदा व हल्लींची परिस्थिति यांत महदंतर आहे. हल्लींचें कॉंग्रेसचें ध्येय व तें साध्य करून घेण्याचे उपाय हे कायद्याच्या दृष्टीनें गुन्हा

होऊं शकतात. म्हणूनच महात्मा गांधी हे या सरकारच्या संबंधानें अप्रीति पसरविण्याचें काम मी करीत असून हल्लींच्या कायद्यानें मी गुन्हेगार असूं शकेन असें म्हणत असतात. सरकारला ही चळवळ असह्य होऊं लागली आहे. एक तर त्यांनीं ही चळवळ उत्पन्न होण्याचीं कारणें दूर केलीं पाहिजेत, म्हणजे लोकांच्या म्हणण्याप्रमाणें वागलें पाहिजे, नाहीं तर दडपशाही करून चळवळे लोकांना दडपून चळवळ मारून तरी टाकली पाहिजे. चळवळ न मरतां दडपशाहीच जर मरेल तर सरकारला हार खावी लागेल हें उघड आहे. पण तूर्त चळवळे लोकांना मारण्याचा उपक्रम आहे. या स्थितींत मला शिक्षा होईल किंवा नाहीं हा प्रश्नच नाहीं. तर फक्त किती शिक्षा होईल हा प्रश्न आहे. माझ्या समजुतीनें मला बरीच भारी शिक्षा होईल असेंहि दिसतें व कदाचित् माझ्या देहाचा वियोगहि होऊन पुनः यान्च संस्कारांनिशीं पुनर्जन्म घेण्याची पाळी येईल. यांत घाबरण्यासारखें कांहीं नाहीं. 'अर्थ वा साधयेत् देहं वा पातयेत्' या दोहोंपैकीं एक होणार हें खास. आणि चळवळ जर जोरांत न आली तर दुसराच प्रसंग येणार. दिल्लीहून मंडळी परत आल्यानंतर यासंबंधानें जास्ती विचार करण्यास सवड व वाव मिळेल. मी माझ्या संबंधानें नेहमीं म्हणत असें, 'शय्येवरि न पडावा योग्य रणक्षिति वरीच हा काय' तेंच सार्थ होण्याचीं चिन्हें दिसत आहेत. त्यांतहि आनंदच आहे. पुष्कळ दिवसांची इच्छा सफल होण्याला देखील पुण्याई लागते.

तथापि, दोहोंपैकीं एक गोष्ट घडून येईपर्यंत तू काय करावेंस असें मला वाटतें, तें मी काल लिहिलेंच आहे. तूं माझ्यापेक्षां लहान असलास तरी तुला समजूत चांगली आहे. म्हणून तुझ्या स्वातंत्र्याच्या आड मी येऊं इच्छीत नाहीं. शाळेंत व आश्रमात काम करून तूं राहावेंस असेंच मला वाटतें. तुझा उपयोग तेथें चांगला होऊन, तूंहि देशसेवेच्या कर्जांतून मुक्त होशील. तूं बेळगांवास असलास म्हणजे तुझी आठवण—ती तर सदैव होणारच—झाली म्हणजे तितकी मला कमी काळजी वाटेल हा माझा स्वार्थ आहे. तथापि जें वाटलें तें लिहिलें आहे. पण एक गोष्ट खरी आहे कीं, तूं मला फार प्रेमानें वागवलेंस. पांडुआण्णा शिराळकर यांनीं माझी तूं सेवा करतो आहेस असें लिहिलें आहे. पण मला ती सेवा असें वाटत नाहीं. सेवा अशी मला कल्पना असती तर ज्या गोष्टी माझ्यासंबंधानें तूं केल्या आहेस किंवा करीत आहेस त्या मी तुला करूं दिल्या नसत्या. मी स्वतः केल्याप्रमाणेंच तूं केल्याचें वाटतें. जर आदेर असतों, तर तुझ्याबरोबरच काल घालवावयाचा हें ठरवलें होतें हें तुला माहीत आहे. काका कालेलकरनाहि मी त्याचप्रमाणें लिहिलें होतें. जसा योगायोग असेल तसें घडतें. आजच मी दिवेकरांना लिहिलें आहे कीं, परमेश्वराच्या कारभाराला बरेंवाईट म्हणायचा अधिकार मनुष्याला—निदान माझ्यासारख्या अल्पबुद्धि मनुष्याला—नाहीं. अशी स्थिति व अशा संबंध असल्याकारणानें तुझे माझ्यावर उपकार आहेत असें कोणत्या तोंडानें म्हणूं! म्हणून त्या बाबतींत कांहींच लिहीत नाहीं. झालें. तुझ्यासंबंधानें झालें.

मला शिक्षा झाल्यानंतर गोविंदरावांना माझा अत्यंत प्रेमपूर्वक नमस्कार सांग. या गृहस्थानें माझ्यावर निर्हेतुक प्रेम केलें. माझ्यामुळें त्याची नुकसानी झाली आहे. ती मींच भरुन काढावयाला पाहिजे होती. त्यामुळें त्याच्या प्रेमांत कमीपणा आला आहे असें मुळींच नाहीं. तो, त्याचे दोघेहि बंधु यांच्या सहवासांत माझ्या आयुष्यांतील बराच काल फारच समाधानांत गेला. माझ्यापेक्षां गोविंदरावांची देशसेवा अधिक वा अधिक योग्यतेची आहे यांत शंका नाहीं. सभेत वक्तृत्व दाखविणें हा एक देशभक्तीचा प्रकार आहे. पण अंतःकरणाची परीक्षा केल्यास गोविंदरावांच्या कसोटीला फार थोडीं माणसें उतरतील. त्यांच्याबरोबर बोलण्याला अवधि नाहीं. माझ्यावर त्यांचे फार उपकार आहेत. ते फेडण्याचा हवाला पुढील जन्मावर ठेवणें भाग आहे. तथापि, माझा जन्म कांहीं निरर्थक झाला नाहीं. त्यांच्या अत्यंत आवडीच्या विषयाच्या बाबतींतच तो कामीं येत आहे. यामुळें मला व विशेषतः त्यांना जें समाधान होत आहे त्यामुळें त्यांच्या उपकाराची पुरी नसली तरी बरीच भरपाई होत आहे, ही त्यांतल्या त्यांत आनंदाची गोष्ट आहे. जास्ती काय लिहूं ? हा मजकूर त्यांना कळीव. समक्ष सांग. पत्रोपत्रीं नको.

बाबासाहेब सोमण यांच्यासंबंधानें वेळोवेळीं मीं तुला सांगितलेंच आहे. एका बाबतींत म्हणजे माझ्या मृत्युपत्राच्या बाबतींत त्यांचा गैरसमज झाला व तेवढ्यापुरता त्यांनीं आपला कच्चेपणा दाखविला. तथापि तो क्षम्य आहे. मी बाहेर आलों तर त्यांची त्या बाबतींत खात्री करुन देईन. त्यांना माझा निरोप मी काय सांगणार ! त्यांचा अधिकार फार मोठा आहे. कांहीं बाबतींत मी त्यांच्यापेक्षां मोठा दिसत असलों तरी या जन्मांत त्यांची योग्यता मला येणार नाहीं. पुढील जन्मीं हरि आहे.

याशिवाय, मजली, करगुपीकर, भीमराव पोतदार (किती नांवें लिहूं) वगैरे मंडळींनीं माझ्यावर निर्हेतुक प्रेम केलें आहे. मी पुष्कळांना टाकून बोललों असेन. सर्वांना क्षमा करण्यास माझ्या वतीनें सांग.

रा. हणमंतराव देशपांडे यांचा निराळ्या प्रकारचा संबंध आहे. गोविंदरावाबरोबरच त्यांची ओळख. दोघांनीं प्रेमानें वागावें अशी माझी इच्छा. हाच माझा निरोप त्यांना सांग.

बाबूराव गोखले यांच्यासंबंधानें मला बरीच आशा आहे व ती सफल झाल्याचें माझ्या कानीं पडल्याशिवाय राहणार नाहीं अशी माझी खात्री आहे. आज माझी यांची ओळख होऊन एक तप होत आलें. प्रेमांत वाढ आहे, कमतरता नाहीं.

महादेवशास्त्री दिवेकरांसंबंधानें प्रेमाच्या जोडीला एक प्रकारचा अभिमान वाटतो. प्रत्येकाचें पूर्ण वर्णन देत बसलो तर राहिलेले १५ दिवस पुरावयाचे नाहींत. आणखी किती तरी मंडळी आहेत. असो. सर्वांना नमस्कार सांग व त्यांची आठवण अत्यंत कृतज्ञतापूर्वक राहील असें त्यांना कळीव.

घरच्या मंडळीसंबंधानें जास्ती काय लिहूं ? माझ्या जागीं तुम्ही सर्व आहांतच.

जवळच्या आप्तांपैकीं रामराव मोकाशी यांना संभाळलें पाहिजे. व्यंकटरावांची (डॉ. हुईलगोल गदग) जोडी उत्तम आहे. १५ दिवस माझे त्यांच्या घरीं गेलेले बरे वाटले. व्यंकटरावाला दुपारीनें राहण्यास सांग. रामरावांना जपा म्हणून घरच्या मंडळींना सांग. ठकुताईचें नशीब खडतर आहे! शंकररावाबद्दल मला इतकी काळजी वाटत नाही. त्यांचें कसें तरी चालेल.

सर्व मंडळींना देवानें पूर्ण आयुष्य देऊन सुखी ठेवावें हीच त्या जगन्नियंत्याजवळ मनोभावानें प्रार्थना करतों व आटोपतों.

शिक्षा जास्त झाली तर मध्यंतरीं सोडणार आहेत वगैरे सांगून माझ्या घरच्या मंडळीचें समाधान तूर्त करावें. मन हळुहळु तयार झाल्यानंतर पुढें काय होत जाईल तें कळेलच. हा आशिर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १०

श्री

चि. पुंडलीक यास

आशीर्वाद वि. तुझीं पत्रें वाचण्याचा मला मुळींच कंटाळा येत नाहीं. पण तूं म्हणतोस त्याप्रमाणें तुझी माझ्याबद्दलची निष्ठा पाहून व इतकी निष्ठा ठेवण्याइतकें तुझ्याबद्दल माझ्याकडून कांहीं झालेलें नाहीं हें आठवून, माझ्या मनाची मात्र शांतता बिघडते. व बाहेर आल्यानतर याचा वचपा काढल्याशिवाय मी राहणार नाहीं असा निश्चय करतों. हा निश्चय तडीला नेणार परमेश्वर समर्थ आहे.

माझ्या घरासंबंधानें तूं जें लिहिलें आहेस तें मला पसंत आहे. पण याबद्दल जास्ती खटपट करूं नकोस. एकदां रा. मजलीजवळ बोलल्लास तें पुरे आहे. सर्वांच्या भावना सारख्याच तीव्र असतात असें नाहीं, व आपल्या भावना दुसऱ्यावर लादणें वगैरेहि नाहीं. बाहेरच्या पाहुण्यांसंबंधानें जें लिहिलेंस तेंहि मला पसंत आहे, व तसें ती. अव्वांनीं व चि. रामराव मोकाशी यांनीं करावें असें मलाहि वाटतें. निदान तूं तरी माझ्या खोलींत बसून व माझ्याच पलंगावर पडून अगर खुर्चीवर बसून राहिलास तरी आनंदच आहे. घराला कुलुप घालणें मलाहि बरें दिसत नाहीं. पण यांत तरी आग्रह कां धरावा? चि. रामरावांनीं बेळगांवास राहावें, असें माझें मत त्यांनाहि कळविलेंच आहे, पुनः कळवीन. मौ. शौकतअलींचें भाषण वाचून आनंद झाला. त्यांचा प्रेमळपणा व दृढनिश्चय हीं प्रत्येक शब्दांत दिसतात. असल्या हिऱ्यांना उकिरड्यावर पडावें लागत आहे ही गोष्ट आमच्या देशबांधवांच्या लक्षांत कधीं येईल तेव्हां येवो.

मी बाहेर येईन याबद्दल मलाहि शंका वाटत नाहीं. इतकेंच नव्हे तर जास्ती जोरांत काम करण्याच्या परिस्थितींत बाहेर येईन असेंहि वाटतें. माझ्या चुका मला

आतां स्पष्ट दिसत आहेत. त्या पुनः मी घट्ट देणार नाहीं. पण बाहेर न येतां येथेंच देह पडला तरी त्यांत काय बिघडलें? पुनः मला जन्म मिळणार नाहीं असें का तुला वाटतें? हातीं धरलेलें काम पुरें होईपर्यंत वासना तृप्त होणार नाहीं. दुसरा जन्म घेतल्यानंतर तुम्हा सर्वांची भेट होणार नाहीं असें तुला वाटतें कीं काय? येवढें खरें कीं, तुझ्याकडे मात्र वडीलपणाचा मान येणार. पण मी तुला या जन्माची आठवण देऊन तुला ताळ्यावर आणीन. असो.

प्रकृतीला संभाळ. उगाच उपास कां करतोस? कणकण असेल तर थोडें घ्यावें.

मीहि आज पहाटेला चार वाजण्यापूर्वी जागा झालों होतों. गीतारहस्यांतील 'उपसंहार' प्रकरण वाचून गीतापाठाचा क्रम संपविला.

रा. गेज्जी वकील भेटायला आले होते. त्यांनीं बाबासाहेब सोमणांची प्रकृति आतां बरी असल्याचें कळवलें. तूंहि पत्र लिहून त्यांच्या प्रकृतीबद्दल तपास कर.

मला तुरुंगांत काम देतील याबद्दल तुला काळजी कां वाटावी? न देतील तर मात्र माझी तपश्चर्या पुरी झाली असें मला वाटणार नाहीं. या सरकाराकडून कोणत्याहि प्रकारची मेहरबानी करून घेण्याचा प्रसंग येऊं नये असें देवाजवळ मागणें आहे. माझ्याकडून काम होणार नाहीं असें का तुला वाटतें? तुझी चूक आहे. मी आतां अशक्त नाहीं, मनानें नाहीं, शरिरानें नाहीं, कशानेंहि नाहीं. आजचा शिपाई मला सकाळीं धीर देत होता. लढाईत पडल्यानंतर रणभूमीला मिळ्यापासून मोक्ष नाहीं, असें मला तो सांगत होता. रणबहादूर होण्यांतच मोक्ष आहे, रणभ्याड होण्यानें नरकप्राप्ति असें सांगण्याचा त्याचा रोख. मला गीतेंतील उपदेशाची आठवण झाली. याला लिहितां येत नाहीं, वाचतां येत नाहीं. ही आहे हिंदुस्थानांतील संस्कृति. तरी आमचा देश अडाणी म्हणणारे आमच्याचपैकीं लोक आहेतच. धन्य आहे त्यांची! आतां लिहिण्याचें आटपतों. हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. ११

श्री

चि. पुंडलीक यास

आशीर्वाद वि. जेवल्यानंतर थोडा कंटाळा आल्याप्रमाणें वाटूं लागलें. म्हणून हें पत्र लिहीत आहें. शिक्षा झाल्यानंतर काय काय होईल याचा विचार आला व त्यावरून काय सुचलें तें लिहीत आहें. शिक्षा झाल्यानंतर शरिराची स्वतंत्रता कमी होणारच. मनाची स्वतंत्रता काढून घेणें शक्य नाहीं. शरिराची स्वतंत्रता कमी झाल्यानें दिनचर्येंत फरक पडणार. त्यापैकीं लवकर सकाळीं उठणें व संध्याकाळीं लवकर निजणें ही इष्ट गोष्ट आहे. काम करावें लागेल. यांतहि कांहीं वावगें दिसत नाहीं. उलट, झोंपेची

विश्रांतीची किंमत जास्ती वाढवण्याचे कामी उपयोगीच आहे. काम नदिल्यास मात्र अडचण होईल. शरीरशक्तीच्या मानानें काम देतील व तें मी आनंदानें करीन. मला कामाची सवय नाही असें नाहीं. खाण्यापिण्यासंबंधानेंहि फारशी काळजी करावयाला नको. जन्मतः जरी दिवस सुखांत गेले आहेत तरी जिभेचे चोचले मी फारसे चालूं दिले नाहीत. पचेल तेवढें खाल्लें म्हणजे झालें. खादीचे कपडे घालूं लागल्यापासून कपडा जाडाभरडा म्हणून तो शरिराला नको ही कल्पनाच गेली आहे. भरड कपड्यांचें भूषणच वाटूं लागलें आहे. निजावयाला गादीची वगैरे जरुरी कधींच भासली नाहीं. मिळाली तर टाकीत होतों असें नाहीं. पण नसली तर झोंप कांहीं अडून राहत नाहीं. दररोज स्नान व कपड्यांची वगैर स्वच्छता या गोष्टी थोड्याशा प्रथम नडतील. पण याबद्दल कांहीं सवलती मिळतील अगर या लवकरच अंगवळणीं पडतील. तेव्हां याबद्दल कांही काळजी करण्याचें कारण नाहीं. एकांतवास तरी मिळेल अथवा इतर लोकांचा (म्हणजे गुन्हेगारांचा) सहवास घडेल. एकांतवास मिळाला तरी तपश्चर्येला अनुकूलताच. न मिळाला तरी एक नवा अनुभव. माझ्यावर हा प्रसंग का आला याची जाणीव या लोकांत होणें हेंहि देशहिताच्या दृष्टीनें फायद्याचेंच आहे असा माझा या १५।२० दिवसांचा अनुभव आहे. आमचें सरकार बाकी बाबतींत कांहीहि असो, पण कैद्यांना वागवण्याच्या बाबतींत मात्र अगदीं समबुद्धि आहे यांत शंका नाहीं. कोणत्याहि जातीचा, कुळाचा, वयाचा, आचाराचा किंवा गुन्ह्याचा कैदी असो, सर्वांना एक माप. (कदाचित् युरोपिअन लोकांकरितां निराळी व्यवस्था असेल व आहेहि, म्हणून मी ऐकतों.) या तुरुंगांत कैदी सर्व तरुण मुलें आहेत. माझ्या हातात जर इतकीं मुलें मिळालीं व तीं जरी गुन्हेगार असली तरी वर्ष सहा महिन्यांच्या आंत बहुतेकांना मी सुधारीन. मी सुधारीन याचा अर्थ सत्ता जर आपल्या हातीं आली तर सुधारतां येतील. पण येथें त्या संबधाचा मागमूस नाहीं. सुतारी वगैरे धंदे त्यांना शिकवीत असतील. पण त्यांच्या नैतिक आचरणाबद्दल हेळसांडच. बरें, सर्वच नैतिक दृष्ट्या गुन्हेगार आहेत असें म्हणावें तर तेंहि नाहीं. कोणी हूडपणामुळें मारामाऱ्या करून, कोणी अमदाबादच्या अत्याचारांत सामील होऊन, कोणी निरपराधी, असे किती तरी तरुण आहेत. पण सर्वांना एक माप. 'साले', 'भाचोद', 'चोर' याशिवाय संबोधनाचें विशेषण मिळत नाहीं. असो, भलतीकडे चाललों. माझी कहाणी सांगावयाचें सोडून हा संचार झाला.

या लोकांशीं राहण्याचा प्रसंग आल्यास आपल्या वर्तनाचा त्यांच्यावर परिणाम थोडाबहुत तरी होईलच. दिनचर्या बदलल्यास नुकसान नाहीं.

आप्त, इष्ट, स्नेही वगैरेंच्या भेटी होणार नाहींत, बाहेर काय चाललें आहे हें समजणार नाहीं हें खरें. पण याची सवयहि आयुष्याला आवश्यक आहे. आप्त वगैरेंचा सहवास व दररोज बातम्यांचा सुळसुळाट यांचें प्रस्थहि फार माजलें आहे. त्यामुळें आवश्यक एकांतवास व स्वतंत्र विचाराला अवसरहीं बाहेर फार कमी झालीं

आहेत. जेवण नसलें तरी चालेल, पण वर्तमानपत्रांतील तारा वाचण्याची हौस पुष्कळांना असते हें मीं पाहिलें आहे. तितकी चटक मला जरी नाहीं तरी कांहीं दिवस तसेच गेलेले कांहीं वाईट नाहीं. पहिल्या गोष्टीबद्दल प्रथम प्रथम थोडें जड जाईल पग सवयीनें त्याचेंहि कांहीं वाटणार नाहीं, असें अनुभवावरून सांगतो. अखेर चवकशीच्या पूर्वी कांहीं दिवस असे काढावे लागतात, हें तैयारीच्या दृष्टीनें बरें आहे. जेथें शिक्षा होईल किंवा नाहीं याबद्दल शंका असते त्या ठिकाणीं अशा प्रकारचा निर्बंध कदाचित् वाईट म्हणतां येईल. पण हल्लींच्या परिस्थितींत राजकीय गुन्हेगारांना (?) ही पूर्वतयारी फायद्याचीच असते. दररोज अन्तःकरण जास्ती जास्ती पवित्र होत जातें. मनाला दार्ढ्य येत जातें. पवित्रपणा व कर्तव्याची जागीव जास्ती जास्ती होत जाते. उपरती होण्यासारखे कांहीं प्रसंग आल्यास त्यांचीहि आठवण होऊन पश्चात्तापाचें प्रायश्चित्त घ्यावयाला मिळतें, वगैरे. व त्यामुळें पुढील क्रमाबद्दल पूर्ण तयारी होते. प्रसंग आल्यानंतर सर्वच मनाचा घट्टपणा दाखवितात. पुढें पुढें मन इतकें निर्ढावतें कीं, आपण तुरुंगांत आहों याचें भान देखील पुष्कळांना रहात नसेल. किंबहुना बाहेर जाणें नकोसें होत असेल. पण अशा प्रकारें मनाला घट्टपणा आणणें यांत विशेष नाहीं. हा मनाचा—मग तें असंस्कृत असलें तरी—गुण झाला. संस्कृत व निरपराधी मनाला या संवयीची देखील जरुरी नसते. भावी स्थितीचें योग्य आकलन करून त्या स्थितींत आनंदानें कसें राहावें, याची तरतूद अगोदरच तें करून ठेवतें. महात्मा गांधींच्या चळवळींत विशेष काय असेल तर हेंच असें मला वाटतें. राष्ट्राच्या मनाचा भ्याडपणा गेला. दुःखाचा आनंद मानणें हें त्या चळवळीचें रहस्य आहे. दुःख व त्याचा आनंद इतकें देखील अंतर पुढें पुढें राहणार नाहीं. दुःखाचें स्फुरण सुद्धां उरणार नाहीं. एखादा शूर ज्या वेळीं रणांत जातो व जेव्हां त्याच्यावर शत्रूच्या शस्त्रास्त्रांचा मारा होऊं लागतो त्यावेळीं दुरून पाहणाऱ्यांना अथवा केवळ कल्पना करणाऱ्यांना 'अरेरे! त्या शूर पुरुषावर कसला प्रसंग आला आहे! यांतून तो वाचेल का?' अशी हुरहुर लागते. पण त्या शूराला त्याचें कांहींच नसतें. इतकेंच नव्हे तर देहभान विसरून संकटाची कल्पना देखील मनांत न येतां तो वीररसाचा अनुभव घेण्यांत रंगलेला असतो. तीच गोष्ट या सात्विक, शुद्ध, आत्मबलाच्या लढाईची आहे. ही गोष्ट गांधींनीं राष्ट्राला शिकविली, व राष्ट्र शिकत असल्याचें स्पष्ट दिसत आहे. *या शिकवणीनें राष्ट्राचा उद्धार झाल्याशिवाय कसा राहील? हीच शिकवण माझ्या मनांत* ठसूं दे. माझ्या आप्तांच्या इष्टांच्या मनांत ठसूं दे, म्हणून परमेश्वराची प्रार्थना रोज करीत असतों. तूंहि करीत जा. आज चि. चिमूताईला पाहतां तिची मुद्रा शांत दिसली. परवां एकदां आली होती, तेव्हां ती बावरल्यासारखी दिसली. तुम्ही देशाकरितां तुरुंगांत आहांत, आम्हांला त्याबद्दल कांहीं वाटत नाहीं, असें तिनें मला सांगितलें. हें ऐकून माझ्या पहारेवाल्यानें देखील धन्योद्गार काढले व माझ्या कुलांतील रक्ताचा हा गुण आहे असें तो म्हणाला. पहा, काय दिव्य शक्ति देशांत संचरत आहे. कोणाचें तरी ऐकून

ही योल्ली असेल असें मला वाटत नाहीं. घरांतील मंडळींच्या वृत्तींत बदल झालेला असला पाहिजे. शौकतअल्लींनीं कोर्टात सांगितलें कीं, आम्ही भाऊ गेलों तरी पर्वा नाहीं, माझी आई, माझी भावजय कामें करताहेत, आमचें काम मागें पडणार नाहीं. असेच हें युद्ध संपेपर्यंत म्हणण्याचें प्रत्येकाच्या वाटणीला आलें पाहिजे व येईल अशीं चिन्हें दिसत आहेत. असो. फारच वहात गेलों.

एकंदरींत माझ्या भावी स्थितीबद्दल अगदीं काळजी करूं नका, निर्धास्त असा. बाहेर आल्यानंतर 'आश्रम' उत्तम प्रकारें चालविण्याची पात्रता दाखवीन व तुझी घमेंड मोडीन. कळावें हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १२

श्री

चि. पुंडलीक यांस

आशीर्वाद वि. मला तुझ्या मनाच्या चंचलत्वाची कींव येत्ये. कराचीची हकीकत वाचून धाबरलास झालें! क्रॉनिकलनें लिहिल्याप्रमाणें यांत अलीबंधूंचा काय कमीपणा आहे? हा अपमान देशाचा आहे. अशी स्थिति असून देखील अद्यापि लोकांची चैन चालली आहे हें पाहून वाईट वाटतें. पण जागृति होत चालली आहे हें कांहीं कमी नाहीं. १२।१५ वर्षांपूर्वीच्या स्थितीला व हल्लींच्या स्थितीला जमीनअस्मानाचें अंतर पडलें आहे, इकडे पाहून समाधान वाटतें. तुरुंगांतील गोष्ट सोडून दिली, तरी बाहेर तरी काय चाललें आहे? बाहेर तुरुंग नाहीं काय? केवळ खाणेंपिणें, पोषाख, वगैरेंतच माणसुकी आहे काय? राष्ट्राच्या शीलाचा, वीर्याचा ऱ्हास कसा होत आहे तो पाहून डोक्यावर कातडें ओढून घेण्याचा प्रसंग व तुरुंगांतील आपत्ति यांत काय फरक? मला तर कांहीं फरक दिसत नाहीं. कराचीचें चाललें आहे असेंच झालें पाहिजे. शांत राहून आपलें कर्तव्य केलें पाहिजे. अलीबंधूंची ही वागणूक पाहून त्यांच्याकरितां आपल्या जिवाची कुरबानी करणारे त्यांचे मित्र नाहींत काय? पण सबूर! अन्यायाचे घडे भरावयाला देखील काळाची अपेक्षा आहे.

बाबासाहेब सोमणांची योग्यता माझ्यापेक्षां किंचित् जरी कमी समजशील तरी ही तुझी चूक होईल. असो. याबद्दल पुढें भेटींत बोलूं.

घरच्या मंडळींना धीर देऊन पाठीव. ती. अक्कांच्या मनांत कृष्णा नको असेल तर माझा आग्रह नाहीं. त्याला जा म्हणून मी सांगेन. त्याला मी या बाबतींत सक्त ताकीद दिली आहे. मी नसतांना देखील हें करण्याचा पूर्ण अधिकार तिला आहे. मग त्याबद्दल उगीच इतका व्याप कां? तिच्या मर्जीप्रमाणें तिनें करावें, व त्याप्रमाणें मी बाबासाहेबांना व गोविंदरावांना कळविलें आहे.

रात्रीं जागूं नकोस. काळजी करूं नकोस. माझी सर्व प्रकारची तयारी आहे.

उद्यां जर अल्लीबंधू वगैरेंना तुरुंगांत चांगलें वागवतात असें कळलें तर तुझी चीड कमी होणार कीं काय? मला खात्री आहे कीं, त्यांना चांगलें वागवण्याचा हुकूम एक-दोन दिवसांत जाईल. पण त्यांत काय आहे? वॉटरफील्डकडेच खटला चालतो हें बरें आहें. मला आनंद झाला. आमच्याच लोकांकडून अन्याय करवण्याची युक्ति जुनी आहे. माझ्या खटल्यांत तरी ती साधत नाहीं हें बरें आहे. आमच्या हिंदी माणसांनीं पुष्कळ वेळां मनाविरुद्ध केवळ चतकोर भाकरीच्या तुकड्याकरितां सर्वस्वी गुलामगिरी पत्करलेला देखावा पहाण्यापेक्षां हें बरें. तुलाही असेंच वाटत नाहीं काय?

बाहेरून मला दुसऱ्या बातम्यांची जरूरी नाहीं. स्वराज्याची स्थापना झालेली बातमी कळतेच आहे. त्याचीच वाट पहात आनंदानें कालक्रमण करीत बसतो. बाकी सर्व ठीक आहे. मला तुरुंगांत कसें वागवतात याबद्दलचा गाजावाजा व्हावा अशी देखील माझी इच्छा नाहीं. गरिबी, हाल, पूर्ण पराधीनता वगैरेंचा अनुभवहि येणें जरूर आहे. तरच खरी सहानुभूति माझ्यासारख्या मठ्ठ मनुष्याच्या मनांत उतरेल व कार्याला माझ्याकडून जास्ती मदत होईल. तेव्हां जें कांहीं होत आहे तें बरेंच आहे.

आनंदानें त्रास भोगणें यांतच या चळवळीचा जर विजय आहे तर मग मला त्रास होतो ही गोष्ट विजयाचें चिन्ह नव्हे काय? विनाकारण मोहांत पडूं नकोस, दुसऱ्यांना पाडूं नकोस.

नुसत्या भाकरीवर वगैरे राहण्याचा तुझा विचार आतां कां म्हणून! मी बाहेर आल्यानंतर प्रत्यक्ष अनुभवलेल्या अन्नाचाच तुला खुराक देईन. उगीच आतां तुला कल्पनेवर अवलंबून राहावें लागणार. हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १३

श्री

चि. पुंडलीक यांस

आशीर्वाद वि. आज खूप लांब लिहावें म्हणून बसलों खरा, पण काय लिहावें हेंच सुचत नाहीं. बहुतेक सर्व तयारी करून बसलों आहें. सर्व दृष्टींनीं विचार करून ठरविलें आहे. तुझ्याबद्दल व घरच्या मंडळीबद्दल, बाबासाहेब, गोविंदराव वगैरेंबद्दल काळजी वाटते. पण माझ्यापेक्षां परमेश्वर काळजी करणार जास्ती समर्थ आहे. आज-पर्यंत परमेश्वरानें लक्षावधि प्राणी, जीवजंतु उत्पन्न केले असून त्या सर्वांची काळजी तो वहात असतोच असें म्हणतांना पुष्कळांच्या तोंडून ऐकत होतों. पण त्याबद्दल विचार करण्याचा प्रसंग नव्हता. आतां विचार केला व हें तत्त्व पटलें. मी बाहेर राहून तरी काय करणार? उगाच अभिमानानें कांहीं तरी कोते विचार मनांत येतात झालें!

तेव्हां या विषयाकडेहि मन कमीच जावें असा प्रयत्न सुरू आहे. या चारदोन दिवसांत कांहीं तरी दिशा लागेल.

Civil disobedience च्या चळवळींत तूं जावेंस असें मला वाटूं लागलें आहे. इकडे मनाजोगें जुळल्यास इकडेच जावें. नाहीं तर अमदाबादला जावें. गोविंदरावांच्या एकंदर बोलण्यावरुन इकडे आमच्या भागांत फारशी तयारी दिसली नाहीं. कदाचित् माझा गैरसमज झाला असेल. स्वतः गोविंदरावांनीं जाऊं नये असें मला वाटतें. त्यांची प्रकृति बरी नाहीं. स्वतः किंवा अन्य कोणीहि जावो, गांधींनीं घातलेल्या अटी मनापासून मान्य असतील तरच जावें. Policy म्हणून जाण्यांत गौणपणा आहे. या अटींचा मीं विचार केला व त्या मला पटल्या. पण जाणें टाळण्यासाठीं अटी मान्य नाहींत असें मात्र म्हणूं नये. मला मात्र वडीलपणाचा मान आयता मिळत आहे. तथापि मुद्दाम कायदा मोडून संकट अंगावर घेण्यांत जास्ती मौज आहे. तितका ह्लींच्या स्थितींत कमीपणा आहे. या चळवळीचें काय होणार इकडे लक्ष लागणें साहजिक आहे. पण बातमी पुढें समजणें मुष्कीलीचें आहे. ज्या तुरुंगांत मी असेन तेथें जर कोणी बाहेरुन आलें तर बातमी समजण्याचा मार्ग. पाहूं काय होईल तें. मी सुटेन अशी तुला आशा वाटूं लागली आहे असें तुझ्या कालच्या वृत्तीवरुन वाटलें. पण उगीच अशी आशा करूं नकोस.

गोविंदरावांनीं Civil disobedience करूं नये असें माझें म्हणणें आहे हें त्यांना कळीव. बाबासाहेबांनीं सत्याग्रह करुन तुरुंगांत जावें. करगुपीकर, मजली तर जातीलच. बेळगांव जिल्ह्यांतून एक हजार माणसें तयार झालीं पाहिजेत. खटपट केल्यास मिळतील. पण पवित्र मनाचीं व तत्त्व पटलेलीं असलीं तर परिणाम होईल. आतां कंटाळा आला. सकाळीं कांहीं सुचल्यास लिहीन.

काल रात्रीं थोडें अंग तापलें होतें. विशेष नाहीं. आज क्विनीन घेतलें आहे. जा गेला माझा कंटाळा आला असावा. सोमवारीं अगर मंगळवारीं ही जागा सोडण्याची वेळ आलीच आहे.

स्टेटमेंट कोणास तरी दाखवावें असें वाटूं लागलें आहे. रा. मजली जर शनिवारीं अगर रविवारीं येतील तर त्यांना दाखवावें. नाहीं तर आयत्या वेळेस काय होईल तें खरें.

आज बरें वाटतें. प्रकृति बरी नाहीं म्हणून ती. अव्वांना कळवूं नकोस. हवेंत गारठा आल्यानें असें झालें असेल.

मला कोणत्या तुरुंगांत नेतील हें दोनतीन दिवसांत कळेलच. तेथील व्यवस्था कशी काय लागते पाहूं. येथील संसार आहे त्यांत बराच थाटला होता. दोन वर्षांची तरी शिक्षा खास होणार. मध्यंतरीं सुटण्याचा संभव बाहेरच्या चळवळीवर अवलंबून आहे. जोर झाल्यास तडजोडीला प्रकरण येईल. इंग्रज इतके हुषार आहेत. जोर होत नाहीं असें झाल्यास दडपून टाकतील. पुनः केव्हां प्रसंग येईल तेव्हां पाहतां येईल. इतके

ते वस्ताद आहेत. एकटे बिचारे गांधी काय करणार! अगदीं आणीबाणीच्या प्रसंगीं भलत्याच गोष्टीवर वाद माजविण्यांत कालाचा अपव्यय होतो ही गोष्ट अद्यापि आमच्या मंडळीच्या लक्षांत येत नाहीं. असो. हा आशीर्वाद

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १४

श्री

चि. पुंडलीक यांस

आशीर्वाद वि. पत्रें वाचलीं. पत्रें वाचण्याला कंटाळा येत नाहीं हें मागें तुला एकदां मी कळवलें होतें. कंटाळा जरी न आला तरी मनाचा कठोरपणा मात्र खास ढळतो, व नकळत डोळे भरून येतात. यालाच बाबासाहेब मित्रेपणा म्हणतात. पण स्वभावाला औषध नाहीं. मी मित्रा नाहीं, पण मऊ आहें. या मऊपणाला घट्टपणा आणण्याचें काम करीत आहें. पुढील दोनतीन वर्षें अनुकूलच होतील. घट्टपणा म्हणजे शुष्कपणा नव्हे हें तूं जाणतच आहेस.

दृष्टिसृष्टि न्याय हा एकंदरींत जगांतला अनुभव सांगितला. याला अपवाद नसतील असें माझें म्हणणें नव्हतें. अपवाद नसला तरी त्यांत विशेष मनाला लावून घेण्यासारखें कांहीं नाहीं इतकेंच सांगण्याचा माझा मतलब होता. तुझी गोष्ट एका बाजूला ठेव. इतरत्रहि मी स्नेह्यांच्या बाबतींत सुखी आहें. हे उद्गार मीं पुष्कळ वेळां काढले आहेत. मी प्रत्यक्ष हजर असतां जो अनुभव आला तोच माझ्या पश्चात्‌हि येईल असा मला भरंवसा आहे. तथापि माझा अदमास चुकल्यास ती चूक माझी नसून नियमाप्रमाणेंच होत आहे असें मानण्याकरितां मी तें बोललों. पण तेवढ्यावरून कोणासंबंधानें आदर कमी आहे असें समजूं नको. उलट, मला माझ्या स्नेह्यांच्या उपकारांबद्दल आठवण झाली म्हणजे प्रेमानें अंतःकरण भरून येतें, व उलट माझ्याकडून कांहींच झालें नाहीं म्हणून वाईटहि वाटतें. याकरितां सगळ्यांना सांग— माझे हे विचार सर्वांना सांग. मी गेल्यावर सांग. गोविंदरावांच्या संबंधानें हे उद्गार मीं काढले होते. गोविंदरावांबद्दल माझें मत काय आहे हें तुला माहीतच आहे. तीन *गोष्ट थोड्याबहुत प्रमाणांत सर्वांच्यासंबंधानें. म्हणून मला गड्ड करून घेऊं नकोस.* आणखी कांहीं शंका असली तर विचार. दोन दिवस आहेत त्याचा फायदा घे.

आज प्रकृति बरी आहे. काळजी करूं नकोस. घरची मंडळी फाळजींत नाहींत हें बरें आहे. अखेर झाल्यानंतर हीच स्थिति राहिली पाहिजे. याकरितां तूं एकदम अमदाबादेस न जातां आतांपर्यंत ज्याप्रमाणें अव्वांना वगैरे धीर देण्याचें काम केलेंस त्याचप्रमाणें कांहीं दिवस करावें. तोंपर्यंत गुजरातेंतील C. D. कसा काय होतो हेंहि पहाण्यास मिळेल. गांधींची इच्छाहि तशीच आहे. C. D. बद्दल तुझी तयारी आहे. कष्ट सोसशील.

पण ज्या भावनेनें कष्ट सोसले पाहिजेत ती भावना मुख्य आहे. कष्ट सोसल्यानें स्वराज्य मिळवण्याचे कामीं मदत कशी होणार हें तुला अद्यापि तितकें पटलें नाहीं असें तूंच कबूल करीत आहेस, म्हणजे भावनेंत थोडा कमीपणा आला. तथापि 'स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात्' 'नेहाभिक्रमनाशोस्ति' वगैरे भगवंताच्या वचनांवर विश्वास ठेवून आपल्या हातून होईल तितकें करण्यास प्रारंभ करावा. बुद्धि मात्र ही ठेवावी कीं, जें काम आज मी केवळ श्रद्धेनें करीत आहें तेंच मला लवकर मनानेंहि पटावें. म्हणजे श्रद्धा व बुद्धि एक होऊन कार्य यथासांग होईल.

जी मंडळी येतील त्यांची व्यवस्था चांगली ठेव. माझ्याकडेच सर्व लक्ष ठेवूं नकोस. बाकी सर्व ठीक आहे. उद्यां आणखी लिहीन. माझ्या बाबतींत तूं जें कांही करीत आहेस किंवा करशील, व आजपर्यंत केलें आहेस त्याला मी 'सेवा' म्हणत नाहीं. परवां सहज तोंडाला आलें तें बोललों. 'परिहासविजल्पितं' म्हणून तुझी क्षमा मागतों. हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १५

श्री — शुक्रवार रात्रीं ७

चि. पुंडलीक यांस

आशीर्वाद वि. आज संध्याकाळच्या तुझ्या स्थितीवरून तूं बराच अस्वस्थ झाला आहेस असें वाटलें. माझ्या प्रकृतीबद्दल काळजी वाटणें साहजिक आहे. पण घाबरून काय होणार ? सोमवारीं तूं कोर्टांत न येशील तर बरें. तुझ्या घाबरेपणाचा संसर्ग मलाहि लागावयाचा ! गोविंदराव वगैरेहि मंडळी निकालाच्या वेळीं नसलेली बरी. उगीच गाजावाजा (fuss) नको. आलिया भोगासी असावें सादर। देवावरि भार घालुनीया !

मला शिक्षा झाल्यानंतर दुसरीकडे कोठें तरी नेणारच. परंतु दुसऱ्या ठिकाणीं नेल्यानंतर १० दिवस क्वारंटाईन असते. त्यावेळीं काम वगैरे कांहीं देत नाहींत. म्हणून तुरुंगांतील खरी स्थिति कळण्याला कांहीं मार्ग नाहीं. याकरितां अपीलकरितां Instructions द्यावयाचे आहेत म्हणून कोणीतरी एकदां भेटण्यास आला तर भेटू देतील. म्हणजे त्यांच्याजवळ काम वगैरे कसें आहे हें सांगतां येईल. काम नसते वेळीं कामासंबंधानें काय सांगणार ? सांगून कांहीं अर्थ आहे असें नाहीं. पण बाहेर तुम्हांला कळेल इतकेंच. हें तरी स्पष्ट सांगतां येईल किंवा नाहीं कोणाला माहीत ! स्पष्ट सांगतां न आलें तर कांहीं तरी भाषा ठरविली पाहिजे व ती तूं भेटावयाला येणाऱ्या माणसाला कळविली पाहिजेस व त्याला पढवून त्यानें ध्यानांत धरली पाहिजे. अपील तर करावयाचें नाहींच. पण मी अपील करा, अमक्याला वकील द्या, बॅरिस्टर द्या, कांहीं खर्च आला तरी हरकत नाहीं अशा प्रकारची भाषा बोलूं लागलों म्हणजे कामाचा त्रास होत आहे

असें समजावें. असो. तूर्त तरी इतकें ठरवूं. मग पुढें कशी काय सवड निघते पाहतां येईल. सत्पट केल्यास सवड निघेल. पण पुढचें पुढें. प्रकृतीला बहुत करून कांहीं होणार नाहीं असें वाटतें.

या महिन्यांत मात्र घरून खूप चांगलें खावयाला घातलें. त्यामुळें जीभ लालचावली आहे. चारआठ दिवस त्रास होणार. ती. अन्नांना सांगावें कीं, अशा प्रकारें जन्मांत माझ्या खाण्याचे लाड कोणीहि, तूं देखील पुरविले नाहीस. तेव्हां बाहेर आलों म्हणजे माझी बरदास्त अशाच प्रकारें ठेवावी. नाहीं तर पुनः तुरुंगांत जाण्याची मला तयारी करावी लागेल!

मला वाटतें मी येथें आल्यापासूनच जर येथील मिशीतील म्हणजे स्वयंपाकाचें आमंत्रण घेऊन सरकारचा सर्वस्वी पाहुणा झालों असतो तर बरें झालें असतें. या एक महिन्याच्या अभ्यासानें बरीच संवय झाली असती. विप्रः पश्चात् बुद्धिः। रा. मजली यांना पत्र लिहावें म्हणतों. पण लिहिणें न झालें तर माझा निरोप सांग. काय निरोप हें संध्याकाळीं सांगितलेंच आहे. कोर्टांत जर प्रत्यक्ष भेट झाली तर मीहि सांगेन.

काल यावेळीं थोडी कणकण वाटत होती. आज कांहीं नाहीं. उद्यां साफ होईल. सोमवारीं सामना आहेच.

ज्यांचा या चळवळीवर विश्वास नाहीं त्यांना किती माणसें तुरुंगांत गेलीं म्हणून काय होणार आहे, असें वाटतें. सरकार इतके निगरगट्ट आहे कीं, इतक्या माणसांना तुरुंगांत घालून आपलें चालवावयाचें तेंच चालवतीलच. पण मला तसें वाटत नाहीं. गांधींचा अंधभक्त मी नाहीं. या वेळीं खूप चळवळ करून गांधींना पाठिंबा दिल्यास काम होईल. खिलाफतचा प्रश्न सुस्त चालला आहे. कमाल पातशहानें तह केला म्हणजे त्या प्रश्नाचा निकाल लागल्याप्रमाणेंच आहे. पंजाबची गोष्टहि होईल व स्वराज्याबद्दल बोलणें सुरू होईल. पण एवढें होण्याला खूप चळवळ झाली पाहिजे. माझें सांगणें कदाचित् कित्येकांना लांड्या कोल्ह्याप्रमाणें वाटण्याचा संभव आहे. पण खरोखर तसें नाहीं. पुष्कळ सत्याग्रही तुरुंगांत आल्यानें माझा त्रास कमी होणार असें मुळींच नाहीं. किंवा पुष्कळांच्या तुरुंगांत येण्यानें मी केलें तें बरोबर किंवा चूक हें ठरणार आहे अशांतीलहि प्रकार नाहीं. कोणी करोत किंवा न करोत, माझ्या बुद्धीला जें योग्य वाटलें तें माझा धर्म म्हणून मी करीत आलों. तो मार्ग शहाणपणाचा असो किंवा मूर्खपणाचा असो. मला त्यांतच मोक्ष आहे अशी माझी प्रामाणिक समजूत आहे व त्याच मार्गानें गेल्यास—व आतांच गेल्यास—देशालाहि मोक्ष आहे असें मनापासून वाटतें. याउपर काय व्हावयाचें तें होतच आहे.!

पत्र बरेंच लांबलें. पुनः उद्यां कांहीं तरी लिहीन. रा. श्रीनिवासराव कौजलगी यांचा या चळवळीवर भावनापूर्वक विश्वास असेल असें मला वाटत नाहीं. रा. मजली, करगुपीकर यांचा विश्वास आहे. त्यांनींच पुढाकार घेतला पाहिजे. नुसती seniority म्हणून चालवयाचें नाहीं. हा मानाचा प्रश्न नाहीं. शुद्ध अन्तःकरण, शुद्ध आचरण,

शुद्ध भावना, श्रद्धा इत्यादि गुणांचा हा प्रश्न आहे. तेव्हां आमच्या मंडळींनीं मागें राहूं नये. विनय हा पराक्रमाचा अलंकार आहे खरा, पण तो अपात्रीं अवेळीं दाखविला गेला तर तोच दोष होऊन कार्यहानि होते. हें मुद्दाम मजली करगुपीकरांना सांग. सबंध कर्नाटकांत मला त्यांच्या तोडीचीं माणसें दिसत नाहींत. मला मात्र या दोघांनीं पुरतेपणीं ओळखलें नाहीं हें माझें दुर्दैव. असो. झालें तें झालें. हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १६

श्री

चि. पुंडलीक यांस

आशीर्वाद. वि. तुझें पत्र रात्रीं पोचण्यापूर्वीच मी एक लिहून ठेवलें होतें. तें व हें मिळूनच देत आहें. तुझें पत्र व त्यांतील हुरूप पाहून आनंद झाला. याच धोरानें काम सर्व माणसें करतील तर खरोखर आम्ही सर्व अमदाबादच्या कॉंग्रेसला हजर राहूं. तूं म्हणतोस त्याप्रमाणें गांधींच्या चळवळीला शुद्ध श्रद्धेची जोड पाहिजे. केवळ तर्कावर निभाव लागणार नाहीं. गेल्या ३०–४० वर्षांच्या चळवळींत जर कांहीं दोष असेल तर तो हाच होता. इंग्रजांच्या स्वाभाविक असलेल्या आसुरी वृत्तीच्या संसर्गानें आमच्यांतील श्रद्धा व भावना पूर्णपणें लयाला गेली, व सर्व तर्कावर येऊन बसलें. तर्क अजिबात सोडावा असें माझें म्हणणें नाहीं. पण तर्काला भावनेचें अधिष्ठान पाहिजे. नाहीं तर तर्क शुष्क होतो व कार्यहानि होते. लो. टिळकांनीं तर्कावर किती जरी जोर दिला असला तरी व वरवर पहाणाऱ्यांना त्यांनीं केवळ तर्कावरच भर दिला होता असें दिसलें तरी आत्मविश्वास, आपल्या देशावर विश्वास, परमेश्वरावर श्रद्धा व स्वार्थत्यागाच्या शक्तीची जाणीव त्यांना पूर्णपणें होती असेंच त्यांच्या चरित्रावरून मी अनुमान काढतों. त्यांच्या चरित्राच्या अवलोकनानें हेंच मी शिकलों. त्यांच्या गीतारहस्याचा शांतपणें या महिन्यांत मीं अभ्यास केला व माझें हेंच मत दृढ झालें. आतां इतकें खरें कीं, महात्मा गांधींनीं ही गोष्ट जास्ती प्रामुख्यानें पुढें आणली. याचें कारण हेंच कीं, बुद्धीला पटविण्याचें कार्य संपलें होतें. आतां भावना जागृत करून धीरानें त्या बुद्धीला दृढ करण्याचें काम राहिलें होतें. पुष्कळ गोष्टी पटल्या तरी करवत नाहींत. याला कारण बुद्धिदोष हा अत्यंत आवश्यक ती श्रद्धा, भावना यांचा अभाव हाहि आहे. ही श्रद्धा जागृत करण्याचें काम जोंपर्यंत होत नव्हतें तोंपर्यंत सरकार आमच्या सर्व भडपडीकडे दुर्लक्षच करून स्वस्थ बसलें होतें, व त्यांना आरंभीं तशीच आशा होती. पण गांधींनीं अगदीं गड्ड्याला हात घातला व त्यांत त्यांना यश येऊं लागलें असें जेव्हां समजलें तेव्हां ही सरकारची धडपड चालू झाली आहे. पण लोकांनीं नेट दाखविल्यास सरकारला त्यांत अपयशच येणार. अंतःकरण शुद्ध असलें म्हणजे श्रद्धा सामर्थ्यवान होते. याकरितां गांधींचा पवित्र

आचरण, पवित्र विचार, प्रेम, समबुद्धि वगैरेबद्दल विशेष कटाक्ष आहे. बुद्धि कितीहि तरतरीत असली तरी ज्यावें तसें काम होत नाहीं. उत्तम भावना व सतत उद्योग यांनीं अतिशय कार्य होतें. बुद्धीची जोड असेल तर उत्तमच. पण सर्वसाधारण बुद्धीहि चालते. बुद्धि डोक्यांत असून भावना व सतत उद्योग यांची व्याप्ति ज्या दिवशीं होईल त्याच दिवशीं स्वराज्यप्राप्ति झाली म्हणून समजावें. हे गुण जर राष्ट्रांत आले नाहींत तर स्वराज्य मिळालें तरी तें टिकणार नाहीं, व पुनः फसगत होईल. म्हणून आतां वाटाघाट न करतां एकदां कामाला प्रारंभ करा. राष्ट्रानें एकदां प्रतिज्ञा केली, ती तडीला न्या. त्यांतच आपला व आपल्या देशाचा उद्धार आहे.

तूं म्हणतोस त्याप्रमाणें मजली व करगुप्पीकर हीं दोन्हीहि भावनाप्रधान माणसें आहेत. त्यांच्याकडून पुष्कळ काम होईल अशी मला आशा आहे. मी त्यांना निराळें काय म्हणून लिहूं? त्यांच्यासंबंधीं मी काल बोललों आहे तें तूं त्यांना सांग. मी काय लिहिलें आहे तें त्यांना दाखव म्हणजे झालें.

मी म्हणतों याची सत्यता गोविंदरावाच्या उदाहरणावरून स्पष्ट आहे. गोविंदरावा-पेक्षां त्यांचा कृष्णराव माझ्या सहवासांत जास्ती असता तर त्याचा उपयोग जास्ती झाला असता. गोविंदरावाला कमीपणा देण्याच्या उद्देशानें मी हें लिहीत नाहीं. पण मला असें वाटतें.

असो. पुनः लिहावें असें वाटलें तर लिहीन. नाहीं तर पुष्कळ लिहिलें आहे. तुझ्याबरोबर किती तरी बोललों आहें. यापेक्षां जास्ती काय सांगूं अथवा लिहूं? माझ्याजवळ तरी जास्ती काय असणार?

माझ्याबरोबर तूं शर्यत लावली आहेस, हें ठीकच आहे. तपश्चर्येंत माझा पराभव होऊन तूं व माझे दुसरे स्नेही विजयी झाले तर माझ्याइतपत आनंद दुसऱ्या कोणाला होणार?

आज प्रकृति बरी आहे. कळावें हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

[पत्र नं. १७:—धारवाड जेलमधून गंगाधररावांना विजापूर जेलमध्यें हलविण्याचा दिवस व वेळ अधिकाऱ्यांनीं अत्यंत गुप्त ठेविली होती. तथापि त्याचा पत्ता लावून त्यांच्याच गाडीनें त्यांच्या बरोबरच विजापूरपर्यंत जावें असा माझा प्रयत्न होता. रोज प्रत्येक गाडीला धारवाड स्टेशनवर जाऊन विजापूरचें तिकीट काढून मी गाडींत बसत असें, आणि गंगाधरराव गाडी सुटेपर्यंत न आले तर तें तिकीट परत करून मी पुनः गांवांत परत येत असें. काय तीनचार आणे तिकीट परत करण्यामध्यें खर्च होतील ते होतील! हा कार्यक्रम चारपांच दिवस रोज प्रत्येक गाडीच्या वेळीं मीं चालविला

होता. गंगाधररावांना ज्या गाडीनें विजापूरला नेतील त्या गाडीनेंच मी पूरपर्यंत येणारच असें गंगाधररावांनाहि वाटत होतें. शेवटीं त्यांत मला यश आल्याचें गंगाधररावांना, गाडी एक स्टेशन गेल्यानंतर, दिसून आलें. धारवाड स्टेशनवर मला गंगाधररावांचे डोळे हुडकत होते हें मी पहात होतों. पण धारवाड स्टेशनवर मी त्यांना दिसलों नाहीं, तेव्हां या लपंडावामध्यें मी पराजित झालों अशी गंगाधररावांची खात्री झाली होती. रात्रीं विजापूर तुरुंगांत त्यांना पोहोंचवून मी परत आलों. त्याच दिवशीं रात्रीं विजापूर तुरुंगामध्यें त्यांनीं लिहिलेलें पत्र मजकडे श्री. कौजलगींच्या घरीं पाठविण्याची 'व्यवस्था' गंगाधररावांनीं केली होती. —पुंडलीक.]

## पत्र नं. १७

श्री

चि. पुंडलीक यास

आशीर्वाद वि. तूं आज भेटशील असें मनाला वाटलें होतें. त्याप्रमाणें भेटलास. पण जसा भेटावास असें वाटत होतें तसा भेटला नाहींस. कोर्टांतच तुझा गोरामोरा झालेला चेहरा मीं पाहिला. पुनः इतरांचे चेहरे मी पाहिले. गेल्या सोमवारच्या (म्हणजे खटल्याच्या पहिल्या दिवसाच्या) प्रमाणें दिसले. तेव्हांपासून माझी काळजी दूर होऊन विश्वरूपदर्शन झाल्याप्रमाणें झाले असें मी लिहिलें होतेंच. तसेंच आज झालें. त्यामुळें मनावर यत्किंचितहि परिणाम झाला नाहीं. उलट एवढ्या थोड्या अवधीच्या प्रायश्चित्तानें तपश्चर्या पुरी होईल किंवा नाहीं असें मनांत येऊन एक प्रकारची काळजी उत्पन्न होत आहे. मी अगदीं शांत आहें. तपश्चर्या पुरी करण्याचा प्रयत्न करून जास्ती जोरानें काम करण्याच्या तयारीनें परमेश्वराच्या कृपेनें सहा महिन्यांच्या आंतच परत बाहेर येईन असा भरंवसा वाटत आहे. तूंहि खूप तयारी कर. दोघेहि मिळून खच्चून काम करून या मायदेशाच्या ऋणांतून मुक्त होण्याचा प्रयत्न करूं. व्याख्यानें वगैरेचा काल जात चालला आहे. बोलण्याचें कांहीं शिल्लक राहिलें नाहीं. पुढील कार्याची सर्व रूपरेखा आंखून घेऊन येतों. तूंहि तसेंच कर. मी येईपर्यंत बोलण्याच्या वगैरे भरीस पडूं नकोस. स्वस्थ बसून मनाला तयार कर. अजूनीहि मन तयार नाहीं. माझ्याकरितां तरी कच्चें कां असावें? आरंभापासून शेवटपर्यंत 'मी चुकलों नाहीं' इतकें झालें म्हणजे झालें. आणि तितकें झालें असावें असें मला वाटतें. आज दोनप्रहरीं तुझ्याजवळ दिलेलें पत्र काकासाहेब कालेलकरांच्याकडे पाठीव. कर्नाटक बंधूंना लिहिलेलें पत्र छापवलें तर छापवलें. पण छापवण्यासारखें त्यांत कांहीं नव्हतें. असो. मी येईपर्यंत दररोजची डायरी ठेवीत जा व महत्त्वाच्या बातम्या एकीकडे लावून ठेव. Chronicle चें पद्दल ठेवण्यास बाबागादेंयांना सांग.

माझे हाल होणार नाहींत असें वाटतें. झाले तरी त्याबद्दल पर्वा कां करावी? मी कांहीं माझ्या सोयीकरितां तोंड वेंगाडणार नाहीं. आयुष्यच भरलें असेल तर येथें मुक्ति खास मिळणार. अथवा जास्ती सामर्थ्यवान होऊन गीतेच्या सहाव्या अध्यायांत सांगितल्याप्रमाणें 'पार्थ नैवेह नामुत्र' वगैरेसारखी माझी स्थिति होणार. कांहीं झालें तरी इष्टापत्ति! पण, इतकें भाग्य घेऊन पुनः बाहेर येणार. कदाचित् सहा महिने देखील तुरुंगांत काढावे लागणार नाहींत. एक दिवस तर गेलाच. म. गांधींच्या सहज स्फुरणांत आल्याप्रमाणें देखील घडेल. तूं मात्र गडबड करूं नकोस. स्वस्थ रहा. मन तयार कर. मागें तूंच एकदां लिहिल्याप्रमाणें तुझी माझी शर्यत. ती. अव्वा, चि. तारका वगैरे सर्वांना सांभाळ.

सर्व थोर मंडळींना नमस्कार, लहानांना आशीर्वाद. आतां लांबवीत नाहीं.

आज सकाळीं जेलर आला होता. त्याचे बोलण्याकरून मला येथें ठेवतील असें वाटत नाहीं. येथें ठेवावयाचें ठरलें तर या मंडळींची भेट घ्यावी. तथापि दोनचार दिवस तरी येथें राहीन असें वाटतें. तोंपर्यंत तर संभाळलें पाहिजे. संभाळावयाचे मार्ग तुम्हाला माहीतच आहेत. मी काय सांगूं? दांताची आशा अद्याप गेली नाहीं. कळावें हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

[पत्र नं. १८:—हें पत्र येरवडा जेलमधून लिहिलेलें आहे. माझ्या 'हिंदी शिक्षक' पुस्तकाची पहिली आवृत्ति छापविण्याच्या बाबतींत मीं एक पत्र श्री. दा. वि. ऊर्फ बाबूराव गोखले यांच्याबरोबर—त्यांच्या भेटीच्या वेळीं देण्यासाठीं—पाठविलें होतें. गांधीजींचे विचार मला तितकेसे पटत नाहींत याचा ओझरता उल्लेख मीं माझ्या पत्रांतून केलेला होता. त्याबद्दल कोणताहि अभिप्राय व्यक्त न करतां, माझ्या पत्राचें उत्तर कै. ती. गंगाधरराव यांनीं लिहिलेलें आहे. पण या पत्रामध्यें मला पाहिजे असलेलें उत्तर मला मिळालें. आणि त्यांच्या मनांत मला जें कळवावयाचें होतें तें त्यांनीं कळविलेलें आहे. —पुंडलीकजी]

## पत्र नं. १८

श्री

आशीर्वाद वि. तुझें पत्र रा. बाबूरावामार्फत पोचलें. पत्र लहान होतें म्हणून तुझें अभिनंदन केलें पाहिजे असें एकवार वाटलें होतें. पण लांब पत्र असतें तर तुझें अन्तःकरण मला स्पष्ट दिसलें असतें. तें लहान पत्रावरून दिसत नाहीं. म्हणून माझ्यावर तूं सूड उगवून घेत आहेस असें म्हणून अभिनंदन करीत नाहीं. असो. प्रकृति चांगली आहे.

मेद झडला आहे. दूध, तूप वगैरे मेदोत्पादक पदार्थांचा अभाव असल्याकारणानें अंग होणें साहजिक आहे. शौचाबद्दल दररोज औषध मिळतें. त्यामुळें बरें आहे. रा. वासुदेवराव (वासुकाका जोशी) भेटले होते. त्यांना तुझे पुस्तक छापण्याबद्दल कळविलें आहे. रा. बाबूरावानांहि तसें कळवलें आहे. खर्चाबद्दल मी जबाबदार आहें असें त्यांना सांगितलें आहे. मे महिन्यापासून तूं माझ्याबरोबर रहावें अशी माझी इच्छा आहे. तूं माझ्याबरोबर राहिल्यानें तुझ्या स्वातंत्र्यांत थोडा तरी कमीपणा आल्यावांचून राहणार नाहीं. तूं स्वतंत्रपणें राहून सार्वजनिक कामें करण्याला लायक आहेस हेंहि मला माहीत आहे. म्हणून माझी इच्छा प्रदर्शित करण्यापलीकडे मी कांहीं करीत नाहीं. तूं स्वतंत्र राहून कांहीं काम हातीं घेत असशील तर त्यांतहि मला आनंद आहे; तथापि माझ्या स्वार्थाकडे पाहून तुझ्या इच्छेच्या अगर कर्तव्याच्या आड मी येत नाहीं. आणखी दोन महिन्यांची सवड आहे. विचार करून ठरीव. बाबूरावांना वरचेवर पत्र लिही. म्हणजे मला हकीकत समजेल. माझ्याकडून उत्तर येईलच असें समजूं नकोस. प्रकृतीला जपून रहा.

येथील सर्व मंडळी खुशाल आहेत. बेळगांवकडून हकीकत समजतच असेल. खर्चाला कांहीं पाहिजे असल्यास गोविंदरावाकडून मागवीत जा. भीड करूं नकोस.

परमेश्वराच्या कृपेनें काल बरा जात आहे. कसलीहि अडचण वाटत नाहीं. बाहेरच्या कामाकडे लक्ष जाणें साहजिक आहे. कळावें हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

[पत्र नं. १९ :—कांहीं झालें तरी व माझीं मतें कांहींहि असलीं तरी मी ती. गंगाधरराव यांच्याकडेच राहून काम करावें असें पत्र कै. बॅ. केशवराव देशपांडे यांच्याकडून आलें होतें. अशा तऱ्हेनें मला पत्र लिहिण्याची बुद्धि बॅ. केशवरावांना होण्यास गंगाधररावच कारणीभूत आहेत, ही गोष्ट केशवरावांचें पत्र सूक्ष्म दृष्टीनें वाचल्यास कळून येण्यासारखी होती. म्हणून त्या पत्राचें उत्तर मी केशवरावांना लिहून, त्याची नक्कल गंगाधररावांच्याकडे पाठविली होती. वास्तविक तें उत्तर मी गंगाधररावांनाच देत आहें असेंच मला वाटत होतें. त्या पत्रामध्यें गांधीजींचे कोणते विचार मला कां पटत नाहींत याचाहि ऊहापोह अधिक स्पष्टपणें मीं केलेला होता. या पार्श्वभूमीवरून मला गंगाधररावांनीं उत्तर लिहिलेलें आहे. या पत्र नं. १९ वरून गंगाधररावांची नापसंती सहज कळून येण्यासारखी आहे. त्यांच्याबरोबर त्यांच्याच जवळ किंवा आसपास राहून मी काम करावें ही त्यांची इच्छा व प्रयत्नही स्पष्ट दिसून येतो. —पुंडलीकजी]

## पत्र नं. १९

श्री                                                   कुमरी, बुधवार

चि. पुंडलीक यास,

आशीर्वाद वि. तुमचें पत्र पोचलें. रा. श्री. केशवरावांच्या लिहिण्याचा अर्थ तुम्हांला नीट समजला नाहीं. मी सांगितल्यानंतर त्याप्रमाणें तुम्ही वागतां किंवा नाहीं हा प्रश्न नाहीं. पण, हल्लीं मी जें काम करीत आहें किंवा करावें असें मला वाटत आहे त्या कामाला तुम्ही स्वेच्छेनें किती मदत करूं शकतां हा प्रश्न आहे. या प्रश्नाचें तुम्हीच उत्तर द्यावें म्हणजे केशवरावजींच्या पत्राबद्दल गैरसमज होण्याचें कारण नाहीं. माझें हल्लींचें काम तुम्हाला पटत नाहीं ही गोष्ट तुम्हीहि नाकबूल करणार नाहीं. मग त्यांच्या लिहिण्यांत विपरीतपणा काय आहे?

तुम्ही 'आपल्या भावाची प्रकृति बरी झाल्याबरोबर येतों' असा निरोप लिहून ठेवून गेलांत. आणि आतां दोन महिने प्रवास करून येतों असें म्हणतां, या दोहोंचा मेळ कसा घालावा? यंग इंडियात महादेव देसाई यांनीं एक लेख लिहून म. गांधी हे वेळेचे मालक, आम्ही नाहीं, आम्ही फक्त रक्षक trustee आहोंत ही गोष्ट कशी पटवीत असतात हें स्पष्ट केलें आहे. तो लेख आपण वाचला नसल्यास अवश्य वाचावा. एवढा लेख वाचल्यानें आपण गांधींच्या वर्चस्वाखालीं खास जाणार नाहीं त्याबद्दल मी खात्री देतों. मी स्वतः हें संभाषण झाल्यावेळीं हजर होतों. यावरून प्रत्येक क्षणाची किंमत गांधींना काय आहे याची मला चांगली कल्पना आली. असें असून तुमच्यासारख्या होतकरू तरुणाला दोन तीन महिने रिकामपण आहे असें वाटावें हें आश्चर्य! देशाचें दुर्दैव, दुसरें काय? असो.

बेळगांवास आर्यसमाजाची एक शाखा उघडण्यांत आली आहे. तेथें एक हिंदीचा वर्ग उघडला आहे. तुमच्या हिंदीचा उपयोग तेथें करून पहावा. अथवा इकडे खेड्यांत sanitation किंवा आखाडे काढून कांहीं कार्य तुमचेकडून होईल काय हें पहावें. याउपर तुमची इच्छा! बाकी विशेष नाहीं.

कळावें हा आशीर्वाद.                                   गंगाधर देशपांडे

[पत्र नं. २०, २१, २२, २३ व २४ हीं पांच पत्रें विजापूर तुरुंगांतून आलेलीं आहेत. विजापूर तुरुंगामध्यें ती. गंगाधररावांची व्यवस्था उत्तम प्रकारें लागेपर्यंत मी विजापुरांत राहिलों होतों. त्या वेळीं विजापूर तुरुंगांतून गंगाधररावांनीं हीं पत्रें लिहून मला कशी तरी पोहोंचविलेलीं आहेत. माझ्या व त्यांच्या पत्रांची ही देवघेव देखील अशीच अनधिकृत व 'कशी तरी' झालेली आहे. —पुंडलीकजी]

## पत्र नं. २०

श्री

चि. पुंडलीक यास

आ. वि. आज जवळचे माझे कागद व आंथरूण वगैरे दोन नवीं कांबळीं दिलीं आहेत. थोरले व धाकटे साहेब आले होते. कांबळीं स्वदेशीच आहेत असें सुपरिटेन्डन्ट म्हणाला. मी साफ सांगितलें की, अशा प्रकारें थट्टा करणें बरें नाहीं. मी थट्टा केली नाहीं असें म्हणाला. पुस्तकें, कपडे वगैरे अद्यापि माझ्याकडे ठेवले आहेत. आज Bread मिळणार आहे. काल जेलमधील भाकरी आल्या होत्या. मी खाल्ल्या नाहींत. दुधावरच आहें. संध्याकाळीं bread मिळेल. मंगळवारीं पार्टी येथून निघत असते. त्या दिवशीं मलाही पाठवतील. तुला अंधेरीच्या आश्रमांत राहावयाचें नसेल तर राहूं नकोस. मी आल्यानंतर माझ्या तरी आश्रमांत राहशील किंवा नाहीं ! प्रकृति बरी आहे. सुपरिटेन्डन्ट एक novel पाठविणार आहे. How is your health ? कळावें हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. २१

श्री

चि. पुंडलीक यास आ. वि.

मुंबईस घडलेली हकीकत ऐकून मनाला फारच वाईट वाटलें. महात्माजींच्या मनाची काय स्थिति झाली असेल याची कल्पनाच करवत नाहीं. कर्मभोग अद्यापि संपला नाहीं असें म्हणणें प्राप्त आहे. गेल्या दीड वर्षांत शांतीचें तत्त्व ठसविण्याचा प्रयत्न जर झाला नसता तर याहीपेक्षां अधिक अनिष्ट प्रसंग ओढवला असता. हें जरी खरें असलें तरी झाला हा प्रकार देखील अत्यंत उद्वेगजनक झाला यांत शंकाच नाहीं. स्वराज्याच्या व खिलापतच्या पवित्र कार्याला हा डाग लागला. हा डाग धुवून निघे-पर्यंत तपश्चर्या करणें राष्ट्राला भाग आहे. ही तपश्चर्या लवकर पुरी होऊन यशःसिद्धी होवो म्हणून परमेश्वराची प्रार्थना करीत, तुरुंगाच्या तपोभूमींत काल घालवण्याचा मी प्रयत्न करीन. या गोष्टीपासून धडा घेऊन धैर्यानें कामाला लागावें अशी सर्वांच्या पायापाशीं प्रार्थना आहे. वंदे मातरम्. हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. २२

श्री

चि. पुंडलीक यास

आ. वि. पुनः भाकरी आली नाहीं. आज फळें मिळणार आहेत. माझ्याबद्दल कांहीं काळजी करूं नका. तुमच्या सर्वांच्या भक्तीनें व आशीर्वादानें आणि परमेश्वराच्या कृपेनें मी सुरक्षितपणें बाहेर येऊन पुनः माझ्या शक्तीप्रमाणें कामाला लागेन असा मला भरंवसा वाटत आहे. आश्रमाची कल्पना बसवीत आहें. हेंच काम योग्य आहे. देशांतील तरुणांना शीलवान करणें हें मोठें काम आहे. दोघेहि साहेब भेटले होते. Insult वगैरे नाहीं. आज उद्यां दुतवयांत मला दुसरीकडे नेतील. कोठें नेतील तेथें देवच पाठीराखा राहणार. तपासांत रहा. पण फार धडपड करूं नकोस. तुला त्रास होऊं देऊं नकोस. घरची मंडळी बरी आहेत ना ? मी बरा आहें. प्रकृति बरी आहे.

माझ्याबद्दल खाडिलकरांनीं लेख लिहिला असल्यास आश्चर्य करण्यासारखें कांहीं नाहीं. त्यांना माझी सर्व माहिती आहे.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. २३

श्री

चि. पुंडलीकजी यास

आ. वि. थोरले जमादार आज एक चिठी घेऊन येणार आहेत. त्याला चहा 'वगैरे' दे. धाकट्या जमादाराकडून चिठी घेऊन जातोस तें ठीक आहे. मनांतल्या मनांत तुझ्याबद्दल अत्यंत आदर वाटूं लागला आहे. माझ्याकरितां घस -सोसतोस हेंच कारण नाहीं. पण काम करण्याची तुझी तऱ्हा पाहून आनंद होतो. पण फार forward होऊं नकोस. गोत्यांत येशील. सावधगिरी ठेवावी. मी भेटलों नाहीं तरी भेटल्यासारखाच आहें. दररोज सारखें एकमेकाला स्मरण होतच आहे. विशेष कांहीं नाहीं, प्रकृति बरी आहे. मन शांत आहे. वाचन सुरू झालें आहे. हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. २४

श्री

चि. पुंडलीक यांस.

आ. वि. तुम्ही गेल्यानंतर थोरले साहेब आले होते. त्यांनीं पुस्तकें आंथरूण, पांघरुण सर्व काढून घेण्याचा हुकूम केला. त्याप्रमाणें लौकरच बजावणी

होईल. येथून विसापूरला रवानगी होईल. तेथून काय करतील तें पाहूं. थोरले साहेब येथील अधिकाऱ्यांच्या वातावरणांत वाढलेले आहेत. म्हणून मला देखील तेथून निघावें हेंच बरें वाटतें. परमेश्वर सर्व आपल्या कल्याणाकरितां करीत असतो असा विश्वास ठेवून स्वस्थ असावें. या मंडळींचा संबंध फक्त दोनचार दिवसांपुरताच आहे असें समजून मी सांगितलेली 'व्यवस्था' करावी. पुढें पाहतां येईल.

खाण्यासंबंधानें काय तजवीज झाली आहे हें समजत नाहीं. तथापि कांहीं होणार नाहीं व भाकरीवर भागवावें लागेल असें मी गृहीत धरून चालतों. तरी कांहीं गडबडूं नका. मी अगदीं शांत आहें. प्रकृति आज पुष्कळ बरी आहे.

येथेंच ठेवण्याबद्दल इ. ज. ऑफ प्रिझन्सला लिहावें असें वाटलें होतें. पण कशाला? तेवढ्याकरितां आर्जवें नकोत. कोठेंही मला नेलें तरी त्रास होणार नाहीं.

पांघरण्याला दोन नवीं ब्लँकिटें मिळणार आहेत. आंथरण्याला दुसरें मिळेल. कोटही काढून घेतील. तथापि मी कांहीं येथें तरी मागणार नाहीं. पुढें हरि आहे!

घरच्या मंडळींना सभाळ. त्यांना वर्तमानपत्रे वाचून दाखवीत जा. त्रास सोसण्याची philosophy शिकीव. तूं मात्र भाषणें वगैरे करूं नकोस. आणि आतां भाषणें वगैरे करण्याचा प्रसंगहि नाहीं.

बाबासाहेब सोमण यांना प्रकृति संभाळण्याला सांग. ते काल अशक्त दिसले. गोविंदरावांनाहि संभाळून वागण्याला सांग.

यापेक्षां तूर्त कांहीं लिहवत नाहीं. कळावें हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

[पत्र नं. २५:—हें पत्र ती. गंगाधरराव यांनीं बहुतेक श्री. दा. वि. गोखले यांना लिहिलें असावें. त्यांची ही नक्कल जपून ठेवण्यास माझ्याकडे त्यांनींच दिलेली होती. या पत्राचा खुलासा विचारून घेण्याचें पुढें कधीं कारणच पडलें नाहीं. —पुंडलिकजी]

पत्र नं. २५

श्री वेळगांव

२१-७-१९२४

कृतानेक सा. नमस्कार वि. वि.

मी पुष्कळ विचार केला. पण हल्लींच्या वातावरणांत मी अज्ञातवासांत राहावें हेंच बरें असें मला वाटतें. अलीकडे २।३ वर्षांत माझा जो कार्यक्रम आहे तो लोकांच्या शिकवणीच्या विरुद्ध आहे असें मला वाटलें असतें तर उद्याचे समारंभाला जाण्याची इच्छा देखील जाहली नसती. ही इच्छा किती जबर आहे व ती मी कशी

टाव्रतों आहें व त्यामुळें मला किती त्रास होत आहे हें माझें मलाच ठाऊक! तुमच्या सारख्या स्नेह्याजवळ देखील माझें अन्तःकरण स्पष्ट करतां येत नाहीं हें माझें दुर्दैव आहे. असो. येतेवेळीं माझ्या स्वतःच्या ट्रस्टचा हिशेब घेऊन येणार होतों. पण कामाची गर्दी असल्यामुळें तात्यासाहेबांना सवड राहणार नाहीं; व मलाहि फार दिवस राहण्याची सवड नाहीं म्हणून येण्याचें तहकूब करावें लागत आहे. सर्व गडबड संपली म्हणजे येण्याचें करतों. फार दिवस हें काम पडून राहिलें आहे.

येत्या गुरुवारीं आपण मॅनेजिंग कमिटींत ठराव करून घेत आहांत. काय केलें तें कळवावें. कळावें, लोभ करावा ही विनंती.

गंगाधरराव

ता. क. :—टिळक ज्युबिली फंडाच्या ट्रस्टींची सभा उद्यां आहे. त्या सभेकरितांहि मी येणार आहें...माझें म्हणणें मी रा...यांना कळविलें आहे व रा. नेने यांच्या पत्राची नक्कल तात्यासाहेबांना पाठविली आहे. कळावें.

गंगाधरराव

[पत्र नं. २६:—मनभेदामुळें मी मध्यंतरीं सहासात महिने गंगाधररावांना सोडून गेल्या वेळचें हें पत्र आहे. वाई प्राज्ञपाठशाळेंत जाऊन वेदांताचा अभ्यास करावा व शास्त्री बनावें या विचारानें मी वाईस गेलों. माधुकरी मागून रहावें व वेदान्ताचा अभ्यास करावा असें मला तेथें सांगण्यांत आलें. परंतु माधुकरी मागण्याची माझी छाती होईना. शेवटीं प्राज्ञपाठशाळेंत हिंदी शिकवावें व त्यासाठीं पंचवीस रुपये पगार घ्यावा आणि भोजनाबद्दल पंधरा रुपये वजा करून संस्थेनें महिना दहा रुपये माझ्या हातावर ठेवावेत; आणि उरलेल्या वेळांत मी वेदांत शिकावा अशी व्यवस्था ठरली. स्वामी केवलानंद सरस्वती यांच्याकडे श्री. भैय्याशास्त्री वाटवे व मी वेदांताच्या कारिकांचा अभ्यास करीत होतों. पुढें त्या कारिका मला एकट्यालाच तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री शिकवीत होते. पुढें माझा पगार घेतांना मला दिसून आलें कीं, प्राज्ञपाठशाळेंतील स्वयंपाकीण बाईला भोजन करून दहा रुपये पगार दिला जात असतो. मी माझ्या पगाराची तुलना या स्वयंपाकीणबाईच्या पगाराशीं केली आणि प्राज्ञपाठशाळेंत न राहण्याचें ठरविलें. ही सर्व माहिती गंगाधररावांना कळली. त्या काळांत वरील पत्र त्यांनीं मला लिहिलेलें आहे. —पुंडलीकजी]

पत्र नं. २६

श्री

कुमरी १९-३-१९२५

सा. न. वि. वि.

पत्र पोचलें. मी जाऊं नका असें सांगितलें असतां आपण जाणार नाहीं असें वाटलें होतें. पण हा माझा समज केवळ मूर्खपणाचा होता असें अनुभवाला आलें. माझ्या व तुमच्या संबंधांत अशा प्रकारचा हाच पहिला अनुभव. असो.

घर तुमचें आहे. तुम्ही घरांतून मला सोडून जावें असें मला केव्हांच वाटलें नाहीं व आतांहि वाटत नाहीं. अशा स्थितींत तुम्ही केव्हां परत यावें हें मी काय सांगावें! तुम्ही जो मार्ग स्वीकारीत आहां तो मला बिलकुल पसंत नाहीं हेंच मी पुनः पुनः सांगणार. तुमच्या स्वतंत्र विचाराला तो योग्य वाटत असल्यास नाइलाज आहे. असा प्रसग येण्याला तुमच्यामध्यें दोष आहेत हें कारण नाहीं, हें मी मनापासून सांगतों. माझाच मूर्खपणा कारणीभूत झाला याबद्दल मला वाईट वाटत आहे. माझ्या या लिहिण्यावर विश्वास ठेवा अगर न ठेवा. मला जें वाटत आहे तें मी लिहिलें आहे. यापेक्षां मी जास्ती काय लिहूं? कळावें, शक्य असेल तितका लोभ ठेवावा. ही वि.

गंगाधर देशपांडे

तुमच्या इच्छेनुरूप तुमचें पत्र फाडलें आहे.

[पत्र नं. २७, २८ व २९ :—मी व माझे एक स्नेही कै. वामनराव देसाई, विद्री दोघे अनेक वेळां ती. गंगाधररावांना विचारीत असूं कीं, 'आम्हांला तुमच्यासारखीं व्याख्यानें देण्यास कां शिकवीत नाहीं!' एकदां त्यांच्या मनांत विनोद करण्याचें आलें व खरोखरच आजपासून तुम्हाला व्याख्यान देण्यास शिकविणार आहे असें ते म्हणाले. रात्रीं भोजन झाल्यानंतर सभा भरविण्यांत आली. अध्यक्षस्थानीं गंगाधरराव, आम्ही दोघे वक्ते, श्रोतृगण म्हणून घरांतील आचारी असा संच होता. अध्यक्ष आपल्या पलंगावर झोपूनच बोलत होते. अध्यक्ष म्हणजे 'सभापति' असल्यामुळें, तो वाटेल तेथें बसेल किंवा आडवाही होईल अशी सुरुवात करून अध्यक्षांचे अधिकार काय काय असतात ते सर्व त्यांनीं आम्हाला समजून सांगितले. 'राष्ट्रीय शिक्षण' हा व्याख्यानाचा विषय होता. चार पांच मुद्दे आम्हा दोघांना लिहून घेण्यास सांगितले आणि प्रत्येक मुद्यावर काय काय बोलावयाचें तें सर्व अध्यक्षांनीं विस्तारपूर्वक बोलूनहि दाखविलें. आणि शेवटीं आम्हांला सांगितलें कीं, 'पुढें चार

हजार श्रोतृसमाज बसला आहे असें कल्पून मोठ्यानें ओरडून बोला.' पुढें एकच मनुष्य बसला असतांना, चार हजार माणसें बसलीं आहेत असें कल्पून बोलतां येणें मला कठीण वाटलें. मी म्हटलें कीं, "प्रथम वामनराव बोलतील व मग मी बोलेन." माझे मित्र वामनराव खरोखरच मोठ्यानें ओरडून अर्धा तास कानडीमध्यें बोलले. नंतर माझी पाळी आली, परंतु माझ्यानें बोलवेना. माझा आवाजच चढेना. माझ्या मनांत असूनहि तें मला जुळेना. 'हें मला शक्य नाहीं' असें मी सांगून खालीं बसलों. ती. गंगाधरराव म्हणाले कीं, "वामनरावांना बोलावयास लावून, त्याची मौज पाहिली व आतां तूं बोलत नाहींस, हें चांगलें नाहीं. तूं मोठ्या आवाजांत पांच मिनिटें तरी बोल." रात्रीं एक तासपर्यंत मला प्रथम समजून सांगितलें व अखेर विनंती केली, प्रार्थना केली. आणि शेवटीं कशाचाच कांहीं उपयोग होत नाहीं, असें पाहून आम्हां दोघांना त्यांनीं झोपायला जाण्यास सांगितलें. मला तर रात्रभर झोंपच आली नाहीं. पुढें एक महिनाभर मी गंगाधररावांच्या बरोबरच रहात असूनहि ते माझ्या बरोबर बोललेच नाहींत. मला तें असह्य झालें. म्हणून मी त्यांना सोडून जाण्याचा माझा निर्धार त्यांना एके दिवशीं रात्रीं कळविला. 'ही शिक्षा तुला फारच कठोर झाली' असें म्हणून त्यांनीं माझी क्षमाही मागितली. पण माझें मन दुखावल्यामुळें, मला त्यांच्याकडे रहावेनाच. मी त्यांना सोडून गेल्यानंतर गीतेवर प्रवचनें देत हिंडावें असें ठरवून, महाराष्ट्र व वऱ्हाडभर दौरा काढला. या कामीं तपस्वी बाबासाहेब परांजपे यांनीं वऱ्हाडांतील साठ-सत्तर लोकांचीं नांवें व पत्ते देऊन, त्या सर्वांना दाखविण्यासाठीं एकत्र पत्र लिहून दिलें होतें. वऱ्हाडभर हिंडण्याचा तो पासपोर्ट किंवा खुला परवानाच होता. मलाही पुन्हा गंगाधररावांच्याकडे जावें असें वाटत होतें आणि त्यांनाही मी परत त्यांच्याकडे यावें असें वाटत होतें. परंतु दोघेही आपापली इच्छा स्पष्टपणें व्यक्त करण्याचें टाळीत होतों. त्यावेळीं हीं तीन पत्रें गंगाधररावांनीं मला लिहिलेलीं आहेत. शेवटीं गंगाधररावांनीं आपली इच्छा काकासाहेबांना लिहिली व गांधींना तें कळल्यानंतर मला बोलवून घेऊन, तावडतोब परत बेळगांवला जाण्यास गांधींनीं मला भाग पाडलें. मला जें पाहिजे होतें तेंच मिळाल्यामुळें, मी सरळ साबरमतीहून बेळगांवला गेलों. —पुंडलीकजी]

## पत्र नं. २७

श्री

सा. न. वि. वि. १९-८-२७

आपलें पत्र पोचलें. इकडे बेळगांवास हिंदी शिकवण्याकरितां किंवा काळे यांचे-बरोबर खेड्यांत काम करण्याकरितां येण्याबद्दल लिहिलें होतें. त्याबद्दल तुमच्या पत्रांत कांहींच नाहीं. मी कदाचित् कानपूरला जाण्याकरितां सोमवारीं निघेन. तुम्ही येथें असतां तर बरोबर नेण्याला सोयीचें झालें असतें. असो. विनाकारण वेळ घालवूं नये इतकीच विनंति ही विज्ञापना.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. २८

श्री

बंगळूर

ता. २७-८-२७

चि. पुंडलीक यास आ. वि.

तुमचें पत्र पोचलें. खरें सांगावयाचें तर मला तुमच्या पत्राचा अर्थ समजला नाहीं. मनांत काय आहे हें स्पष्ट कळवल्यास मी त्याचें उत्तर देण्याचा प्रयत्न करीन. तुम्ही माझ्याजवळ राहूं नये असें मला वाटत आहे ही तुमची कल्पना चुकीची आहे. पण माझ्याजवळ राहण्यानें जबरदस्ती होत असेल तर तें मला नको आहे. तुमची कुचंबणूक मला करावयाची नाहीं, इतकेच. तुम्ही तुमचें कार्याचें स्वरूप व क्षेत्र ठरवावें व तें मला कळवल्यास मी तुम्हांला उपयोगी पडेन किंवा नाहीं हें ठरवण्यास बरें होईल. माझ्याजवळ इतके दिवस राहून माझ्याकडून तुमच्या बाबतींत कांहींच न झाल्यास मला वाईट वाटणें साहजिक आहे. याकरितांच वरचेवर तुम्हाला मी विचारीत आहें. माझ्याच मर्जीवर आपण ठेवलें असतें व माझा विचार आपण आनंदानें पत्करला असता तर हा प्रश्नच निघाला नसता. पण माझा विचार आनंदानें पत्करणें म्हणजे मला surrender होणें नव्हे.

तुम्हाला ७००/८०० रुपये कर्ज झालें आहे. त्याकरितां तुम्हाला जीवनकलह उत्पन्न झाला आहे असें समजतें. माझ्या उपदेशाप्रमाणें वागलां असतां तर ही स्थिति आली नसती. पण, मी जें काय सांगत असतां त्याचा विपरीत अर्थ तुम्ही अलीकडे करीत आलां हें माझें दुर्दैव आहे.

मी मंगळवारीं इकडून निघेन. बेळगांवला प्रथम जाईन. कळावें हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

# पत्र नं. २९

श्री

कुमरी ता. ३-९-२७

चि. पुंडलीक यांस

आ. वि. मी आज सकाळीं इकडे आलों. गार्डीतून एक पत्र टाकलें होतें. तें पोचलें नाहीं असें दिसतें. कारण त्या पत्रांत मला भेटून पुढें कोठें जायचें तिकडें जावें असें मी लिहिलें होतें. आणि आज तर तुमचें पुणें मुक्कामाचें पत्र पोचलें. यावरून तुम्ही दौऱ्यावर असल्याचें समजून आलें. तुम्ही पतकरलेल्या मार्गांत तुम्हाला यश यावें अशी इच्छा आहे. पण माझ्या मतें मला तो मार्ग पसंत नाहीं. कारणांची चर्चा करण्याचें हें स्थळ नाहीं. तथापि इतकें सांगतों कीं, आजकाल आपल्या देशांत उपदेश-पंडित पुष्कळ आहेत. पण, त्यांच्या उपदेशाचा परिणाम होत नाहीं. गांधींसारख्या वैराग्यसंपन्न ( अर्थात् माझ्या समजुतीप्रमाणें ) मोठ्या माणसापासून माझ्यासारख्या सर्वसाधारण मनुष्यापर्यंत सर्वच उपदेश देण्याचें काम करीत आहेत. पण परिणाम होत नाहीं. याला निराळाच मार्ग पाहिजे. तुमच्यामध्यें विषय प्रतिपादन करण्याची कितीहि शक्ति असली तरी तिचा उपयोग फारसा हल्लींच्या स्थितींत होईल असें वाटत नाहीं. तुमचा कांहीं वेगळा हेतु असल्यास तो तुम्ही मला सांगितल्याशिवाय कळणार कसा ? पण ऐकणाऱ्यावर कांहीं योग्य परिणाम होईल अशी तुम्हाला आशा असल्यास ती सफल होईल असें वाटत नाहीं. माझी भीति खोटी ठरल्यास मला आनंदच आहे. तुम्हाला मी अनेक गोष्टी करूं नका असें सांगत असतांना तुम्ही करीतच आलां. तेव्हां हीहि तुम्ही करणारच. पण मला वाटतें तें सांगितल्याशिवाय राहवत नाहीं.

मला पुनः तामीळ प्रांतांत लवकरच जावें लागणार आहे. काकासाहेब कालेलकर महात्माजींच्या बरोबरच आहेत. त्यांच्या बरोबर तुमच्याविषयीं माझें बोलणें बरेंच झालें. त्यांच्या बुद्धीचा व आत्म्याचा विकास पाहून आनंद वाटला. त्यांना कधीं काळीं शिष्यत्वाच्या नात्यानें लेखावें असें मला वाटलें असलें तरी शिष्यादिच्छेत्पराजयं ही आकांक्षा भागली. अनेक तरुणांचा संबंध आला. पण काका हा अपवादात्मक निघाला यांत शंका नाहीं. काकांशीं बोलून कांहीं तरी तुम्ही ठरवलें असतें तर बरें झालें असतें. माझ्या-जवळ राहून तुम्ही तुमच्या आवडीचें एखादें काम घेतलें असतें तर तुम्हांला मी प्रतिबंध केला असता असें तुम्हांला कां वाटतें ? फक्त रिकामें बसूं नये इतकेंच माझें म्हणणें होतें. रिकाम्या मनांत सैतानाची बाजारपेठ भरते असें म्हणतात. तो अनुभव मला तुमच्या संबंधांत येऊं लागला होता इतकेंच. असो. पुनः विचार करा. मला किंवा काकांना भेटून पुढील मार्ग ठरवा. उगीच डोक्यांत कांहीं तरी 'भलता विचार' आणूं नका. कुमरींत चार मुलें मी नवीं आणलीं आहेत. आणखी १।२ आणणार आहें. पुनः पुनः मुलांपासूनच

प्रारंभ करावा असें वाटतें. आयुष्य फार उरलें नाहीं असें वाटूं लागलें आहे. त्यामुळें मनांतील इच्छा कितपत सिद्धीस जाते पहावें. वृद्धावस्था स्पष्ट भासूं लागली असून पोटांतील कटकट सुटत नाही. त्यामुळेंहि तुम्ही जवळ असावें असें वाटतें. तथापि तुमचा निश्चय ढळण्यास ही गोष्ट साधनीभूत होऊं नये. मी लिहिलेल्या इतर कारणामुळें तुमच्या मनावर कांहीं परिणाम झाल्यास मला बरें वाटेल. वरचेवर पत्र पाठवावें. फळावें हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

[पत्र नं. ३०, ३१, ३२, ३३, ३४, ३५, ३६, ३७ : हीं आठ पत्रें मिरज सत्याग्रहाच्या वेळचीं आहेत. मिरज संस्थानांत सारावाढ भरमसाट करण्यांत आली होती. त्याविरुद्ध सत्याग्रह पुकारण्यांत आला होता. त्या सत्याग्रह-चळवळीला उग्र स्वरूप आल्यानंतर, त्या चळवळीचें नेतृत्व मला स्वीकारावें लागलें होतें. पू. काकासाहेब कालेलकरांनींहि मला जागृत करण्याच्या हेतूनें मला कांहीं पत्रें लिहिलीं होतीं. मला तीं पत्रें नाउमेद करणारीं वाटलीं व म्हणून मी तीं पत्रें एकदां वाचून फाडून टाकलीं होतीं. आणि ही गोष्ट उघड करण्यास शरम वाटल्यामुळें, मी गंगाधररावांना त्या काकासाहेबांच्या पत्रांच्या बाबतींत उत्तरच लिहीत नसें. मिरजेच्या वृद्ध राजेसाहेबांबद्दल गंगाधररावांना आदर होता. मी मधून मधून मिरजेची हकीकत गंगाधररावांना कळवीत असें. —पुंडलीकजी]

## पत्र नं. ३०

श्री

५-११-१९२८

चि. पुंडलीक यांस

आ. वि. मी आज मुंबईहून परत आलो. तुमचें पत्र पोचलें. मिरजेंतील परिस्थिति मला मुळींच माहीत नसल्याकारणानें त्या बाबतींत मला कांहींच सांगतां येणार नाहीं. सत्याग्रह हें नवीन अस्त्र आहे. त्याच्या मर्यादा पू. गांधीजींनीं घालून दिलेल्या आहेत. त्यावर माझा विश्वास आहे. त्या सर्व मर्यादा व अटी पाळल्या जातील किंवा नाहीं, सत्याग्रह करण्यासारखी स्थिति आहे किंवा नाहीं, याचा विचार तुम्ही करावा. पण त्यापूर्वी सत्याग्रह शास्त्राचा चांगला विचार करावा. तुमच्या बाजूला सत्य नसल्यास तुम्हाला यश येणार नाहीं. असो. सत्याग्रहावर मला कांहीं निबंध लिहावयाचा नाहीं.

तुमच्याकरितां दर महिन्याला २५ रु. प्रमाणें चार महिनेपर्यंत पाहिजे आहेत असें तुम्ही लिहितां त्याप्रमाणें मी देईन. तुम्ही ५० रु. वर्गणी द्यावी असें तुम्हाला वाटतें. पण मला तसें वाटत नाहीं.

श्री. दत्तोपंत पटवर्धन भेटले होते. मी उद्यां हुदलीस जाणार आहें. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

ता. क. :—मिरजेच्या सत्याग्रहाच्या बाबतींत काकासाहेब कालेलकरांनीं तुम्हाला कांहीं पत्रें लिहिलीं होतीं असें समजलें. तीं पत्रें तुम्ही मला दाखवाल अशी त्यांची अपेक्षा होती. पण तीं मी पाहिलीं नाहींत. मी तीं वाचावींत अशी त्यांची इच्छा आहे. तुम्हाला तसें वाटल्यास पाठवावींत.

## पत्र नं. ३१

श्री

हुदली १३-११-१९२८

श्री. पुंडलीकजी यांना

चि. वि. तुमचें पत्र पोचलें. मजकूर समजला. तुम्ही लिहिल्याप्रमाणें हकीकत असेल तर त्या कामांत तुम्ही पडूं नये. तुमच्या परिषदेंत काय ठरलें होतें हें मला माहीत नाहीं. परिषदेचें अध्यक्षस्थान एका वकीलाकडेच होतें व वकीलच प्रमुख होते. मग वकीलाबरोबर मिरजकरांनीं बोलणें केल्यास त्यांचा अपराध काय ? परिषदेनें तुम्हांला काय अधिकार दिला होता, याचीहि मला माहिती नाहीं. फाटाफूट झाल्यास चळवळ टिकणार नाहीं. तुमच्या शिस्तींत लोकांनीं वागावें अशी स्थिति आहे कीं नाहीं हें मला माहीत नाहीं. लोकाचा व तुमचा संबंध काय व कोणत्या स्वरूपाचा आहे याची मला जाणीव नाहीं. ४० टक्के वाढ अन्यायाची आहे काय ? गेल्या पन्नास वर्षांत सारावाढ झाली नाहीं ही गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे. लोकांना देणें नको असतें. पण तेवढ्यानें आपला पक्ष खरा असतो असें समजूं नये. तुम्ही आतां कागद वाचूं लागलां आहांत यावरूनच संपूर्ण माहिती घेतल्याखेरीज तुम्ही चळवळ हातीं घेतली असें होत नाहीं काय ? बेजबाबदार लोक काय वाटेल तें सांगतात. त्यावर विश्वास ठेवणें गैर आहे. जर तुमची चळवळ साधार होती तर आतां अभ्यास करीत आहें हें म्हणणें विसंगत आहे.

करबंदीची चळवळ करणार आहां कीं काय ? त्याचे परिणाम तुम्ही किंवा लोक जाणतात काय ! किती दिवस लढा चालेल याची कल्पना आहे काय ! किती पैसा लागेल याचा पत्ता आहे काय ? जर याबद्दल आधीं सर्व विचार झाला होता तर वकील लोक फसले कसे ? मिरजकरांचें म्हणणें त्यांना कां पटावें ? इत्यादि प्रश्न उपस्थित होतात. तुमचें घर विकल्यानें अगर अन्य अशा मार्गानें हा प्रश्न सुटणें कठीण आहे.

आपल्या स्वतःसंबंधानें भलती कल्पना करून घेऊं नका. वल्लभभाईंच्या आज्ञेत लोक वागत होते म्हणून तुमच्या आज्ञेंत वागतील असें समजणें चुकीचें होईल. विचाराशिवाय हुल्लड उठविणें बरें नाहीं. हुल्लडींत यश आलें तरी त्याची किंमत नाहीं. हुल्लड हा पाया होऊं शकणार नाहीं.

डोकें शांत ठेवून स्वतःविषयींचा अभिमान विसरून विचार करा. थोडें यश येतें असें दिसल्याबरोबर 'बारडोलीवर सरशी' असा अभिमान येणें बरें नाहीं. तुम्हाला असा अभिमान आला असेल असें मी म्हणत नाहीं. पण कोणत्याहि कार्यकर्त्यांना असा अभिमान येणें हें चांगलें लक्षण नाहीं.

मिरजकर हे ब्रिटिश नोकरशाहीप्रमाणें कठोर असतील असें मला वाटत नाहीं. ते मदाचारी आहेत. आजपर्यंत त्यांनीं साऱ्यांत वाढ केली नाहीं. प्रजेला पिळून पैसा उकळावा, चैन करावी अशी त्यांची वृत्ति दिसत नाहीं. परमेश्वरावर श्रद्धा ठेवणारे आहेत. दुराग्रह असेल. पण तो आहे किंवा नाहीं याची खात्री प्रथम झाली पाहिजे. आपल्या बाजूला सत्य असल्याखेरीज त्याचा आग्रह तरी कसा धरणार ?

तेव्हां विचार करा. माझ्याकडून २०० रु. तुम्ही मागितले व ते न पाठविण्याकरितां मी इतका पाल्हाळ केला असें समजूं नका. पैसा खर्च करण्याची जबाबदारी तुम्हीं कधीं पत्करली होती ? आणि लोक जर पैसा देत नाहींत तर त्यांना चळवळ पाहिजे आहे असें कसें समजावें ? मला तर हें सर्व विचित्र दिसतें.

काकासाहेब कालेलकरांचीं पत्रें पाठवा. बाबूराव वगैरे मंडळी यांत प्रथमपासून आहेत. त्यांनीं कितपत जबाबदारी घेतली आहे, त्यांचा सल्ला काय आहे ? लोकांना संस्थानची बाजू योग्य प्रकारें समजावून द्या व त्यांचें म्हणणें काय पडतें तें पहा. ३।४ हजार लोकांनीं तुमच्यावर विश्वास टाकला असें तुमच्या लिहिण्यावरून वाटतें. ही गोष्ट अभिनंदनीय नाहीं असें कोण म्हणेल ? पण पुनः तुम्ही तुमचें घर विकावयाला काढतां ! हजार पांचशें रुपये मिळूं नयेत ही गोष्ट विपरीत भासते. लोकांचा विश्वास जर तुमच्यावर आहे तर किती खर्च येईल याची त्यांना स्पष्ट कल्पना द्या व पैसे मागा. त्यांच्या ऐपतीप्रमाणें त्यांना देऊं द्या. कमी पडल्यास सहानुभूति असलेल्या लोकांकडे मागा. मग त्यांत तुमचें घर गेलें तरी मला वाईट वाटणार नाहीं. पण प्रथमारंभींच तुमच्या घरावर संक्रांत हा प्रकार मला समजत नाहीं. पैसा मागितल्यास लोकांचा विश्वास उडेल असें वाटत असल्यास त्या विश्वासाची किंमत काय ? तुमच्या शब्दावर विश्वास ठेवून हालअपेष्टा सोसण्यास हे लोक कसे तयार होतील ?

एकंदरींत विचार करून काय करावयाचें तें ठरवा व मला कळवा. कळावें ही वि.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. ३२

श्री बेळगांव ता. १९-११-२८

श्री. पुंडलीकजी यांना

सा. न. वि. वि. आपलें पत्र पोचलें, मजकूर समजला. श्री. पंडिताप्पा चिकोडी भेटले होते. त्यांचेकडूनहि मिरज सत्याग्रहाची हकीकत समजली. आपण काकासाहेब कालेलकरांचीं पत्रे कां पाठवीत नाहीं? मला शिकण्यासारखें त्यांत कांहीं तरी असेल म्हणून मी तीं मागत आहे.

माझ्यापेक्षां श्री. बाबूराव वगैरे मंडळींना सर्व हकीकत व स्थिति जास्ती माहित आहे. म्हणून एकमुखी सल्ला असावा हेंच बरें. माझ्यासारख्या अज्ञानें लुडबुडणें बरें नाहीं. तुमच्याच आत्मविश्वासावर सर्व गोष्टी अवलंबून राहणार. तुम्हाला या कामांत यश यावें अशी मनापासून इच्छा आहे. तूर्त यापेक्षां मला जास्ती कांहीं करतां येत नाहीं, याबद्दल वाईट वाटतें. पुढें कसा प्रसंग येतो हें आजच सांगवत नाही.

शुद्ध व सात्विक बुद्धीनें काम कराल तर यश येईल.

बिनहिशेबाचा खर्च असें लिहितां याचा अर्थ समजत नाहीं. पण तूर्त त्याबद्दल चर्चा नको.

पुनः एकवार तुम्हाला यांत यश यावें असें इच्छून हें पत्र पुरे करतां.

चि. सौ. चिमूताईची प्रकृति बिघडली आहे असें गदगहून पत्र आल्यामुळें मी मंगळूरला गेलों नाहीं. आतां तिची प्रकृति बरी आहे असें पत्र आलें आहे.

उद्यां हुदलीला जाईन. कळावें ही वि.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. ३३

॥ श्री ॥ कुमरी, रविवार ता. ९।१२।२८

श्री. पुंडलीकजी यांना

सा. न. वि. वि. तुमचें ता. ५ चें पत्र पोहोंचलें. चारपांच दिवस माझी प्रकृति बरी नसल्यानें उत्तर घालण्यास उशीर झाला. तुमचें प्रकरण कोठपर्यंत आलें आहे त्याची माहिती मला नाहीं. त्या प्रश्नाबद्दल माझें मत प्रसिद्ध करण्याइतपत मला साधार माहिती नाहीं, शिवाय तुम्ही पत्रांत लिहिल्याप्रमाणें पुढेंमागें या चळवळींत मी लक्ष घालण्याचा संभव आहे असें माझ्या मनांत असल्याशिवाय लोकांना तसें भासविण्याचा प्रयत्न करणें हें प्रामाणिकपणाचेंहि नाहीं व शहाणपणाचेंहि नाहीं. मी जेव्हां तसा निश्चय करीन त्या वेळीं तुमच्या पत्राची वाटहि पहाणार नाहीं. माझ्या स्वभावाप्रमाणें कोणत्याहि कामांत पडल्यावर त्यांतील सर्व बारीकसारीक गोष्टी मीच स्वतः करीत असतों. पण हल्लीं या कामांत मी पडावें असें मला अद्यापि वाटत नाहीं.

अशा स्थितींत माझें मत प्रसिद्ध करणें हें पोकळ धमकीप्रमाणें होईल व त्याचा उपयोगहि कांहीं होणार नाहीं. महाराष्ट्रांतील पुढाऱ्यांचें लक्ष वेधवावें हा हेतु असेल तर श्री. बाबूराव, मोपटकर, केतकर, पटवर्धन इत्यादि मंडळींनीं हा प्रश्न हातीं घेतलाच आहे. मला बरें वाटल्यानंतर मी पुण्याकडे जाणार आहें. तेथें मंडळींना भेटून त्यांच्या म्हणण्याचा विचार करीन. पुण्याहून वर्ध्याला जाणार आहें. पुढें कलकत्त्याला जाण्याचें कांहीं अद्यापि ठरलें नाहीं. कळावें ही वि.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. ३४

श्री

कुमरी १८-१-२९

श्री. पुंडलीकजी यांना

सा. न. वि. वि. तुमचें पत्र पोचलें. मजकूर समजला. महात्माजींनीं आपल्या सत्याग्रहाची हकीकत मला विचारली. पण मला सर्व माहिती नसल्यानें मी आपणाला लिहिण्याबद्दल कळविलें. त्यांनाच लिहिलें असतें तर कांहीं वावगें झालें नसतें. असो. हिंदी-मराठी-कोश जमनालालजींना अगर महात्माजींना अर्पण केला असता तर बरें झालें असतें. मला कोश अर्पण करून मला हिंदी शिकवावयाचें नाहीं हें बरें नाहीं. मला कोश अर्पण करून हिंदी मला चांगले बोलतां येईल अशी तयारी करून देण्याची जबाबदारी तुम्ही आपल्या शिरावर घेत आहां. नाहीं तर मानाकरितां मी हपापलेला आहें असा दोष माझ्यावर येईल. तुमची इच्छा बलीयसी. पण माझेंहि मी पाहिलें पाहिजे, म्हणून मी लिहिलें होतें. प्रकृति बरी आहे. कळावें ही वि.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. ३५

श्री

कुमरी ता. २६-१-२९

श्री. पुंडलीकजी यांना

सा. न. वि. वि. पू. बापूजींचीं पत्रें येत आहेत. तुमच्या मिरज सत्याग्रहाची हकीकत समजावी अशी त्यांची इच्छा आहे. तुम्ही पाठवीत नसाल तर मला तसें कळवावें. म्हणजे माझ्या तुटपुंज्या माहितीचें पत्र मी त्यांना लिहीन. सवड नाहीं ही सबब अशा कामीं योग्य नाहीं. उलट टपालीं काय तें कळवावें. मी उद्यां बागलकोटला जाणार आहें. सोमवारीं परत बेळगांवला येईन. कळावें.

गंगाधर देशपांडे

कालच्या पत्रांत बापू लिहितात :

'I shall await your letter regarding Pundalik. It is not right to keep me without information about his doings or his otherwise.'

## पत्र नं. ३६

श्री

कुमरी खादी मंदिर ता. २-२-१९२९

श्री. पुंडलीकजी यांना सा. न. वि. वि.

आपलें कार्ड पोचलें. आपण चवकशीच्या कामांत पडत नाहीं हें समजून बरें वाटलें. पण हा निश्चय टिकला पाहिजे. बाबूरावांनींहि हाच सल्ला आपल्याला दिला आहे, असें सांगत होते. आपली झोपडी आपली मार्गप्रतीक्षा अति उत्सुकतेनें करीत आहे. कळावें ही वि. गंगाधर देशपांडे

## पत्र नं. ३७

श्री पो. हुदली ता. १३-१-१९२९

श्री. पुंडलीकजी यांना सा. न. वि. वि.

पू. महात्माजींना मिरजेच्या सत्याग्रहाची साग्र हकीगत थोडक्यांत कळवावी. आपल्या सबंधानें कांहीं ठिकाणीं गैरसमज झाल्याचें 'राष्ट्रवीर' पत्रावरून दिसतें. मी आजच येथें आलो. प्रकृति बरी नव्हती. आतां साधारण बरी आहे. कळावें, ही वि.

गंगाधर देशपांडे

(पत्र नं. ३८:—मिरजेची 'रयतांचा सत्याग्रह' चळवळ संपविल्यानंतर, मी पुनः हुदलीस आश्रमांत जाऊन बसण्याची इच्छा व्यक्त करणारें पत्र ती. गंगाधररावांना लिहिलें होतें. त्या पत्राला त्यांनीं हें उत्तर लिहिलें होतें.

—पुंडलीकजी)

## पत्र नं. ३८

श्री हुदली १५-१-१९२९

सा. न. वि. वि.

तुमचें पत्र पोचलें. श्री. काळे हुकेरीला गेले आहेत. आल्यानंतर तुमचें पत्र त्यांना देईन. तुमचें पत्र येण्यापूर्वीच मी एक कार्ड लिहिलें होतें तें पोचलें असेलच. महात्माजींना तुम्ही हकीकतीचें पत्र लिहिलें असेलच.

आपल्या डोक्यावर ६०० रु. चा बोझा आहे हें समजून आश्चर्य वाटलें. चळवळींचा हा पाया शुद्ध नाहीं. तुम्ही तुमचा अभिमान दाखवलात. पण ही पद्धत मला पसंत नाहीं. ज्यांच्याकरितां चळवळ चालवली त्यांनींच हा बोझा उचलला पाहिजे. बोझा कांहीं फार नाहीं. त्यांनीं जर उचलला नाहीं तर त्यांना चळवळ नको होती असें अनुमान निघतें. त्यांना जर चळवळ नको होती तर त्यांत तुम्हाला पडण्याचें कारण नव्हतें. सहन न करण्यासारखा बोझा असता तर गोष्ट निराळी.

तुमची झोपडी आहेच. पण ती झोपडी आतां तुमच्या लायक नाहीं. मला घेरं वाटावें म्हणून कांहीं तरी लिहितां असाच मी अर्थ करीत आहें. मी तुम्हाला मोकाट सोडलें नाहीं व सोडण्याची इच्छाहि नव्हती. मोकाटपणा आला आहे ही गोष्ट तुम्ही कबूल करतां हें कांहीं कमी नाहीं. असो. मला यांतहि आनंद आहे. डोके ताळ्यावर ठेवा म्हणजे झालें. नाहीं तर कित्येकांचा 'तपस्वी'पणा, कित्येकांचा 'वीर'-पणा, कित्येकांचा आणखी कांहीं अंगावर येऊन त्यांची स्वतःची व कार्याचीहि हानि होते. अशीं उदाहरणें माझ्यासमोर आहेत. विनय हा विक्रमाचा अलंकार आहे, असें मी कोठें तरी वाचल्याचें स्मरतें. महात्मा गांधींत कांहीं दोष असोत. पण विनय हा गुण त्यांच्यामध्यें मूर्तिमंत आहे. म्हणून त्यांचे गुण अधिक उठावदार होतात. असो. केव्हांही आलांत तरी हें घर तुमचेंच आहे, या गोष्टीची आठवण तुम्हाला असावी.

प्रकृति बरी आहे. कळावें ही वि. गंगाधर देशपांडे

[पत्र नं. ३९, ४०, ४१, ४२ हीं चार पत्रें मी मुंबईला असतांना आलीं आहेत 'ऑ.इं. ॲन्टीअनूटचेबिलिटी कमिटी'चे अध्यक्ष जमनालालजी बजाज होते. आणि स्वामी आनंद व मी त्या कमिटीचे चिटणीस होतों. चिटणीस या नात्यानें मी मुंबईमध्ये स्वामी आनंद व पू. जमनालालजी बजाज यांच्या नेतृत्वाखाली काम करीत असतांना ती. गंगाधररावांनीं मला हीं पत्रें लिहिलेलीं होतीं. —पुंडलीकजी ]

## पत्र नं. ३९

श्रीहरि वर्धा ता. २१ ७-२९

प्रिय पुंडलीकजी

मेरे कल यहाँ आनेपर आपका पत्र १२-७ का लिखा हुवा मिला। आशा है अब आपका स्वास्थ्य ठीक हुआ होगा। मेरा ता. १० तक ठहरनेका विचार है। अगर आप ता. ५ आगस्त के पहले आ सकें तो ठीक होगा। मैं आपको सब समझा दूंगा! नहीं आ सकेंगे तो ता. १५ से ३० के अन्दर मुझे बंबई मिलनेका अवश्य प्रयत्न करें।

जमनालाल बजाज का वन्देमातरम्

## पत्र नं. ४०

श्री २१-२-२९

श्री. पुंडलीकजी यांस

तुमचें पत्र पोचलें. माझ्याबद्दल ती. मातोश्रींना बिलकुल काळजी नाहीं. कुटुंबा-पैकीं कोणाची जर काळजी असेल तर ती चि. सौ. यमूताईची व तिच्या प्रपंचाची. कांहीं अंशीं, ती योग्यहि आहे. मीं शक्य ती व्यवस्था केली आहे. पण मूर्खपणाचा बाजार. आणि दुसरा मनुष्य तरी कोठवर काय करणार? ज्याचा त्यांनीं विचार करावा. जबाबदारी माहीत असूनहि करावयास पाहिजे तो नीट विचार करतां येत नाहीं याला काय म्हणावें? म. गांधीजी कांहीं तरी फाजील शिक्षण देत असतात असा त्यांचेवर आक्षेप आहे. पण अशीं उदाहरणें पाहिलीं म्हणजे ते करतात ते योग्यच आहे असें म्हणणें प्राप्त आहे.

आपल्या पत्रांतील आपला निरोप मातोश्रींना कळवण्याची जरुरी नाहीं. काल सायंकाळपासून रामनाम घेत असतात. औषध वगैरे नको म्हणत आहेत. आम्हीहि औषधांचा त्रास त्यांना देत नाहीं.

चि. ताराकाला दुःख होत आहे, पण आवरण्याचा ती प्रयत्न करीत आहे. तशी तीहि स्वभावतः समजूतदार आहे, व परिस्थितीमुळें जास्ती समजूतदार झाली आहे. पण धक्का हा बसणारच. आपलें पुढें कसें होईल ही काळजी तिला नाहीं. माझी वागणूकच तशी नाहीं. यापुढें तीच मला मातोश्रींच्या जागीं येणार. तीहि बरीच अशक्त झाली आहे.

जागरण न करण्याचा प्रयत्न करीत असतों. पण झोपमोड होतेच. कालची रात्र मात्र समग्र जागरणांतच गेली. कुमरीकडे फिरून येत असतों. माझ्याबद्दल काळजी करूं नये.

आपलें काम सोडून येण्याचा विचार करूं नये. मातोश्रींना भेटण्याचा तुमचा अधिकार आहे किंवा नाहीं असा संशय कां? आपला पूर्ण अधिकार आहे व आपल्या गैरहजेरींत आपल्या वर्तनें व माझ्या स्वतःच्या वर्तनें मी त्यांची सेवा करण्याचा अधिकार बजावीत आहें.

श्री. बाबासाहेब सोमण यांचें पत्र कुमरीला पाठविलें. मी तें वाचलें. श्री. दिवेकरांच्या शर्ती वाचून आश्चर्य वाटलें. लोकसेवेची तऱ्हा पाहून सखेदाश्चर्य वाटलें. असो. झाला हा निर्णय योग्यच आहे. तथापि दिशाभूल होण्याचा संभव आहे. स्वामी व शेठजी सावध आहेतच.,

तुमचें अन्न तुटत चाललें आहे हें बरें नाहीं. व्यायाम घेतां किंवा नाहीं? जेवण-राहणें कोठें होत आहे? खर्चाला इकडून कांहीं पाहिजे काय? तेथेंहि संकोच करूं नये, व माझ्याकडेहि या बाबतींत संकोच धरूं नये. मला तुमचा खर्च जेव्हां जेव्हां अयोग्य असा वाटला तेव्हां तेव्हां मी तसें सांगत आलों आहें.

खूप जोरांत काम करावें. स्वामींना नमस्कार. कळावें ही वि.

गंगाधर देशपांडे



47888

पत्र नं. ४१

श्री

हुदली ता. १२-११-२९

सा. न. वि. वि.

तुमचें पत्र पोचलें. मातोश्रींची प्रकृति क्षीण होत चालली. वडील माणूस घरांत असले म्हणजे लहानांना एक प्रकारचा आधार असतो. त्याचप्रमाणें आईचें प्रेम म्हणजे कांहीं निराळीच गोष्ट आहे. या बंधनामुळें मला माझ्या सार्वजनिक कामांत कधींच अडथळा आला नाही. उलट अनेक प्रसंगीं प्रोत्साहनच मिळालें आहे. या बाबतींत दोघांहिकडून—आईबापांकडून—मला अत्यंत सुखच झालें आहे. वडिलांच्या पश्चात् देखील मी माझ्या खाजगी घराकडील कामाच्या दगदगीपासून बराच आलिप्त असे. ही स्थिति पालटण्याचा संभव स्पष्ट दिसत आहे. तथापि जगांत विपरीत प्रकार घडत असतात. ते पाहिले म्हणजे हें होत आहे हें एक प्रकारें इष्टच आहे असें वाटतें. हा व्यवहार झाला. तात्त्विकदृष्ट्या तर यात कांहींच नाही. सृष्टिनियमानुसार ज्या ज्या वेळीं ज्या ज्या गोष्टी व्हावयाच्या त्या होणारच.

मातृसेवा हें एक मुख्य कर्तव्य आहे असें मी मानतों व तें यथाशक्ति करीत आहें.

सर्व गोष्टींचा विचार करून प्रपंचाच्या दगदगीपासून पूर्ण मुक्त होण्याचें मी टरवलें आहे, व त्याप्रमाणें कांहीं योजना मीं करून ठेवली आहे. मन शांत आहे. उदासीनहि नाहीं. कामाचा हुरूप आहे.

तुमचें पत्र पोचण्यापूर्वींच तुमच्या झोपडी-दुरुस्तीचें काम चालू केलें आहे. पूर्वीपेक्षां थोडी उंच केली आहे. आणखी थोडे दिवसांनीं एक लहानशी कायमची मठी तेथेंच तुमच्यासाठीं बांधवण्याचा विचार आहे. आपली झोपडी किंवा बांधून झाल्यास ही मठी, येथें तुम्ही असल्यावेळीं तुमचें वसतिस्थान होणार आहे. आपला सहवास मला असावा अशी इच्छा आहे. सार्वजनिक उपयुक्ततेच्या दृष्टीनें यांत थोडी हानि आहे. पण म्हातारपणीं एखादी काठी लागतेच. असो.

बाबासाहेब सोमण आले आहेत.

'नवा काळ'मध्यें प्रसिद्ध झालेली हकीकत जुनी आहे. आतां येथें आश्रमांत मंडळीहि जास्ती आहेत. नाईक अद्यापि तिकडेच आहेत. अमदाबादला गेलेली मंडळी अद्यापि आली नाहींत. महिनाअखेर येतील.

मातोश्रींच्या प्रकृतीमुळें इकडे तिकडे जातां येत नाहीं. कळावें ही वि.

गंगाधर देशपांडे

पत्र नं. ४२

श्री

१६-११-२९
रात्रीं ९॥

सा. न. वि. वि.

स्वामींच्या पत्राबरोबर तुमचें पत्र पोचलें. स्वामींच्या पत्रावरून तुमचें काम समाधानकारक चालल्याचें समजून संतोष झाला. वरचेवर पत्र पाठवून हकीकत कळवीत असावी.

ती. मातोश्रींची प्रकृति दिवसेंदिवस क्षीण होत चालली आहे. वार्धक्याला दुखण्याची जोड मिळाली आहे. आज फारच अशक्तपणा आला आहे. माझ्यावरचें हें छत्र इतके दिवस लाभलें हीच परमेश्वराची कृपा. सृष्टिनियमानुसार सर्व कांहीं होतच आहे. जें होतें तें सर्व आपल्या बऱ्याचकरितां होतें असा माझा विश्वास आहे. तूर्त मी घरींच आहें. कितीहि विचार केला तरी मनाची हुरहुर जात नाहीं. माझा स्वभाव तुम्हाला माहीतच आहे. या अडचणींतच चि. सौ. यमूताई बाळंत झाली. सातान्यास Maternity Hospital मध्यें प्रसूत झाली. मुलगा झाला. प्रसूतीनंतर तीन दिवसांनीं १०५ पर्यंत ताप आला. रेचहि सुरू झाले. दोघांचाहि घाबरा स्वभाव. मला येण्या-बद्दल तार आली. या स्थितींत मातोश्रीला सोडून जाणें अशक्य म्हणून बाबासाहेब सोमण यांना सातान्यास पाठविलें होतें. ते आज परत आले. तिची प्रकृति बरी आहे असें समजलें. चि. सौ. चिमूताई पुण्यास आहे. बाकी सर्व मंडळी येथेंच आहेत. गदगहून डॉ. हुइलगोल येऊन गेले. जलालपूरकर येऊन गेले. परमेश्वर ठेवील तसें राहिलें पाहिजे.

आज बाबासाहेब बेळगांवला गेले आहेत. मी एकटाच आहें.

आपलें काम शांतपणें निभावेल असें वाटत नाहीं. अस्पृश्यांचा उतावीळपणा होत आहे. पण त्यांनीं तरी किती दिवस वाट पहावी? दिवेकरांनीं अशा शर्ती घालाव्यात हें माझ्या मनाला येत नाहीं. पण त्यांच्या अडचणी तेच जाणूं शकतील. देश कंगाल, कार्यकर्ते दुर्लभ अशी स्थिति आहे. असो.

तुमचा भाऊ एकदां भेटला होता. मीच त्याला तुम्हाला पत्र लिहिण्यास सांगितलें होतें. तुमच्या संमतीशिवाय मी कांहीं करूं शकणार नाहीं असेंहि कळवलें होतें. पण त्याच्या हिश्श्याच्या पैशावर त्याची मालकी आहे. विनाकारण अडवूं नये असें बाबासाहेबांचें म्हणणें आहे. आपण विचार करावा.

स्वामी आनंदाच्या प्रकृतीला जपावें. कामाचा ताण फार पडतो आहे असें दिसतें. त्यांना नमस्कार.

कळावें ही वि.

गंगाधर देशपांडे

[पत्र नं. ४३:—हरिजनांच्या मंदिर प्रवेशाची चळवळ 'ऑ. इं. ॲन्टी-अन्टचेबिलिटी' कमिटीचा चिटणीस या नात्यानें मी करीत असतांना, पू. श्री. काकासाहेब कालेलकर यांनीं मला लिहिलेलें हें पत्र ती. गंगाधररावांच्या पत्रांतून माझ्याकडे पाठविलें गेल्यामुळें, त्यांच्याकडून त्यावर 'या पत्राचा नीट व शांतपणें विचार करावा' असा शेरा लिहून तें ती. गंगाधररावांनीं माझ्याकडे पाठविलेलें आहे. —पुंडलीकजी]

### पत्र नं. ४३

ॐ

गुजरात विद्यापीठ
अहमदाबाद
कार्तिक शु. १५, रवि.

प्रिय पुंडलीकजी

'खेडयाच्या सत्याग्रहाचा इतिहास' पाठवण्याचें विसरलो नाहीं. मूळ ग्रंथकारालाच आतां लिहून पाहतों. नाहीं तर शेवटीं माझी प्रत आहेच. मित्रमंडळींत तें पुस्तक मिळालें नाहीं.

गोविंदराव याळगीविषयींचें चरित्रकीर्तन वाचलें. गोविंदरावांचें महत्त्व जनसमुदायाच्या मनावर ठसवण्याचा आटोकाट प्रयत्न करीत आहांत अशी शैली दिसते. 'काय करूं! तुम्ही समजूं शकत नाहीं. आमचा चरित्रनायक तुमच्या कल्पनेबाहेर थोर होता,' असें म्हटल्यासारखें दिसतें. अर्थात् लोकांची समजण्याची शक्ति नसेल, अथवा लेखकाची कला अपूर्ण असेल. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे चरित्रनायकाच्या थोरवीविषयीं लेखांत लेखकाची खात्री दिसून येते. पण Ease दिसून येत नाहीं. माझी टीका कडक वाटेल, पण तुमचेशीं मोकळेपणानें टीका करणेंच शक्य असतें. तुम्हाला मोघम मोघम काय म्हणून लिहावें! तुम्ही अर्थात् म्हणाल, "मग चांगलें कसें लिहावें तें लिहूनच दाखवा!" टीकाकारावर असला बोझा नसतो. तरी तुम्ही येथें असतां तर तसला प्रयत्न केल्याहि असता. लहान लहान पांचदहा उदाहरणें अथवा प्रसंग लेखांत आले असते तर गोविंदरावांचें माहात्म्य सिद्ध करण्याचा भार बराच हलका झाला असता.

वर्तमानपत्रें फारशीं वाचीत नाहीं. तेथील गडबडीची माहिती तुम्ही पाठविलेल्या स्वामींच्या पत्रावरूनच झाली. हरताळेच्या भुकेल्या मुळाशीं फक्त देवरूपासारखी मंडळी नसावी. बरीच खोल मंडळी असली पाहिजेत. मला तर आपली सगळीच चळवळ मुळांत थोडीशी चिपडली असावी असें वाटतें. गोडसेशास्त्री, चौंडे महाराज, कुर्तकोटी शंकराचार्य या लोकांना आपण जितकं मानतो त्याहून त्यांना अधिक उपयोग करूं पाहतों. त्यांचा मंदिरावर विश्वासच नाहीं अशाच्या सल्ला घेतों. अशा लोकांची अल्पाहिरा

सहानुभूति प्रसिद्ध होणें इष्ट आहे. पण मतपरिवर्तनाचा आटोकाट प्रयत्न केल्यानंतर सत्याग्रह करावयाचा तो मंदिरावर ज्यांचा अविश्वास नाहीं, ज्यांना वर्णव्यवस्था तोडावयाची नाहीं आणि अस्पृश्यता पाप समजून दूर करावयाची आहे, आणि हा प्रयत्न हिंदु धर्माचें प्रायश्चित्त म्हणून, अशा लोकांचेंच हें काम आहे. अशा लोकांनीं स्वतंत्र वेळ काढून हें काम चालवलें पाहिजे. आणि अशाच प्रकारच्या वरील व्यकीच्या अस्पृश्यांना हातांत धरून ही चळवळ चालवली पाहिजे. बाकीच्या लोकांना वगळतां आलें पाहिजे. मूर्तिपूजेचा मी विरोधी नाहीं, आणि मंदिराच्या उपयोगितेविषयीं मला आस्था आहे, असें म्हणणाऱ्यांनाच मंदिरांत जाण्याचा आग्रह करण्याचा हक्क राहतो. बाकी सर्व सविनय लोकांना मंदिरांत जाण्याची मोकळीक असावी. मग ते कोणत्याहि धर्माचे किंवा मताचे असोत.

पण हे सर्व माझ्या मनांतील विचार झाले. असेंच चालावें असा समितीला माझा आग्रह मात्र नाहीं. तुमचेकडून वारंवार पत्र येऊं द्या.

काका कालेलकर

[पत्र नं. ४४:—ऑ. इं. ॲन्टीअनट्चेबिलिटी कमिटीच्या कामाचा रिपोर्ट ती. गंगाधररावांच्या पाहण्यांत आल्यानंतर त्यांनीं हें पत्र मला लिहिलेलें आहे. —पुंडलीकजी]

पत्र नं. ४४

श्री

२१–१२–२९

श्री. पुंडलीकजी यांस

सा. न. वि. वि. तुमचें पत्र पोचलें व त्यासोबत पाठविलेला रिपोर्टहि पोचला. शेवटीं तुमच्या कामाबद्दल उत्तम अभिप्राय मिळालेला आहे हें पाहून संतोष होतो. पण त्यांत तुम्हाला मी त्या कामाकरितां (lead) दिला आहे असें विधान आहे, तें चुकीचें आहे. तुमच्या मनाचा कल, काकासाहेब कालेलकरांची इच्छा वगैरे गोष्टी लक्षात घेऊनच मी हो स हो म्हटलें इतकेंच. रिपोर्ट लिहिणारांचा चुकीचा ग्रह तुमच्या बोलण्यावरून झाला असावा. तुम्ही केलेल्या कामाबद्दल जें श्रेय तुम्हाला मिळालें त्यांत मी अंशतः तरी वाटेकरी आहें हेंहि लौकिकदृष्ट्या ठीकच आहे.

'नवाकाळ' सुरू झाला. रिपोर्टहि पाहिला. कदाचित् खाडिलकर लवकर सुटल्यास त्यांना माझ्या वतीनें भेटावें. मातोश्रीची प्रकृति जास्तीच बिघडत चालली आहे. तुम्ही लाहोरला न गेल्यास येतच आहां. रिपोर्टवरून पुढें काम चालू होईल असें दिसतें. तुम्ही काय करावयाचें याबद्दल विचार करून यावें. बाकी ठीक आहे. कळावें ही वि.

गंगाधर देशपांडे

[पत्र नं. ४५ :—लो. टिळकांच्या मनांत 'डेमोक्रॅटिक' या नांवानें एक इंग्रजी पत्र मुंबईमध्यें सुरू करावयाचें होतें. त्या पत्राला पॅंदेचरीहून योगी अरविंद घोष यांना संपादक म्हणून काम करण्यासाठीं आणवावें अशी इच्छा ती. गंगाधरराव वगैरे कांहीं पुढाऱ्यांची होती. म्हणून बॅप्टिस्टा यांच्या सहीनें योगी अरविंद घोष यांच्याशीं पत्रव्यवहार चालू होता. अरविंद बाबूंच्याकडून नकाराचें उत्तर बॅ. बॅप्टिस्टा यांना आलें. तें मूळ पत्रच त्यांनीं गंगाधररावांच्याकडे पाठविलें होतें. उत्तर नकारार्थी आहे असें पाहून, गंगाधररावांनीं तें पत्र आपल्या टेबलावर तसेंच पडूं दिलें होतें. तें पत्र मी तेथून उचलून, तीस वर्षे माझ्याकडे जपून ठेविलें होतें. योगी अरविंदांचें 'प्रयाण' झालेली बातमी ऐकून मला त्या पत्राची आठवण झाली. माझे स्नेही श्री. श्रीपाद शंकर नवरे यांना मीं तें पत्र दाखविलें. त्यांनीं त्या पत्राचा ब्लॉक, सुस्पष्ट इंग्रजी कंपोज, व मराठी भाषांतर 'मौज' पत्रामध्यें छापून प्रसिद्ध करविलें. ही बातमी पॅंदेचरीच्या अरविंद-आश्रमांतील 'मदर'ला समजली. त्यांनीं योगी अरविंदांच्या मूळ पत्राची मागणी ती. गंगाधरराव यांच्याकडे केली. त्या वेळीं ती. गंगाधररावांनीं मला हें पत्र लिहिलें होतें. —पुंडलीकजी]

## पत्र नं. ४५

श्री                                        कुंदगोळ १८।२

श्री. पुंडलीक याला

वि. वि. श्री. अरविंद यांचीं पत्रें छापून प्रसिद्ध करण्याचें काम पॅंडेचरी आश्रममध्यें चाललें आहे. तुम्ही मुंबईच्या "मौज" पत्रांत त्यांनीं बॅरिस्टर बॅप्टिस्टा यांना लिहिलेलें पत्र प्रसिद्ध केलें. तें आश्रमाच्या व्यवस्थापकाकडे पाठवण्यांत आलें. आतां त्यांना तें पत्र पाहिजे आहे. बेळगांवचे चंदूरकर गोपाळराव देशपांडे पॅंडेचरीला जात असतात. त्यांना श्री अरविंद आश्रमाचें पत्र आलें आहे. त्यांत तें पत्र माझ्याकडे आहे तें मागून घेऊन पाठवावें असा मजकूर आहे. आश्रमाचें पत्र माझ्याजवळ आहे. चंदूरकर देशपांडे आज येथें पत्र मागण्याकरितां आले होते. तुम्हांला लिहून तें पत्र आणवितों व मग पाठवीतों असें त्यांना कळविलें आहे. 'मदर' श्री. अरविंदांचीं पत्रें एकत्र टेवणार आहेत व तीं प्रसिद्धहि करणार आहेत. आमच्याजवळ तें पत्र राहून तरी उपयोग काय? योग्य ठिकाणीं जाईल. पाहिजे असल्यास परत

मागवूं. तें पत्र माझ्याकडेच पाठव. तुझ्याकडे राहावें असें वाटत असल्यास मला त्याप्रमाणें कळव.

प्रकृति साधारणच आहे!

कळावें ही वि.

गंगाधर देशपांडे

[पत्र नं. ४६ व ४७ : नवीन कूळ कायद्याचा फायदा घेऊन एक कार्यकर्ता ती. गंगाधररावांच्या कारभारी कारकुनाशीं भांडून शक्य तितकी आडकाठी व अडचण उत्पन्न करण्याचा प्रयत्न करीत होता. त्या कार्यकर्त्याशीं अत्यंत सहानुभूतीनें वागलें पाहिजे असा माझा ती. गंगाधररावांपाशीं आग्रह होता. त्या वेळीं त्या कार्यकर्त्याविषयीं कांहींहि करावयाचें झालें तर त्याची माहिती मला आगाऊ देत जाण्याचें धोरण गंगाधररावांनीं राखलें होतें. त्या वेळीं हीं दोन पत्रें मला त्यांनीं लिहिलीं आहेत. —पुंडलीकजी]

## पत्र नं. ४६

श्री

श्री. पुंडलीक यांस

वि. वि. आण्णा बसाप्पाची सर्व प्रकारें समजूत घातली. काल त्यानें मागितलेली सवलत देण्याबद्दल विचार करतों म्हणून सांगितलें. तरी त्याचें समाधान झालें आहे असें वाटत नाहीं. आपला आग्रह तो सोडीत नाहीं असें दिसतें. आम्ही जमीन-विक्री करण्याचें ठरविलें आहे. ३-४ दिवस मुदत राहिली आहे. तो कायदेशीरपणानें चालेल तर आणखी एक वर्ष जमीन त्याच्याकडे राहील. पण आमच्यावरील त्यांची सत्ता तो गमावून बसेल.

बाळ्या आला नाहीं असें दिसतें. कळावें. ही विनंती.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. ४७

श्री

श्री. पुंडलीकजी यांस वि. वि.

आण्णा बसाप्पा आला आहे कीं नाहीं? त्याचें काय झालें कळवावें. खरेदीपत्र करून देण्याची मुदत भरत आली आहे. आम्हाला आतां ठेवतां येणार नाहीं हें त्याला

मी स्पष्ट कळविलें आहे. आमच्यावर शब्द नको म्हणून दिवसगत केली आहे. तो आला असल्यास त्याला पाठवावें.

काल्या काल येथून गेल्यानंतर गांवांत साक्षीदार शोधत होता असें समजतें. अशा माणसाशीं कसें वागावें ! कळावें. ही वि.

गंगाधर देशपांडे

[पत्र नं. ४८ : कराडमधील एक इतिहासप्रसिद्ध, पण आज अगदींच मोडकळीस आलेलें व उपेक्षित असें मंदिर हरिजनांना खुलें करण्यासाठीं कै. श्री. दे. भ. पांडुअण्णा शिराळकर व कराडमधील कांहीं प्रतिष्ठित सज्जनांच्या मदतीनें ऑ. इं. ॲन्टिअनटचेबिलिटी कमिटीच्या मार्फत मी प्रयत्न करीत असतांना, लोकमतानें एका दिवसांत उलट खाली व कराडमध्यें गंभीर वातावरण उत्पन्न झालें. त्या वेळीं मी लिहिलेल्या पत्राला हें उत्तर आलेलें आहे. —पुंडलीकजी]

पत्र नं. ४८

श्री

श्री. पुंडलीकजी यांस वि. वि.

पत्र पोचलें. काळजी वाटत होती. ती बरीच दूर झाली. भेटींत जास्त खुलासा होईल. पण, फार सावधगिरीनें वागावें. मुंबईला कधीं जाणार ? कळावें. ही वि.

गंगाधर देशपांडे

पत्र नं. ४९

श्री सोमवार १९-२

श्री. पुंडलीकजी यांस वि. वि.

आज अमळनेरला जाण्याकरितां निघण्याचा विचार आहे. जर जाण्याचें निश्चित ठरलें तर तुम्हांला बरोबर नेईन. दोनप्रहरचे गाडीनें यावें. कळावें. ही वि.

गंगाधर देशपांडे

[पत्र नं. ५० : जन्मभर इतकी चळवळ करून व आगीशीं खेळ खेळूनहि गंगाधररावांचें स्थावर जंगम उत्पन्न अद्यापि कायम आहे, ही गोष्ट महात्मा गांधींना समजल्यानंतर, गांधीजींनीं गंगाधररावांना एक महत्त्वाचें पत्र लिहिलें

होतें. गांधीजींच्या मतें पत्र गांधीजींच्या महत्वाच्या प्रसिद्ध पत्रांपैकीं एक मानिलें जातें. तें मी माझ्याकडे जपून ठेविलें होतें. त्या पत्राची मागणी, डॉ. तेंडोलकर, गांधींच्या चरित्राचे इंग्रजी आठ खंड प्रसिद्ध करणारे, यांनीं साताऱ्याचे वयोवृद्ध व त्यागी नेते कै. भाऊसाहेब सोमण यांच्या मार्फत गंगाधररावांच्या कडे केली होती. त्या वेळीं गंगाधररावांनीं मला हें पत्र लिहिलेलें आहे. —पुंडलीकजी]

## पत्र नं. ५०

श्री                कुंदगोळ १९-१२

श्री. पुंडलीकजी यांस

वि. वि.

श्री. भाऊसाहेब सोमणांचें पत्र आलें आहे, त्याचप्रमाणें तेंडुलकरांचेंहि पत्र आहे. गांधीजींच्या पत्राचे फोटो मागितले आहेत. असतील तर जरूर पाठवावे. तेंडुलकरांचा पत्ता :

D. G. Tendulkar, 407, Kalbadevi Road, Bombay

२. चि. नाना जलालपुरकर यांचें टिपण खालील पत्त्यावर पाठवावें.

पत्ता : श्री बळवंत देशमुख वकील, चांदा—मध्यप्रांत

चि. माऊचें टिपण आलें आहे तें मी पाठवीत आहें.

३. वाकनीस, धारवाड रेडिओ यांची सरदारासंबंधानें रेडिओवर बोलण्याबद्दल तार आली आहे. शनिवारीं जाण्याचा विचार आहे. तेथून तसाच बेळगांवला येईन. मोहन वगैरे सर्व येणार आहेत.

४. श्री. रंगाणांना भेटावें. मुंबईला जा म्हणतील तर जावें. अर्ज वगैरे सर्व घेऊन जावें. कळावें. ही वि.

गंगाधर देशपांडे

[पत्र नं. ५१ हा मजकूर किंवा हे प्रश्न महात्मा गांधीजींना पाठविण्यासाठीं ती. गंगाधररावांनीं तयार केलेले होते. त्यांचें हिंदी भाषांतर करण्यासाठीं तो मजकूर माझ्याकडे दिलेला होता. वस्तुस्थिति महात्माजींना कळावी व जनतेला मार्गदर्शनहि लाभावें हा हेतु त्यांन त्यांचा होता. याचें हिंदी भाषांतर गांधीजींच्या सेक्रेटरीकडे पाठविण्यांत आलें होतें व तें ध्यानांत घेऊन गांधीजींनीं आपल्या व्याख्यानांतून व लेखनांतून खुलासा व मार्गदर्शनहि केलेलें आहे. —पुंडलिकजी]

दोन्ही कामें त्यांच्याकडून झाली तर त्यांनीं अधिकारग्रहण करण्यांत चूक झाली असें होणार नाहीं. आज लाचलुचपतीमुळें जनतेचा किती नैतिक अधःपात होत आहे व धान्याच्या परिस्थितीमुळें लोक किती लाचार होत आहेत हें पाहिलें म्हणजे या दोन संकटांतून लोकांना वांचवण्याकरितां तूर्त कोणती उपाययोजना शक्य आहे, याचा विचार झाला पाहिजे. अधिकारग्रहण हा एक उपाय आहे असें वाटत असल्यास तो करून पहाण्यासारखा नाहीं काय? कॅांग्रेस पुढारी तुरुंगांत आहेत, सरकार कोटेंच माघार घेण्यास तयार नाहीं, वगैरे गोष्टी जमेला धरूनहि, लोकांना या संकटांतून सोडवण्याला मार्ग दिसत नाहीं, म्हणून अपरिहार्य म्हणून अधिकारग्रहणाचा मार्ग अवलंबल्यास दोष काय आहे?

गंगाधर देशपांडे

[पत्र नं. ५२ :—पू. श्री. काकासाहेब कालेलकर यांनीं गंगाधररावांना लिहिलेलें हें पत्र गंगाधररावांनीं नीट जपून ठेवण्यास मुंबईस माझ्याकडे पाठविलें होतें. ती. *गंगाधररावांनीं हुदली गांधी आश्रम स्थापन* केल्यास कोणत्या पायावर तो स्थापिला जावा व कोणत्या नीतीनें तो चालवावा याविषयीं पू. काकासाहेब कालेलकर यांनीं हें पत्र लिहिलेलें आहे.

—पुंडलीकजी]

## पत्र नं. ५२

श्री

पू. श्री. गंगाधरराव यांचे सेवेसी.
विज्ञापना विशेष.

एकामागून एक अशीं दोन पत्रें लिहिलीं आहेतच. आज वर्षप्रतिपदेच्या सादर प्रणामानंतर तिसरें पत्र लिहीत आहें. पुंडलीकजी संबंधानें शेवटचें मीच ठरवावें असें ठरलें होतें. एवढी जबाबदारी मी स्वतः न घ्यावी म्हणून शेवटचा शब्द मी आपल्याच हातीं ठेविला. बेळगांवहून आलेल्या आपल्या कार्डावरून आपलाहि स्वतंत्र अभिप्राय तसाच झालेला दिसतो. कारण बाबासाहेब सोमण आणि पुंडलीकजी यांनीं आपल्याशीं बोलून मगच शेवटचें काय तें ठरवावें असें आपण त्यांना लिहिलें आहे. हा आवश्यक फेरबदल आपण मलाच लिहिला असता अशी माझी अपेक्षा होती.

अजूनहि माझा अभिप्राय कायम आहे कीं, आपल्या हाताखालच्या मंडळींना अनेक ठिकाणचीं जबाबदारीचीं कामें करण्यांची संधी मिळावी. असें झाल्यानें जेव्हां आपलें स्थायी कार्य मंडळी हातीं घेतील, तेव्हां त्यांच्या अनुभवाचा, प्रतिष्ठेचा आणि ओळखीचा आपल्या कार्याला फायदा मिळेल. आपलें कार्य केव्हां तरी इतकें जरूर

किती खर्च करणार, याची कल्पना असल्याशिवाय बजेट कसं होणार?' आणि आश्रमानें स्वाभिमानपूर्वक काम करावयाचें तर वर्षाची वेगमी काम करण्यापूर्वीच झालेली असली पाहिजे. आणि आंथरुणाहून अधिक पाय पसरावयाचे नाहींत असा निर्धार असावयास पाहिजे. वेळीं न केलेली मदत वंध्या असते इतकेंच नव्हे, पण हृद्रोगास कारणीभूत होते. अनिश्चित मदत ही कोणत्याहि प्रवृत्तीच्या शत्रुस्थानीं गणली पाहिजे. कार्यकर्त्यांनें ईश्वरावर भरंवसा ठेवून चाललें पाहिजे आणि कामाचा व्याप प्रत्यक्ष निश्चित तयारी असेल त्याच्या आंतच ठेवला पाहिजे. जुगारी लोकांसारखें वर्तन आस्तिक श्रद्धेचें लक्षण नव्हे. बाबासाहेब आणि पुंडलीक यांनीं पुढें विचार करावयाचा म्हणजे आपलेकडून जी निश्चित मदत मिळेल त्याच्या आंतच व्याप ठेवावयाचा किंवा तुटवडा पडेल तो भरून काढण्यासाठीं अन्यत्र पैशाची याचना करावयाची. सुरुवातीला त्यांना बाहेर जाणें शक्य नाहीं व इष्टहि नाहीं. आश्रमाच्या आंतील कामच भक्कम करण्यांत त्यांनीं आपली सर्व शक्ति खर्चली पाहिजे; आणि जोंवर आपण आश्रमाचे पोशिंदे आहांत तोंवर लोक यांच्या तपश्चर्येकडे बघणार नाहींत. पण आपण मदतीची शिकस्त केली आहे किंवा नाहीं हें पाहूनच आश्रमाची किंमत ठरवितील.

आपण मला या सुटींत आठ दिवसांसाठीं येऊन जाण्यास सांगितलें आहे. जर आश्रमासंबंधानें कांहीं निश्चित होण्यासारखें असेल तर मी जरूर येईन. बाबासाहेब व पुंडलीकजी दोघेहि त्या वेळीं हजर असतील. पण मग ठरावयाचें कांहींहि बाकी रहातां कामा नये. देशभर आज अनेक संस्था भिजत पडलेल्या आहेत. कारण आपल्या राष्ट्रांत चटदिशीं निर्णयात्मक असंदिग्ध निर्णय करण्याची शक्ति किंवा क्षात्रतेज फार थोडें आहे. सगळेच निर्वीर्य आगगट झाले आहेत. आपण ही परंपरा मोडून एक घाव दोन तुकडे करण्याची परंपरा सुरू करावयाची आहे. आपले कार्यक्रम चुकले तर नुकसान असें काय होणार आहे? पारतंत्र्याहून फारशी वाईट स्थिति यावयाची नाहीं. अशा प्रकारची मनोभूमिका समाजांत सुरू करावयाची आहे. आश्रम या कामीं पुष्कळ करूं शकेल. सुरुवात शास्त्रशुद्ध व चांगली झाली म्हणजे पुढील काम सोपें आहे. बाबासाहेबांचा स्वभाव भिडस्त, लोकांच्या दुर्गुणाला पोसणारा, एवढ्यासाठींच मी स्वतः येऊन आठ दिवस राहून सर्व गोष्टी सुरळीत करून द्याव्या म्हणतो. निश्चित कार्यक्रम घेऊन येणाऱ्याला आपण मार्ग सरळ करून देतां असा माझा विश्वास आहे. तो वापरून कामाची सुरुवात पहावी म्हणतो.

पण जर आपण इतर कामांत गुंतले असाल अथवा आश्रमाच्या कामाच्या सुरुवातीस हा वेळ अनुकूल नसेल तर त्याप्रमाणें कळवावें. म्हणजे मी पुढें केव्हां तरी अनुकूल वेळीं येईन. मला या उन्हाळ्याच्या सुट्टीचा कार्यक्रम लवकर नक्की करावयाचा आहे. यासाठीं तातडतोब उत्तर यावें अशी विनंती आहे.

आपला बालक
काका कालेलकर

[पत्र नं. ५३ :—ती. गंगाधररावांनीं इंग्रजी भाषेंत मला हें एकच पत्र लिहिलें आहे. त्या वेळीं विहारमध्यें भूकंपग्रस्त लोकांची सेवा करण्यासाठीं महात्माजींनीं मला विहारमध्यें मुझफरपूर जिल्ह्यांत श्रीमान् राजेंद्र बाबूजी—आजचे राष्ट्रपति डॉ. राजेंद्रप्रसादजी—यांच्या नेतृत्वाखालीं एक कार्यकर्ता म्हणून पाठविलें होतें. कारवारचे निष्ठावंत पुढारी श्रीमान् टी. एस्. नायक यांच्या नवीन योजनेविषयीं महात्माजींनीं एक अग्रलेख 'हरिजन' पत्रामध्यें लिहिलेला आहे. मुझफरपूरच्या पत्त्यावर मला हें पत्र मिळालें व मी त्यांना इंग्रजीमध्येंच उत्तर लिहिलें होतें. दोन्ही पत्रांच्या प्रती मी महात्माजींच्या-कडेही माहितीसाठीं पाठविल्या होत्या. "हा पत्रव्यवहार इंग्रजी भाषेंत काय म्हणून ?" असें मला बापूजींनीं समक्ष भेटीमध्यें आठवणीनें विचारलें आणि मी मौन स्वीकारून आपली चूक कबूल केली. —पुंडलीकजी]

## पत्र नं. ५३

Belgaum,
Date: 25th May, 1934

My Dear Pundlik,

I returned from Patna yesterday. You must have noticed from the statement of Mahatma Gandhi issued on the 7th April 1934 and also from the speech that he delivered at Patna at the A.I.C.C. Meeting, that he expects workers to take a vow of poverty and to live the life of a poor man. In his private conversation with some inmates of the old Sabarmati Ashram he was harping on the same point अपरिग्रह (non-attachment) and अनिकेतन (not having permanent home) are in his opinion ideal that a worker should set before himself.

When I read the statement of the 7th April, I was struck by its note and asked myself whether this applied to the Gandhi Seva Sangh. In one of his conversations at Wardha, he had referred to the ideal of the Seva Sangh in similar terms. He maintained that the idea was there though not strictly observed in practice. His repeated insistence on this, prompted me to write a letter to the President asking him whether the Seva Sangh was to be regulated on this line in future. The letter was read to Mahatmaji at Patna.

He expressed an opinion that, that ought to be the आदर्श ideal for the members. He was not clear whether it should be immediately brought into practice. As he was very busy the matter could not be fully discussed. Then a meeting of the Sangh was held. Rajendra Babu, C. R., Jamnalalji and myself from amongst the trustees were present. There were some members also. In view of the discussion we had with Mahatmaji the consideration of the whole question and re-drafting of the constitution was referred to a committee consisting of Rajendra Babu and Jamnalalji. In the meantime, I shall be glad to know your views in this respect in particular and also to the general lines of conducting our branch in future.

I may further add that in view of all these developments I have tendered my resignation of the membership, and it is under consideration.

Mr. T. S. Nayak of the Branch has already accepted the view expressed by Mahatmaji and he is living the life expected by him. He has now decided to live on a farm with a band of workers (about half a dozen) and work there as ordinary peasants and maintain themselves on the earnings from the labour on the farm. He had written to Mahatmaji about his plans and I am given to understand that they have been sanctioned by him.

Awaiting your reply,

Yours Sincerely,
G. B. Deshpande

P. S. our Gangappa Yamkaumardi is released today.

पत्र नं. ५४

श्री                    बेळगांव १३-३-१९३४

चि. पुंडलीकजी यास आ. वि.

पुष्कळ दिवसांत तुमच्याकडून पत्र नाहीं. दौऱ्याच्या धांदलींत मलाहि सवड झाली नाहीं. महात्माजींच्या या दौऱ्यास मी कारवारपासून विजापूरपर्यंत होतों. (ता. २७।२ पासून ९ मार्च पर्यंत). दौरा अपेक्षेपेक्षां जास्ती यशस्वी झाला. एकंदरींत निधि चाळीस हजारावर जमला. बेळगांव शहरानें ६००० रु. दिले व जिल्ह्यांत पांच हजारावर रक्कम झाली. बेळगांवास तीन दिवस मुक्काम होता. विन्हाडांतील व्यवस्था नानासाहेब

याळगीकडे होती. त्यांनीं चांगलें काम केलें. कांहीं ठिकाणीं नेहमींप्रमाणें रुसवाफुगवा झालाच. पण एकंदरींत सर्व यथास्थित झालें.

चि. सौ. लीलाकाचें लग्न ता. ७ रोजीं झालें. लग्न झाल्यानंतर दोन दिवसांनीं मी गदगला गेलों होतों! भेटून आलों.

एका कामांतून मुक्त झालों. आतां पुढील विचार.

काका कालेलकरांच्या जमिनीबद्दल ट्रस्ट वगैरे करण्याचें काम बापूजींनीं माझ्याकडे दिलें आहे. तिकडील हकीकत कळवीत असावें. प्रकृति ठीक आहे. कळावें हा आ.

गंगाधर देशपांडे

[पत्र नं ५५ ते ६४ :–बिहारच्या भूकंपग्रस्त लोकांची सेवा करण्याच्या माझ्या कामाचा समितीनें प्रसिद्ध केलेला छापील अहवाल मी ती. गंगाधररावांच्याकडे पाठवून, त्याच्याबरोबरच अधिकची माहिती दिलेली होती. अशा प्रकारें मी बिहारमधून वारंवार जी माहिती पाठवीत असें, त्याला उत्तर म्हणून हीं पत्रें मला ती. गंगाधररावांनीं लिहिलेलीं आहेत. महाराष्ट्रांतील राजकीय व सामाजिक चळवळीविषयींची माहितीहि त्यांत त्यांनीं दिलेली आहे.—पुंडलीकजी]

## पत्र नं. ५५

श्री बेळगांव ता. २३-३-३४

चि. पुंडलीकजी यांस आ. वि.

तुमचें पत्र पोचलें. बऱ्याच दिवसांत पत्र नव्हतें. म्हणून कालच स्वामींच्या नांवें पत्र लिहून तुमची चवकशी केली होती. १०।१२ दिवसांपूर्वीं त्यांच्या पत्त्यावर तुमच्या नांवें पत्र लिहिलें होतें तें पोचलें नाहीं असें दिसतें. तपास करावा.

मला तीनचार दिवस ताप येत होता. हल्लीं ताप नाहीं. थोडा अशक्तपणा वाटतो.

तुमच्या कामासंबंधानें तुम्ही लिहिलेलें बरोबर आहे. बाहेरच्या लोकांकडून कामें करून घेतल्यानें तेथील लोकांमध्यें आत्मविश्वास उत्पन्न होणार नाहीं. शिवाय, कामें योग्य रीतीनें करण्याची ताकदहि त्यांच्यामध्यें येणार नाहीं. बिहारी प्रेमळ आहेत व सात्विक आहेत ही गोष्ट खरी असली तरी त्यांच्यामध्यें Efficiency कमी आहे असें मला वाटतें. माझा अनुभव अगदीं कमी आहे. तथापि गांधी सेवासंघ किंवा अ. भा. चरखा संघाचीं कामें ज्या पद्धतीनें चालतात त्यावरून मी हें अनुमान काढलें आहे.

माझी चूक असण्याचा संभव आहे. जबाबदारीचीं कामें त्यांच्या अंगावर टाकून तीं योग्य रीतीनें त्यांच्याकडूनच करून घेतल्यास त्यांची शक्ति वाढेल. या बाबतींत तुम्ही स्वामींचा सल्ला घेण्याचें ठरविलें हें ठीक आहे. त्यांच्याच सल्लयानें वागावें. कामाला कंटाळूं नये. तिकडे जाण्यापूर्वी पूर्ण विचार करणें जरूर होतें. तुमच्या तिकडील भागांतील कामामुळें तुमची त्या प्रांतांत जास्ती आवश्यकता वाटल्यास तेंहि एका दृष्टीनें बरेंच आहे.

काका कालेलकरांच्या बेळगुंदी येथील जमिनींत हरिजन सेवेकरितां एखादा आश्रम स्थापावा अशी काकांची इच्छा आहे हें तुम्हाला माहीत आहे. या बाबतींत शंकर व बाळ यांची अनुमति आहे. त्याबद्दलचे कागदपत्र वगैरे करून सर्व व्यवस्था करण्याचें काम बापूजींनीं माझ्याकडे सोपवलें आहे. मीं शंकरला पत्र लिहिलें होतें. ट्रस्टीमध्यें मी तीन नांवें सुचविलीं होतीं—कृष्णराव याळगी, बाबासाहेब सोमण, व विठ्ठलराव शिरगांवकर. शंकरला हीं तीनीहि नांवें नापसंत नाहींत. पण त्याशिवाय त्यानें चार नांवें जास्ती सुचविलीं आहेत तीं—बाळ कालेलकर, पुंडलीकजी (तुम्ही), रामकृष्ण प्रभु, व मी (अध्यक्ष). प्रभु तुरुंगांत आहे तो सुटून येइपर्यंत त्याचें नांव घालूं नये असें बापूजींचें म्हणणें आहे. तो याच कामाला वाहून घेईल व हेंच काम करीत राहील तर त्याची योजना वाईट नाहीं. पण, त्याचा स्वभाव चंचल आहे. मी, तुम्ही, कृष्णराव, बाबासाहेब यांपैकीं कोणी एखादा असला तरी चालेल. माझ्या मतें कृष्णराव असतील तर बरें. पण मी असलेंच पाहिजे असा शंकरचा आग्रह आहे. त्याची भेट झाल्यास त्याचा विचारहि कळवावा. मला या कामाकरितां मुंबईस जावें लागेल व सॉलिसिटर खेर मार्फत कागदपत्र करून घेईन. बाळचें (कालेलकर). म्हणणें काय आहे हें कळल्यास बरें. मी सुचविलेल्या गृहस्थांपैकीं कोणीहि जेलला न जाणारे असल्यामुळें काम सुरळीत चालेल. तुम्ही, मी, बाळ, प्रभु यांचें जीवन अनिश्चित आहे. आमचें केव्हां काय होईल, कोणी सांगावें ? मी या बाबतींत पुनः शंकरला लिहिणार आहें.

मलाहि तुरुंगाबाहेर राहण्याचा कंटाळा आला आहे. घरच्या व चि. सौ. ठकूताईच्या अडचणी आड येत आहेत. श्री. रामराव मोकाशी यांची काळजी वाटते. तसा तो मनुष्य वाईट नाहीं. तूर्त तरी मी कुजत पडलों आहें, याबद्दल वाईट वाटतें. कुमरींत तरी स्वस्थ पडून राहिलों असतों. येथें दुसऱ्याच्या घरीं फार दिवस राहणें बरें नाहीं असें वाटूं लागलें आहे.

रावसाहेब पटवर्धनांचा दंड माफ झाला, आतां शिक्षेवरहि हायकोर्टांत अपील दाखल झालें आहे! त्यामुळें त्यांच्या त्यागाची किंमत कमी होणार हें उघड आहे. पण, या गोष्टी ज्याच्या त्याला पटल्या पाहिजेत. कोणावर असल्या बाबतींत जबरदस्ती होतां उपयोगाची नाहीं. पण कांहींहि असलें तरी दोन्ही पटवर्धनबंधू महाराष्ट्राचें भूषण आहेत.

बाकी विशेष नाहीं. वरचेवर पत्र पाठवीत असावें. कळावें हा आ.

गंगाधर देशपांडे.

## पत्र नं. ५६

श्री

चि. पुंडलीकजी यास
आ. वि.

वेळगांव ता. ३०-३-३४

तुमचें पत्र (ता. २३ चें) पोचलें. मजकूर समजला. बिहारच्या कामासंबंधानें तुमची विचारसरणी बरोबर आहे, व ती पू. बापूजींना पटेल असें मला वाटतें. कांहीं निवडक लोकांना तेथेंच राहावें लागेल.

कालच्या क्रॉनिकलमध्यें डॉ. हर्डीकरांचा एक लेख प्रसिद्ध झाला आहे. त्यांत बाहेरच्या लोकांची आवश्यकता आहे असा मजकूर आहे. श्री. हणमंतराव कौजलगी व कारखाननीस यांना तिकडे येण्याबद्दल पत्रेंहि आलीं आहेत. यावरून बाहेरच्या माणसांची जरुरी आहे असें दिसतें. बिहारी माणसें संकटांत असल्यामुळें त्यांचेकडून जसें काम व्हावें तसें होत नाहीं, म्हणून बाहेरचीं चांगलीं माणसें आलीं पाहिजेत असा त्यांच्या लिहिण्याचा अभिप्राय आहे. बापूजी व राजेंद्रबाबु काय तें ठरवतीलच. माझ्या समजुती-प्रमाणें तुमचें इकडे येणें अनिश्चित आहे. तिकडे काम असल्यास तुम्ही होऊन गडबड करूं नये असें मला वाटतें, काय होईल तें लवकर समजेलच.

माझी स्थिति अगदीं वाईट झाली आहे. प्रकृति बरी नाहीं. पचनक्रिया अगदीं बिघडली आहे. काय खावें हेंच समजत नाहीं. फक्त दुधावर व फळांवर राहण्याचा प्रसंग आला आहे. या गोष्टी बाहेर कशा चालतील? शिवाय, कोणत्याहि गोष्टीची हौस नाहीं असें झालें आहे. पूर्ण निष्क्रियतेचा पुरा अंमल आहे. कांहीं वाचावें म्हणून प्रयत्न करतों पण वाचवत नाहीं, वाचलेलें ध्यानांत राहात नाहीं अशी स्थिति आहे. एक प्रकारचा Nervous collapse आहे. शिवाय याळगींचें देणें बरेंच झालें आहे. याची फेड कशी करावी हा प्रश्न छातीवर आहे. त्यामुळें त्यांचे घरीं राहून पाहुणचार घेण्याची लाज वाटूं लागली आहे. माझ्यापासून त्यांना कोणताहि खाजगी अगर सार्वजनिक फायदा होत नाहीं. त्यांचीहि फायदा करून घेण्याची इच्छा नाहीं. मग विनाकारण त्यांचेवर माझें ओझें कां? असें वाटून एक प्रकारें मी खंगत चाललों आहें माझा स्वभाव तुम्हाला माहीत आहे. म्हणून माझी स्थिति काय झाली असेल याची कल्पना तुम्हाला चांगली येईल. कांहीं दिवस अज्ञातवासांत घालवावे असें वाटूं लागलें आहे.

बापूजींच्या दौऱ्याचे वेळीं ८।१० दिवस धांदलींत गेले. पण त्यावेळीं सुद्धां हौस अशी नव्हती.

काकासाहेब कालेलकरांच्या जमिनीचें ट्रस्ट करण्याचें एक काम आहे. तें एकदां लवकर संपवून पुढील कामाला लागेन.

वामनराव देसाई व आणखी दोघेतिघे आपल्या कामावर आज हजर होणार आहेत.

बापूजींच्या मुक्कामांत नगरकर वगैरे मंडळींनीं कांहीं विपरीत केलें नाहीं. शहाणपणा दाखविला किंवा म्याले. पुण्याहून किंवा महाराष्ट्रांतूनहि कोणी आलें नव्हतें. मी

कारवारला जाण्याच्या दिवशीं संकेश्वर मठाचे शंकराचार्य आले होते. त्यांना मुद्दाम आणवण्यांत आलें होतें अशी बातमी लागली. त्यांचीं प्रवचनें वगैरे करवून कांहीं धांदल घालतील असें वाटलें होतें. म्हणून मी वाईहून लक्ष्मणशास्त्री यांना येण्याबद्दल पत्र लिहिलें. त्याप्रमाणें ते आले. पण शंकराचार्यच येथून गेले. मी परत आल्यानंतर बापूजी येथें असतांनाच लक्ष्मणशास्त्र्यांचें एक व्याख्यान माझ्या अध्यक्षतेखालीं झालें. त्यांची बोलण्याची पद्धत वगैरे बरी आहे. त्यांच्या बुद्धीची तेजस्विता व झेप पाहून आनंद झाला.

सूर्त महाराष्ट्रांत मसूरकर बुवा व आनंदमूर्ति यांच्या भांडणास जोर आला आहे. शिवजयंतीच्या दिवशीं आनंदमूर्तीचें कीर्तन पुण्यास झालें. त्यावेळीं मसूर आश्रमाच्या चिथावणीवरून कांहीं बायकांनीं व पुरुषांनीं आनंदमूर्ति यांच्यावर जोडे फेकले व दंगा केला. आपला आश्रम वगैरे जप्त होण्याला आनंदमूर्ति हा कारण आहे असा मसूर आश्रमाकडून त्याचेवर आरोप करण्यांत आला होता. त्याबद्दल मोपटकर व चित्रावशास्त्री यांनीं चवकशी करून आश्रमाच्या विरुद्ध निकाल दिला. त्यामुळें ब्र. क्षीरसागर वगैरे मंडळी नाखुप झाली आहेत. बुवासाहेब कांहीं करीत नाहींत! क्षीरसागर पत्र वगैरे प्रसिद्ध करीत असतात. बिचारा विनाकारण या घाणींत पडला. आतां त्याला निघणें शक्य नाहीं. बुवागिरीनें त्याला चांगलें घेरलें. आपल्या आयुष्याची माती करून घेईल. त्याला यांतून सोडविला पाहिजे.

पुण्यास बाबूराव गोखले वगैरे मंडळी क्षेम आहेत. आपल्या नवीन पक्षाची उभारणी करीत आहेत! एकदां त्यांच्याबरोबर मनमोकळेपणानें बोलावें म्हणतों! माझ्या मनाचें समाधान, यापेक्षां त्यांत जास्ती कांहीं नाहीं. श्री. बापूजी अणे काय करतात पहावें. बहुतेक 'मागील पानावरून पुढें चालू' होईल असें वाटतें. ते येथें आले होते पण त्यांच्याशीं बोलण्याला वेळ मिळाला नाहीं.

मी एकदोन दिवस धारवाडला जाऊन येणार आहें.

बाकी सर्व ठीक आहे. कळावें हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. ५७

श्री

चि. पुंडलीकजी यांस — बेळगांव ता. ८-४-१९३४

आ. वि.

पत्रें पोचलीं. पूज्य बापूजींचें Statement हि त्यांच्या मार्फत आलें. काल तारेंतच थोडाबहुत मजकूर आला आहे. मला Statement वाचून Shock वाटला. पण बापूजींशिवाय परिस्थितीची परीक्षा तरी कोणी करावी? एकंदरींत आमचें नष्टचर्य संपत नाहीं. कांहीं मंडळींना आनंद झाला असेल!! Statement प्रसिद्ध करावें

किंवा नाहीं याबद्दल माझें मत विचारलें होतें. प्रसिद्ध करावें असें माझें मत दिलें. आतां पुढें काय होतें, पहावें.

मी काल धारवाडहून आलों. रावसाहेबांची मातुःश्री व धाकटा भाऊ (जनुभाऊ) आले होते.

बाकी मजकूर उद्यां परवां लिहीन. पण आश्रमवासीयांपैकीं कोणाकोणाबरोबर काय काय बोलणें झालें तें तुम्हाला माहीत असल्यास कळवावें. Statement मध्यें सर्व खुलासा नाहीं. कोणाच्या संबंधानें व कोणत्या बाबतींत काय काय बोलणें झालें तें जाणण्याची इच्छा आहे. हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. ५८

श्री

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि.

बेळगांव १२-४-१९३४

परिस्थिति मला पूर्णपणें समजली. सत्याग्रह आपल्यापुरता मर्यादित करून बापूंनीं सरकारावर एक पेंच टाकला आहे. त्याचप्रमाणें आमच्या लोकांचीहि परीक्षा आहे. कसें काय होतें पाहूं. XXXXनीं आपल्या सहीनें 'केसरीं'त एक लेख लिहून पोटांतील सर्व ओकलें आहे! आतांच असलेलें सर्व विष ओतून पोट शुद्ध करून घेऊन पुन्हा विष उत्पन्न होऊं नये अशी व्यवस्था केल्यास महाराष्ट्रावर किती तरी उपकार होतील. भाउरावांचें मला एक पत्र आलें होतें. हल्लींच्या धोरणाबद्दल काय वाटतें असें त्यांनीं मला विचारलें होतें. 'बापूंनीं केलेलें योग्य असून, मी एखादें विधायक काम करीत राहणार' असें उत्तर दिलें. याच धोरणाला उद्देशून मी कर्नाटकाकरितां आज एक पत्रक संयुक्त कर्नाटकांत प्रसिद्ध केलें आहे. मला All India Leader होण्याची इच्छा नाहीं. कर्नाटकापुरतीच माझी धांव आहे. तीहि संकुचित झाली तर मला हवी आहे. कांहीं लिंगायत तरुणांचें व माझें बोलणें झालें. त्यांचें व माझें सहकार्य होईल असें वाटतें. तसें झाल्यास लिंगायत ब्राह्मण समाज आतापेक्षां जास्ती जवळ येण्याला कारण होईल.

धारवाडला गेलों होतों. वडवीची प्रकृति आतां थोडी सुधारली आहे. चि. वामनराव देसाई बिद्री व आणखी तीन स्वयंसेवक कोण्णूरच्या जत्रेला पिकेटिंगला गेले होते. तीन महिने स. म. व ५० रु. दण्ड अशा शिक्षा झाल्या. वामनरावांची बायको अद्यापि तुरुंगांतच आहे.

एक वर्षपर्यंत बिहारमध्येंच राहण्याचें तुमचें निश्चित झालें आहे काय? आता गडबडीनें इकडे येण्याचें कारणहि राहिलें नाहीं.

काकासाहेब कालेलकरांचा 'हिंडलग्याचा प्रसाद' लवकरच प्रसिद्ध होणार आहे. दिवेकरशास्त्री पुण्यांत 'बुवाबाजी'वर व्याख्यानें देत आहेत. बुवाबाजी व बायाबाजी हे

शब्द समानार्थक आहेत असें त्यांनीं विधान केलें. एका उपवक्त्यानें दिवेकरांच्या उखाळ्यापाखाळ्या काढण्याचा प्रयत्न केला. पण दिवेकरांनीं सभा रेटून नेली. उपवक्ता माहीतगार होता. प्राज्ञपाठशाळेपासून तों मयूराश्रमापर्यंत त्यानें साखळी लावली होती. दिवेकरांशिवाय दुसरा मनुष्य असता तर गोंधळून गेला असता !! दिवेकरांनीं आपल्या भाषणांत 'पटवर्धनबुवा' कसे भ्याड आहेत याची हकीकत सांगितली. हें त्यांनीं करावयास नको होतें. मयूरकरबुवांना सोडून इतर बुवांची नांवनिशीवार हजेरी घेण्यांत आली. इतर वक्त्यांनीं मयूरकरांनाहि सोडलें नाहीं. एकंदरींत पुण्यांत काय चाललें आहे ? राजकारणांतहि गांधींनीं बुवाबाजी आणली आहे असें दिवेकरांचें म्हणणें आहे. त्यांच्याशीं एकदां बोलणार आहें. माझ्याशीं ते मोकळेपणानें बोलतील.

बाकी सर्व ठीक आहे. माझी प्रकृति ठीक आहे. केसरींत बिहारचें एक बातमीपत्र आलें आहे. त्यांत बाहेरून गेलेल्या लोकांच्या खाण्यापिण्याचे फार हाल चालले आहेत व त्यांच्याबद्दल स्थानिक लोकांत मत्सरभाव उत्पन्न झाला आहे असें लिहिलें आहे. त्याचप्रमाणें डॉ. हर्डीकर व त्यांची सव्वीस माणसें (६ बाया व २० पुरुष,) यांची स्तुति आली आहे.

स्वामींना मी एक पत्र लिहिलें आहे. बाबासाहेब सोमण व त्यांच्या घरची मंडळी क्षेम आहेत.

रावसाहेब पटवर्धन बरे आहेत. त्यांची आई व त्यांचा भाऊ (अनुभाऊ) हे भेटीला आले होते, हें गेल्या पत्रांत लिहिलें आहेच. त्यांच्या भेटीनें मला आनंद झाला. याळगी मंडळी बरी आहेत. मी पुन्हा उद्यां धारवाडला जाणार आहें.

सरकारचें धोरण निश्चित समजल्यानंतर पुढील कार्यक्रमाबद्दल विचार करीन कळावें हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

ता. क. :—दत्तु अध्यापक भेटला होता. हुदलीस त्याच्या पैशाबद्दल कांहीं खटपट त्यानें चालवली आहे. दावा कांहीं करणार नाहीं पण हुदली, हुलधाळ येथें भिक्षा मागत राहणार असें त्यांनीं कळवलें आहे. तुम्ही १५० रु. घर भागवतों म्हणालां होतां अशी खबर लोक पुढें करीत आहेत.

## पत्र नं. ५९

श्री                    बेळगांव ता. १६-४-३४

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि. पत्रें पोचलीं. मजकूर समजला. तुमच्या पत्रांवरून व statement वरून सर्व परिस्थिति माझ्या लक्षांत आली. तुमचें आणि माझें या संबंधांत एक मत आहे. बापूजींचें नेतृत्व पचवण्याइतपत देखील आमची योग्यता नाहीं.

कर्नाटकामध्यें कौन्सिलप्रवेशासंबंधीं उत्साह दिसत नाहीं. स्वराज्यपक्षातर्फे उभे रहाणारे लोक मिळतील. पण, हौस नाहीं. महाराष्ट्रांत नवाकाळ व नवशक्ति हीं दोन दैनिकें बापूजींना उचलून धरीत आहेत. जावडेकर हे नवशक्तीचे संपादक आहेत. Free Press चें मराठी दैनिक अलीकडे निघालेलें आहे. जावडेकरांचा ओढा समाजसत्तावादाकडे आहे. पण बापूजींची तत्त्वें त्यांना पटतात. ज्ञानप्रकाश संभाळून लिहितो. बार्कोचीं बहुतेक सर्व पत्रें आनंदानें बेहोप होऊन बापूंवर तुटून पडत आहेत. बाबूराव मला बरींच लांबलचक पत्रें लिहीत असतात. मीहि त्यांना माझी बाजू कळवीत असतों. आपले दोष झाकून ठेवण्याकरितां कांहीं पुढाऱ्यांच्या युक्त्या अजब आहेत. बुवाबाजी, मधुराश्रम अशासारखे विषय घेऊन, वादविवाद करून, चटोरपणाचा बाजार भरविण्यात महाराष्ट्र गर्क आहे. नवीन स्वराज्यपक्षाच्या हाताला हात लावण्याची संधी कशी मिळवावी या विचारांत राजकारणी मुत्सद्दी गुंतले आहेत.

माझ्या मनांत उरलेलें आयुष्य तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें घालवावें असें आहे. पण, पैशाचा प्रश्न उभा राहतो. आजपर्यंत कोणाजवळ याचना करण्याची पाळी आली नव्हती. यापुढें तसें चालणार नाहीं.

कांहीं तरी Drastic measure घेऊन मनाची शांतता मिळवण्याचा विचार करतों. पण निश्चय होत नाहीं. Hamlet प्रमाणें स्थिति झाली आहे. पण, लवकरच काय तें करीन.

ठाकूर, स्वयंसेवक काळे यांच्यावर Parol च्या हुकमाची अंमलबजावणी कां करूं नये याबद्दलचीं कारणें दाखवण्याकरितां नोटिसा बजावल्या आहेत. मागें राहून कारस्थानें करणाऱ्यावर असे प्रसंग येणारच.

मोहन काल आला आहे. पास होईन असें म्हणतो. या वर्षी नापास होणार नाहीं. पण त्याचें पुढें काय करावें हा प्रश्न आहे.

श्री. अण्णासाहेब सहस्रबुद्धे पुनः भेटतील तेव्हां त्यांना माझा नमस्कार सांगावा. त्यांच्यासारख्याकडे पाहून मनाला समाधान होतें, व आशाहि वाढतात. तुमचा व त्यांचा संबंध आला हें फार बरें झालें.

वालजी देसाई यांच्या चुकीमुळें महात्माजींना हें करावें लागलें असें केसरींत आहे. खरें का? हल्लीं बापूंबरोबर वालजी आहेत ना? कळावें हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

ता. क. :—पुस्तकें कांहीं जेलमध्यें दिलीं आहेत. तुम्हाला कोणत्या विषयावरचीं पाहिजे आहेत, कळवावें.

कदाचित् मी रांचीला येईन. प्रकृति बरी आहे. काळजी करूं नये. सांगलीच्या श्री. गणपतराव अभ्यंकरांना ताप येत असतो. एक पाय त्यांचा कापून काढला हें तुम्हांला माहीत असेलच. बरेच अशक्त झाले आहेत. त्यांच्याबद्दलची माहिती रोज मिरजेहून मागवीत असतों. माझ्या व तुमच्या संबंधाबद्दल लिहिण्याची आवश्यकता नव्हती.

मी सर्व ओळखून आहें. इतक्या दिवसांच्या सहवासानंतर मला इतक्या साध्या गोष्टीहि समजत नाहींत असें वाटतें काय? अगदीं कंटाळा आला तर नगरला पटवर्धन बंधूंच्याकडे व मुंबईला ४-५ दिवस जाऊन येईन. गांधीजींशीं झालेल्या कार्यकर्त्यांच्या चर्चेच्या वेळचीं प्रश्नोत्तरें जरूर लिहून काढावींत, व माझ्याकडे पाठवावींत. त्यांत चुका असूं नयेत.

रिपोर्ट पोचला. पुनः प्रकाश पडला. गांधींनीं स्वीकारलेलाच मार्ग योग्य आहे. कळावें. हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. ६०

श्री

बेळगांव

चि. पुंडलीकजी यांस

ता. २७-४-१९३४

आ. वि.

पत्रें पोचलीं. गुजराती टिपणें पोचलीं. इंग्रजीहि पोचलीं. कदाचित् मी ता. १८ च्या सभेकरितां पाटण्यास येईन.

फार फिरण्यांत वेळ घालवण्यापेक्षां इकडे यावें हें बरें. माझ्याहि मनांत दूर हिमालयांत फिरून यावयाचें आहे. त्यामुळें थोडी शांति मिळेल. तुम्ही लवकर आल्यास बरोबर जाऊं. तथापि तुम्ही मागितलेले ५० रु. पाठवीत आहें. माझ्या जाण्याचा नियम नसतो म्हणून एकट्यानेंच जाऊन यावें असें वाटल्यास माझी ना नाहीं.

कर्नाटकांत मी दौरा काढावा असें तुमचें मत आहे. पण त्या बाबतींत मी अद्यापि साशंक आहें. एक, माझें स्वतःचें मन स्वस्थ नाहीं. व दुसरें, या धामधुमींत कोणची दिशा कर्नाटक घेईल हें सांगणें कठीण आहे. खात्रीचीं म्हणून वाटणारीं माणसें देखील सोडून जातील असें वाटतें. अश्रद्धेचा काल आहे. पाहूं.

आज श्रीरंग सुटला. प्रकृति बरी आहे. माझी थोडा वेळ भेट झाली. मनःस्थिति बरी दिसते. बापू गोखलेनें १० दिवस उपवास केला. तुरुंगांत आपल्याकडून योग्य वागणूक झाली नाहीं म्हणून प्रायश्चित्त! बुधवारीं उपास सुटला. जेलसुपरिंटेन्डंटनें उपवासांत त्याला चांगलें वागवलें. अद्यापि हॉस्पिटलमध्यें आहे. फार बोलतो असें लोक म्हणूं लागले. म्हणून तो दोष घालवण्याकरितां एक महिन्यापूर्वी तीन महिन्याचें मौनव्रत त्यानें घेतलें आहे, व तें चोख पाळीत आहे. जेल सुपरिंटेन्डन्ट त्याच्याशीं बरा वागतो. इतरांशीं देखील बराच चांगला वागतो म्हणे!

६।७ दिवस शंकर कालेलकर येथेंच आहे. माझें व त्याचें बोलणें झालें होतें. कांहीं गोष्टींसंबंधानें मी त्याच्याशीं बोलत नाहीं, बोलण्यासारखें नाहीं, न बोलणेंच बरें! काल तो, मी, विठ्ठलराव शिरगांवकर असे तिघे मिळून बेळगुंदीला जमीन पहाण्याकरितां

गेलों होतों. ट्रस्टचा ड्राफ्ट तयार केला आहे. तुम्ही ट्रस्टींमध्यें असावें अशी त्यांची इच्छा आहे. मी अद्यापि नांवें निश्चित केली नाहींत.

मला जरी फारशी आशा वाटत नाहीं तरी नवीन वातावरणांत काकासाहेब भेटतील किंवा नाहीं असें वाटूं लागलें आहे. पाटण्याच्या सभेनंतर ८–१५ दिवसांत काय तें दिसेल.

महाराष्ट्रांतील भांडणें अशींच चालवयाचीं असें बाबुराव लिहितात! शक्य असल्यास सहानुभूतीनें काम करावें. पण केळकर पक्षाशीं नवीन स्वराज्य पक्षानें मिळूं नये असें माझें मत आहे. मी भुलाभाई यांच्याकडे हें बोललों आहें, व तसें बाबुरावांनाहि लिहिलें आहे. तेहि तसेंच म्हणतात. पण राजकारण आहे! काय होईल हें कोणी सांगावें?

प्रकृतीला संभाळून असावें. चि. मोहनला थोडा ताप येत आहे. काळजी करण्यासारखें नाहीं. पटवर्धन बंधूंना नमस्कार पोचवीन. जीवनराव याळगी तर तुमचीं पत्रें वाचतातच. त्यांची श्रद्धा अढळ आहे. कळावें हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. ६१

श्री मंगळवार ४–६–३५

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि.

पत्र पोचलें. काकासाहेब कालेल्कर यांचें पत्र वाचलें. त्यांत तुम्हाला लाज वाटण्यासारखें कांहीं नाहीं. काकांनीं वस्तुस्थिति लिहिली आहे. तुमच्याकडून जास्ती काम व्हावें अशी त्यांची इच्छा आहे व माझीहि पण तशीच आहे. तुम्हाला येथेंच कोंबून ठेवावें असें मलाहि वाटत नाहीं. प्रत्येक कार्यकर्त्यानें आपापल्या इच्छेप्रमाणें व शक्तीप्रमाणें काम करीत राहावें. त्यांत त्याचा स्वतःचा व देशाचा फायदा असो.

मोहनचा कॉलेजचा खर्च मी करतों व बाबासाहेब सोमण यांच्याबद्दलहि कांहीं तरी करावें लागतें हें काकासाहेबांना योग्य वाटत नाहीं. यांतहि तत्त्वतः कांहींच तथ्यांश नाहीं असें नाहीं. फक्त २५ रु. दरमहा करतां तुमची कुचंबणा होत असेल तर इतर ठिकाणीं काटकसर करून मी ती अडचण दूर केली पाहिजे असें त्यांचें म्हणणें आहे. आपला व त्यांचा पूर्वीं कांहीं तरी पत्रव्यवहार झाला असेल. त्यावरून त्यांना जें कांहीं वाटलें तें त्यांनीं लिहिलें आहे. तुम्हीहि विचार करावा. नाईकमास्तरप्रमाणें Being is doing ही पद्धत स्वीकारावी किंवा काकासाहेब म्हणतात त्याप्रमाणें पुढारीपण अंगीं आणण्याची खटपट करावी. तुमच्यामध्यें दुसरा मार्ग पत्करण्याची पुरी ताकद आहे हें मला मान्य आहे, व त्यांतहि मला आनंदच आहे.

मी काकासाहेबांना आज उत्तर लिहीन. मोहनबरोबर किंवा चि. यमूताईबरोबर तुम्ही बोला. मीहि तिकडे आल्यानंतर बोलेन. आज थोडें काम आहे म्हणून येणें होत नाहीं. उद्यां येईन. खाजगी गोष्टीची चिंता वाहण्याचा मला हा पहिलाच प्रसंग आहे. असो. आलेल्या गोष्टीला 'सादर' असलें पाहिजे. हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. ६२

श्री मंगळवार

चि. पुंडलीक यांस आ. वि.

लगत काकांना लिहिलेलें पत्र पाठवीत आहें. तें वाचून त्यांना तुम्हाला कांहीं लिहावें असें वाटल्यास त्यांतच लिहावें व तें नंतर टपालांत टाकावें.

१०००० वार सूत पाठवावयाचें आहे. म्हणजे त्या ऋणांतून मुक्त होईन. आज ९५०० वार झालें. उद्यां सर्व पुरें करीन व परवां येईन. सर्वांच्या प्रकृतीला जपावें. हा. आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. ६३

श्री

चि. पुंडलीकजी, यांस आ. वि.

तुमचें पत्र पोचलें. तुम्ही मला पैशाच्या बाबतींत काकासाहेबांना लिहिण्याबद्दल कळवलें म्हणून त्यांनीं हें पत्र लिहून मध्यस्थी केली असें माझें म्हणणें नाहीं. तुमच्या स्मार्गात पैशाची अडचण आहे असें त्यांना तुमच्या लिहिण्यावरून वाटलें असावें. कामाबद्दल तुमच्या मनाचा कल काय झाला आहे याची कल्पना त्यांना नसावी. हल्लीं यांनीं हातीं घेतलेलें काम त्यांना श्रेष्ठ वाटणें साहजिक आहे. त्या कामांत तुमच्या सारख्यांचें साहाय्य मिळावें अशी त्यांची इच्छा आहे. तुम्हांला हें काम घेण्याला पैशाची अडचण व माझी तुमच्यावरील गुलामगिरी या दोन गोष्टी आड येतात अशा समजुतीनें त्यांनीं पत्र लिहिलें आहे. त्यांचाहि दोप नाहीं. हिंदीप्रचार. हेंहि एक महत्त्वाचें काम आहे. तें कर्नाटकांत तुम्ही करावें अशी त्यांची इच्छा. यालाच ते पुढारीपण म्हणतात. एखाद्या खेड्यागांवांत बसण्यापेक्षां प्रांतभर हिंडावें, चार लोकांत मिसळावें, व्याख्यानें द्यावींत, पैसा जमवावा वगैरे कामें केल्यानें सहज पुढारीपण येतें. यांत कमीपणाहि नाहीं व केवळ विनयानें हें काम सोडावें असेंहि नाहीं. जर तुमचा उपयोग हिंदी प्रचाराच्या कामीं होत असेल तर अवश्य करावा. कर्नाटकांत होत नसेल तर महाराष्ट्रांत देखील करावा. हा आशीर्वाद.

बुधवार ता. ५।६।३५ . गंगाधर देशपांडे

## पत्र नं. ६४

श्री हुदली

ता. १८-७-१९३५

आ. वि.

मी परवां सायंकाळीं येथें आलो. निवडणुकीची धांदल बरीच चाललेली दिसली. पण मी तेथें राहिलों नाहीं.

येथें श्रीरंग, अण्णु, वामनराव, वडवी काल भेटले. वामनराव थोडा आजारी आहे. वडवींचें काम चालूं आहे. एक वर्ग काढला आहे. भजन चालूं आहे. रस्ता-सफाईचें कामहि हातीं घेतलें आहे. कांहीं तरुण मंडळी साहाय्य करीत असतात, असें समजलें. विहिरीचें काम तूर्त बंद आहे. चुन्यानें बांधावयाचें काम शिल्लक आहे. बाहेरचें पाणी आंत जाणार नाहीं, इतकें बांधकाम झालें आहे.

प्रभू येथें आला होता. त्यानें हुबळीचा आश्रम सोडला, होसरित्तीला जाऊन राहणार आहे. Rolling stone प्रमाणें त्याची स्थिति आहे.

होसरित्ती येथील कामाबद्दलची माहिती श्रीरंग कडून समजली. मोठा पसारा आहे असें त्यांना वाटतें. २५०० रु. चा खर्च आहे. त्यापैकीं यावर्षी ७०० रु. A. I. S. A. कडून मिळाले आहेत. १८-२० माणसें एकत्र आहेत. कांहीं माणसें खेडोपाडीं पांगविण्याचा त्यांचा विचार आहे. पण लायख माणसें ३-४ पेक्षां जास्ती निघणार नाहींत.

पी. व्ही. पाटील हे नेसवीकरितां धारवाड जिल्ह्यांत एक आश्रम काढणार आहेत. नेसवी बरोबर ५-६ मंडळी राहणार आहेत. होसरित्तीच्या मंडळींचे व पाटलांचें जुळत नाहीं असें श्रीरंग सांगत होता.

Bread Labour संबंधानें मी येथील मंडळीबरोबर चर्चा केली. श्रीरंग, वामनराव, अण्णु यांना कल्पना नापसंत नाहीं. हुदलीभागांत किंवा अकतंगेरहाळ जवळ कोठें जमीन मिळाल्यास ती करून राहाण्याची त्यांची तयारी आहे. पण या कामालाहि भांडवल लागणारच. मी येथें हुदलीमध्यें तयारी करून देईन. पण मी हें त्यांच्याजवळ बोलणार नाहीं. त्यांचेकडून proposal आल्यास विचार करीन. त्यांचा ७-८ मंडळींचा ग्रूप होणार आहे असें म्हणत होते. Bread Labour न साधल्यास १०००-१२०० रु. वर्षाकाठीं त्यांना लागणार! हे मिळवावेत कसे हा प्रश्न आहे. मी तरी काय सांगणार! त्यांचे हेच विचार कायम राहिल्यास त्यांना प्रोत्साहन व मदत द्यावी असें वाटतें. पण त्यांचे हे विचार टिकणार नाहींत.

मायाला भेटून त्याला अखेर आपला निश्चय श्रीरंग कळवणार आहे.

कारवार जिल्ह्यांत राहण्याचा नायकांचा विचार बरोबर आहे. पण आम्ही आमच्या दृष्टीनें पहातों. त्यांचा उपयोग करून घेण्याला संधी बरी आहे. प्रांताच्या

दृष्टीनें देखील कारवारच्या बाहेर एखादें केंद्र जास्ती सोयीचें आहे. वर्ध्यास मी त्यांच्याबरोबर बोलेन. मी फार आग्रह करणार नाहीं. आग्रह करूनहि उपयोग नाहीं.

पुण्यास सर्व मंडळी भेटली होती. केळकरांच्याकडे जेवावयास गेलों होतों. केळकर पक्षाबरोबर तडजोड करण्याच्या विरुद्ध कॉंग्रेसची मंडळी आहेत. स्वाभाविक आहे. सहज बोलतांबोलतां प्रश्न निघाला होता. मी होऊन हा प्रश्न काढला नाहीं. पण बापूजी अणे या संबंधांत कांहीं करतील असें सर्वांना वाटतें. रावसाहेब पटवर्धनांचा कल Socialism कडे आहे. ते त्या पक्षाचे सभासद होणार आहेत.

याळगींच्या घरची मंडळी क्षेम आहेत. तिकडील हकीकत कळवीत असावें. कळावें. हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

पाऊस नहीं. काळजी वाटते.

[पत्र नं. ६५ :—श्री. जीवनरावांना पाठविलेल्या पत्राची प्रत माझ्याकडे माहितीसाठीं गंगाधररावांनीं पाठविली होती. बेळगांव जिल्ह्यांतील कॉंग्रेस कार्यकर्त्यांमधील मतभेद मिटवावेत हा प्रयत्न त्यावेळीं गंगाधररावांचा चालू होता. —पुंडलीकजी]

पत्र नं. ६५

श्री वर्धा ता. ३-८-१९३५

चि. जीवनराव याळगी यांस—

सा. न. वि. वि.

तुमचें पत्र काकांसाहेबांना दाखविलें. त्यांनीं तें पू. बापूजींचेकडे पोचविण्याचें कबूल केलें आहे. मला वर्किंग कमिटीच्या व इतर कामामुळें सवड झाली नाहीं. कदाचित् आज त्यांच्याकडे जाईन.

मी उद्यां किंवा परवां इकडून निघेन.

चि. श्रीरंग कोठें आहे? त्याची व पुंडलीकजींची गाठ पडली किंवा नाहीं कळलें नाहीं.

आज सूत कांतण्याच्या मजुरीसंबंधानें चर्चा होणार आहे. मी तो विषय चांगला समजून घेतला आहे. झाल्यानंतर तुम्हांला सांगेन. कळावें ही वि.

गंगाधर देशपांडे

[पत्र नं. ६६:—पू. श्री. काकासाहेब कालेलकर यांच्याशीं Being is doing याविषयीं आणि व्यक्तिशः माझ्याविषयीं चर्चा केल्यानंतर ती. गंगाधररावांनीं मला लिहिलेलें हें पत्र आहे. —पुंडलीकजी]

## पत्र नं ६६

श्री वर्धा.

श्री. पुंडलीकजी, आ. वि.

शेतकी करून राहण्यासंबंधानें काकासाहेबांबरोबर चर्चा मीं केली. त्यांचें मत इतकें अनुकूल नाहीं. ध्येयाबद्दल त्यांना शंका नाहीं. पण शक्याशक्यतेबद्दल त्यांना शंका आहे. तुम्ही बेळगांव जिल्ह्यापुरतें तरी हिंदीचें काम करावें असा त्यांचा विचार आहे. त्यांच्याशीं पूर्वींप्रमाणें तुम्ही पत्रव्यवहार करावा. फक्त कामाच्या धांदलीमुळें पूर्वींप्रमाणें लांब उत्तरें त्यांना घालतां येणार नाहींत. पण हा नियम कांहीं नेहमींकरितां नाहीं. याकरितां मोकळेपणानें त्यांच्याशीं पत्रव्यवहार चालू करावा.

तुमच्या 'हिंदी शिक्षक'संबंधानें त्यांनीं बाबू पुरुषोत्तमदास टंडन बरोबर बोलणें केलें आहे. पूर्वीचें तुमचें पुस्तक सुधारलें पाहिजे असें काकांना वाटतें. त्याबद्दलच्या सूचना ते तुम्हाला करणार आहेत. पण तुमची प्रत्यक्ष भेट झाली पाहिजे. कांहीं पुस्तकेंहि ते आपल्याला सुचविणार आहेत. प्रत्यक्ष भेटींत जास्ती खुलासा होईल. पुस्तक सुधारून काढल्यास छापवण्याची व्यवस्था त्यांना करतां येईल. ते मुंबईस १०-१२ दिवसांत जातील व तेथें १५-२० दिवस राहणार आहेत. त्या अवधींत तुम्ही कृष्णराव याळगीबरोबर आल्यास भेट होईलच. कृष्णराव न आल्यास काका मुंबईला गेल्यानंतर तुम्हाला मुंबईस येतां येईल. कृष्णराव येणार किंवा नाहीं कळलें नाहीं. चि. सौ. नन्हकाच्या प्रकृतीबद्दल पत्र नाहीं.

चि. श्रीरंगबरोबर बैलहोंगला गेलाच असाल. कृष्णराव मुंबईस इतक्यांत येणार नसतील तर मी मुंबईस एक दिवस राहून दुसरे दिवशीं निघेन. कळावें. हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

[पत्र नं. ६७:—सन १९४२ च्या चळवळीमध्यें हिंडलगा तुरुंगांत ती. गंगाधररावांनीं कांहीं टिप्पणें लिहिलेलीं होतीं. तुरुंगांत अन्नामध्यें कांहीं विष गेल्यामुळें, एक रोग फैलावत होता. रोज एकदोन सत्याग्रही बळी पडण्याचें सुमारें एक आठवडा चाललेलें होतें. त्यावेळीं एक दिवस ती. गंगाधररावांनाहि तशाच प्रकारच्या रोगाचीं लक्षणें आपल्यामध्यें दिसून आलीं. त्यांनीं लागलीच मला ही गोष्ट प्रथम सांगितली. आणि तसें कांहीं झाल्यास, आपली अंतिम इच्छा म्हणून आपल्या नोटबुकांत कांहीं गोष्टी लिहून ठेविल्या होत्या. 'तुझ्याविषयीं मी असें लिहून ठेविलें आहे. इतकें पुरे ना?' असें मला त्यांनीं विचारलें व बोलतांबोलतां त्या चारपांच ओळी माझ्या नोटबुकावरहि त्यांनींच लिहून काढल्या. तोच हा मजकूर आहे. —पुंडलीकजी]

## पत्र नं. ६७

**श्री**

"ता. २३-१२-४२ रोजीं जो मजकूर लिहिला आहे त्यांत पुंडलीकजींच्या संबंधानें मी कांहीं लिहिलें नाहीं. आज जवळजवळ पंचवीस वर्षेपर्यंत तो माझ्याजवळ आहे. आमच्या कुटुंबापैकींच तो एक आहे असें मी मानत आलों आहें. त्या नात्यानेंच तोहि माझ्या बरोबरच नव्हे तर आमच्या कुटुंबांतील सर्वांबरोबर वागत आला आहे. अगदीं निरपेक्षपणें त्यानें माझ्या कौटुंबिक कामांत व स्वराज्याच्या अनेक चळवळींत माझ्या बरोबरीनें निरपेक्ष सेवा केली आहे. हें सर्व लक्षांत आणून त्याला त्याच आपुलकीनें माझ्या सर्व कुटुंबियांनीं वागवावें अशी माझी इच्छा आहे. यापेक्षां अधिक अपेक्षा तोहि करणार नाहीं असा मला विश्वास वाटतो. हें एवढें मी लिहून ठेविलेलेंहि त्याला पसंत पडेल असें नाहीं."

[पत्र नं. ६८, ६९, ७०, ७१, ७२, ७३, ७४, हीं सात पत्रें मी नाशिकच्या तुरुंगांत असतांना, मला गंगाधररावांनीं स्वतः लिहिलीं किंवा त्यांच्या सुनेकडून लिहविलेलीं आहेत. ---पुंडलीकजी]

## पत्र नं. ६८

**श्री**

बेळगांव ता. १७-१०-४३

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि.

माझ्या प्रकृतींत विशेष सुधारणा नाहीं. Injections चालू आहेत. पाहूं. तुमचे 'पुण्याचे स्नेही' भेटले होते. त्यांचेकडून कांहीं हकीकत हळुहळु समजूं लागली आहे.

प्रकृतीच्या अस्वस्थतेमुळें उत्साह वाटत नाहीं.

कालपासून सकाळीं फिरावयाला जाऊं लागलों आहें. टळकवाडीवर घर पहात आहें. भाऊसाहेब सोमण ऊर्फ किरात बरेच थकले आहेत. बाहेर जात नाहींत. चि. भास्कर सोमण रजेवर येणार आहे. बाबासाहेब क्षेम आहेत. हुदलीला अद्यापि गेलों नाहीं. जाऊन येणार आहें.

पुण्यास वासुकाका, आचार्य लिमये, डॉ ताराबाई, लागूबाई, खाडिल्कर, माणिकबाई, प्रो. गोळे, बाबुराव, दिवेकर, केळकर N. C. वगैरे भेटले होते. गंगाप्पा यमकनमर्डी भेटला. चांगला श्रद्धावान् मुलगा आहे. आशा वाटते.

पाऊस पुष्कळ आहे. तुमच्या भेटीचा योग केव्हां येतो पहावें. खात्री कशाचीच नाहीं.

पावसामुळें शहरची हवा खूप सर्द आहे. हुदलीस गेल्यानंतर खेड्यापाड्यांची परिस्थिति कळेल. त्यांतच अन्नाच्या टंचाईची भर आहे.

जीवनरावांचें वजन बरेंच कमी झालें असें समजलें. त्यांच्याबद्दल काळजी वाटते. डॉ. सेटनाचें मत काय आहे? सर्वांना नमस्कार. कळावें हा आ.

गंगाधर देशपांडे

पत्र नं. ६९

श्री

अमळनेर

२१-१२-१९४३

कृ. सा. न. वि. वि.

मुंबईस दोन दिवस राहून मी व ती. मामा परवां येथें आलों. चि. निर्मला बरी आहे. ति. मामांची प्रकृति डॉ. देशमुखांनीं तपासली. ते ऑपरेशन करीत नाहीं असें म्हणतात. डॉ. देशमुख ऑपरेशन करीत नाहींत म्हणून इतर डॉक्टर धजत नाहींत. माझे काका चांगले सर्जन आहेत पण तेहि कचरतात. जरूर पडेल तेव्हां इंजेक्शनें द्यावींत असें त्यांचें म्हणणें आहे. अहमदनगरहून आणलेलें औषध परत बेळगांवला गेल्यानंतर सुरू करणार आहेत. आतां मधु (आचारी) आला आहे तेव्हां हुदलीस जाऊन राहाण्याचा विचार बहुतेक ठरला आहे. आम्ही त्यांना बेळगांवासच राहण्याचा आग्रह करीत असतों. पण, त्यांचा स्वभाव माझ्यापेक्षां आपल्यालाच जास्ती माहीत आहे.

मुंबईस देखील त्यांना विश्रांति नव्हती. पुष्कळ लोक भेटले. स्वामी, देवदास गांधी व त्यांच्या पत्नी, जमुभाऊ व त्यांचे बंधु वगैरे भेटले. बेळगांवासहि वादविवादांत श्रम होतात. म्हणून मी मुद्दाम त्यांना विश्रांतीकरितां येथें घेऊन आलें. मुंबईस नाथजी आपली चवकशी करीत होते. जळगांवास देवकीनंदन भेटले होते. आम्ही स्टेशनवर जाण्याच्या घाईत होतों. ते येथें येणार आहेत.

आपल्या प्रकृतीसंबंधानें बरेच दिवसांत कांहीं कळलें नव्हतें. देवकीनंदनकडून आपण बरे असल्याचें समजलें.

ती. सौ. रमाक्का माहेरीं गेल्याचें समजलें असेलच. कृष्णरावहि फारसे घराकडे येत नाहींत. कचेरीच्या कामांत गुंतलेले असतात. त्यामुळें त्यांना सवड होत नसावी. मामा सकाळीं नियमानें फिरावयाला जातात. मधून मधून डॉ. अनंतराव व सौ. विमल यांना भेटून येतात.

घरीं कोणी करणार नसल्यामुळें व निर्मलेला संभाळण्याचें काम असल्यामुळें माझा अभ्यास होत नाहीं.

हुदलीकडे वगैरे धान्य गोळा करण्याची गडबड चालू आहे. आम्ही तांदूळ मिळत नाहीं म्हणून भाकरीनेंच जेवण्याची सुरवात करतों व भात शेवटीं थोडासा घेतों! भाजीपाला वगैरे सर्व महाग आहे. रुपयाला दोन मण सर्पण मिळण्याची मारामार. ज्यांना घरचें कांहीं नाहीं त्यांचा संसार कसा चालत असेल याची कल्पनाच केलेली बरी! बंगाल न होवो म्हणजे मिळविली. लोकांचा सोशिकपणा पण कमालीचा आहे. किर्लोस्करांनीं एका पद्यांत म्हटल्याप्रमाणें "...शरण कुणा जावें" हेंच खरें!

ती. जीवनराव, नारायणराव वगैरे परिचित मंडळींना नमस्कार. कळावें, लोभ असावा ही वि.

(मामांच्या आज्ञेवरून)

सौ. प्रमिला

ता. क. :—

सुटी संपतांच परत बेळगावाला जाईन. तोंपर्यंत मामाहि येथेंच राहतील असें वाटतें.

## पत्र नं. ७०

श्री

बेळगांव १७-१-१९४४

श्री. पुंडलीकजी यांना

साष्टांग नमस्कार वि. वि.

आम्ही दोन दिवसापूर्वी अमळनेरहून आलों. ती. मामा मुंबई, पुणें वगैरेकडे राहून आम्ही येण्यापूर्वी दोन दिवस बेळगांवला आले होते. वाळवींच्या घरीं होते. आमचे 'हे' ही अमळनेरला आले होते. त्यांचा एक दांत आडवा आला आहे. तो काढवण्याकरितां मुंबईस गेले होते. पण, दांत तूर्त काढवण्याची जरुरी नाहीं म्हणून डॉ. मोघे यांनीं सांगितलें. पण, ती. नानांचें मत दांत काढावा लागणार असें आहे. दांत क्लोरोफॉर्मखालीं काढावा लागणार. बरें होण्यास एक महिना लागेल असें म्हणतात!

गेल्या सोमवारीं (ता. १०) ती. मामा वासुकाकांच्या भेटीस गेले होते. त्यांनीं मामांच्या आहाराबद्दल चवकशी केली व शिजलेलें अन्न खाण्यास कळवलें. पण, पुढें दोनच दिवसांत वासुकाका वारल्याचें वर्तमान समजलें. मामांना फार वाईट वाटलें व माझेंहि वर्तमान असेंच तुम्हाला एखाद्या दिवशीं लवकरच ऐकावें लागेल असें म्हणूं लागले. लोक असले म्हणजे मामा पुष्कळ वादविवाद करतात, व त्यामुळें दमतात. आतां कुमरीला रहावयास गेले आहेत. तेथें कसें काय जुळतें पहावें. तेथें बरें न वाटल्यास परत येण्यास मी कळवलें आहे. त्यांनींहि कबूल केलें आहे. आचारी मधु कुमरीस आला आहे. मामांची प्रकृति हा एक विषय झाला आहे.

नवीन ऑर्डिनन्स निघाल्याचें समजलें. त्याचा फायदा कोणाकोणाला मिळतो पहावें.

घरीं ती. ताई "मावशी" आल्या आहेत. त्यामुळें मला पुष्कळ फुरसत मिळते. चि. निर्मला त्यांच्याकडे राहते. मला अभ्यासाला वेळ मिळत आहे. परीक्षेला बसणार आहें. अनेक घडामोडींमुळें दिवस पुष्कळ व्यर्थ गेले. काय होतें तें पाहूं.

सौ. विमल याळंतीची प्रकृति आतां बरी आहे. कोल्हापुराहून तिची बहीण आली आहे. डॉक्टर मोकळे झाल्यामुळें तिच्या प्रकृतीची काळजी नाहीं. ती. सौ. रमाक्का बऱ्या आहेत. पण, त्यांना ती. जीवनरावांची काळजी आहेच. त्यांची प्रकृति कशी आहे कळवावें. त्यांना, नारायणराव वगैरे वडील मंडळींना नमस्कार सांगावा.

चि. निर्मलेचा तुम्हाला नमस्कार. कळावें ही वि.

(मामांच्या आज्ञेवरुन)

सौ. प्रमिळा

## पत्र नं. ७१

श्री

बेळगांव

२५-१-४४

श्री. पुंडलीकजी यांस

कृ. सा. न. वि. वि.

आपलें हुदलीच्या पत्त्यावर लिहिलेलें पत्र पोचलें. श्री. केशवराव गोखले येथें आल्याचें समजलें. त्यांच्याकडून तिकडील हकीकत समजून घेण्याची इच्छा जागच्या जागीं दडपावी लागते. इलाज नाहीं.

ती. मामा परवां रात्रीं येथें आले आहेत. आणखी १।२ दिवस राहणार आहेत. दर रविवारीं कुमरीस जाण्याबद्दल मला लिहिलें तें समजलें. पण, मला या वर्षी परीक्षेला बसावयाचें आहे म्हणून अभ्यासाला आरंभ केला आहे. त्यामुळें जातां येत नाहीं. ती. मामांनीं मधून मधून येण्याचें कबूल केलें आहे. शिवाय 'हे' आठवड्यांतून एकदोन वेळां जात असतात. चि. निर्मलेला गोवर आला होता. त्यामुळें ती फार अशक्त झाली आहे. म्हणून तिचा फोटो आतांच काढवीत नाहीं.

ती. सौ. रमाक्का बऱ्या आहेत. सौ. विमलहि सुधारत आहे. गोवराच्या मुलीला घेऊन त्यांच्या घराकडे जाणें बरें नाहीं म्हणून मी गेल्यें नाहीं. ती. मामा आज जाऊन आले.

ता. १२-२ रोजीं कॉलेजच्या Function करितां श्री. राजाजी कोल्हापुरला जाणार आहेत. ता. ११ रोजीं सकाळीं येथें येणार आहेत. एक दिवस आमचेकडे राहतील. त्यामुळें आमची तारांबळ उडणार आहे. आज म्युनिसिपालिटीनें एकमतानें त्यांना मानपत्र देण्याचा ठराव केला आहे. कदाचित् ती. मामा एक दिवस त्यांचे-बरोबर कोल्हापुरला जातील.

ती. जीवनरावांची प्रकृति सुधारल्याचें समजून आनंद झाला. त्यांना व ती. नारायणराव जोशी वगैरे वडील माणसांना नमस्कार सांगावा.

ती. मामांची प्रकृति साधारणपणें बरी आहे. आम्ही सर्व बरे आहोत.

आपल्याकडील क्षेम कळवीत असावें.

कळावें लोभ असावा ही वि.

आपली
सौ. प्रमिला

ता. क. :

श्री. वसंतराव याळगी रात्रीं मामाकडे आले होते. दुकानासंबंधानं बराच वेळ बोलत बसले होते. वसंतरावांनीं व्यवस्था बरी चालवली असून काळजीचें कारण नाहीं असें मामा म्हणत होते. हणमंतराव देशपांडे यांचा उपयोग चांगला होत आहे. (मामांच्या आज्ञेवरून)

नं. ७२

श्री

अमळनेर
ता. २४-२-४४

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि. मी काल येथें आलों. चि. सौ. प्रमिलेची प्रकृति चांगली आहे. नवीन मुलगीहि चांगली आहे. निर्मला खूप खेळत असते. एक तास माझ्याजवळ आली नाहीं. त्यानंतर मला सोडीत नाहीं. तुमचे डोळे करून दाखवीत असते. मौज वाटते.

मी निघण्याचे दिवशीं बेळगांवला येण्याबद्दल सकाळचे गाडीनें तुम्हाला चिठी पाठविली होती. पोचली नाहीं असें दिसतें. तुम्हाला या खेपेला बरोबर आणण्याचा विचार होता. मुंबईस नाथजी भेटले होते. त्यांच्याबरोबर पुष्कळ बोलणें झालें. सेवाग्रामला जाण्याचा विचार होता. पण, नाथजींबरोबर बोलणें झाल्यानंतर न जाण्याचें ठरवलें. जाण्यानें विशेष फायदा होईल असें वाटत नाहीं. प्रवासाची दगदगहि फार आहे. हवा बरी आहे. आणखीं ८।१० दिवस तरी राहीन.

तुम्हांला येथें आणावें अशी प्रमिलेची व डॉ. नानांची बरीच इच्छा दिसली. माझी प्रकृति बरी आहे. ताप वगैरे नाहीं. कळावें हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

पत्र नं. ७३

श्री

श्री. पुंडलीकजी यांस वेळगांव

ता. १५-३-४४

सा न. वि. वि.

तुमचें पत्र पोचलें. तुम्हाला लिहिलेली पत्रें पोचत कशीं नाहींत ?

ती. मामांना तर पुष्कळ पत्रें पोचत नाहींत ! कांहीं वेळेवर पोचत नाहींत व कांहीं मुळींच पोचत नाहींत. मामांची प्रकृति दिवसेंदिवस जास्ती अशक्त होत चालली आहे. परवां एकदोन दिवस धारवाडला व गदगला जाऊन आले, तर तेवढ्या दगदगीमुळेंहि आंथरुण धरून पडले आहेत. माझी प्रकृतीहि बरी नव्हती. त्याचा त्रासहि त्यांना झालाच. आतां मी बरी आहें. चि. निर्मलाहि मधूनमधून आजारी असते. गोंवरानें, दांत येतात म्हणून, वगैरे कांहीं ना कांही निमित्तानें आजारी असते. आतां ती आपोआप उठूं लागली आहे. बोट धरून दहापांच पावलें चालते. मी या खेपेला परीक्षेला बसणार होतें. पण आजारीपणामुळें लांबणीवर पडलें. येत्या ऑक्टोबरपर्यंत गेलें. एकदां कोर्स संपवावा असें वाटतें. त्याची जरुरी नाहीं असें मामा सांगत असतात. पण माझी हौस !

कुसुमताईचें लग्न ठरवण्याकरितां मोरहून ती. सौ. आई (यमूताई) आल्या होत्या. त्या व हे मिळून धारवाडला गेले होते. २५०० रुपयांवर लग्न ठरलें. वैशाखांत मोरला लग्न होणार. मुलगा बी. ए. झाला आहे, व ९० रु. वर सरकारी नोकरींत आहे. मुलाचे वडील (जीवनराव चेटिंगिरी) मुनसफ होते. त्यांनीं कांहीं इस्टेट ठेवली आहे. एकंदरींत घर बऱ्यापैकीं आहे. मुलगा एक दिवस आमच्याकडे आला होता. वागणुकीनें बरा दिसला. कुसुमताईना पसंत आहे. मुलाला मुलगी पसंत आहे. कुसुमताईना शिकण्याची फारशी हौस नाहीं. म्हणून हें लग्न जुळवलें तें बरें झालें. यमूताईवरील एक मोठी जबाबदारी जाईल. मुलांचें कसें तरी होईल. मुलीची काळजी विशेष असते. मामांच्या देखत हें जुळलें हें बरें झालें. वत्सीचें बरें चाललें आहे. ती पास झाल्यास तिची काळजी करावयाला नको. मधु भावोजी व गोगटे मिळून मोटारीचा कांहीं धंदा करणार आहेत. त्यांचा भार आतां दुसऱ्यावर पडूं नये. पण काय करतात पहावें.

गदगच्या मावशी अद्यापि बऱ्याच अशक्त आहेत. घरचें सर्व वत्सलताईवर पडलें आहे. पण त्या सर्व संभाळून अभ्यासहि चांगला करितात. वर्गांत त्यांचा नंबर पहिला आहे. परीक्षेंत सुद्धां पहिल्या येतात. भाऊराव F. Y. मध्यें दुसऱ्या वर्गांत पास झाले. आतां Inter Science करितां पुण्याला किंवा मुंबईला जाणार आहेत. लीलाताई आठव्या महिन्यांत आहेत. ते सर्व बरे आहेत. चिमुताई व मुलं बरीं आहेत.

रामराव मोकाशी हल्लीं कुमरीस आहेत. केंव्हा भटक्तील नियम नाहीं. मावशी व जलालपुरकर मंडळी धारवाडास खुशाल आहेत. भाऊसाहेब जलालपुरकरांची दुसरी

मुलगी जलालपुरास आहे. तिचें लग्न बाबासाहेब अष्टेकर यांच्या मुलाबरोबर ठरलें आहे. हुंडा सात हजार रुपये!! त्याशिवाय खर्च. लग्न २१ तारखेला आहे. कदाचित् आम्ही जाऊं.

ती. सौ. रमाक्का भेटत असतात. त्या रोज गांवांत येतात. डॉ. अनंतराव सहकुटुंब उद्यां कोल्हापूर साताराकडे जाणार आहेत. याळगींच्या घरची मंडळी बरी आहेत.

मामांच्या जवळ कोणीतरी असणें जरूर आहे. पण त्यांच्या मनाजोगा माणूस मिळणें कठीण आहे. येथें आले म्हणजे वादविवादांत वेळ जातो. निष्पन्न कांहीं होत नाहीं. त्यामुळें जास्ती त्रास होतो. हुदलीच्या खादी कामाचें अद्यापि जमलें नाहीं. वासुदेवराव गोसावी व गंगाप्पा यमकनमर्डी यांचें पटत नाहीं. गंगाप्पा तुमचा लाडका.

आपल्याला पैसे पाठवण्याबद्दल लवकर व्यवस्था करतें. धान्याची टंचाई भयंकर आहे. आमच्या घरीं तांदूळ अगदीं जेमतेम म्हणजे १।२ शेर संग्रहाला. जोंधळ्याची भाकरी नाचण्याच्या भाकरीप्रमाणें लाल दिसते. पाऊस जास्ती झाला त्यामुळें पीक नासलें व कमीहि आलें. बाकी महागाई तर विचारूं नये. परवांच्या शनिवारीं बेळगांवच्या बाजारांत लोणी मुळींच आलें नाहीं. बेळगांवच्या इतिहासांत पहिला असला दिवस! घरीं बारा आण्याची भाजी लागते. पुष्कळवेळां आमटी पिठल्यावर भागवावें लागतें. दूध दोन शेरावर आलें आहे. तेंहि चांगलें मिळत नाहीं. बाकी संसाराचे जिन्नसहि असेच महाग. पण, सिनेमाचीं ६ थिएटरें गच्च भरलेलीं असतात. बैल जोडी (चांगली) २००० पासून २५०० पर्यंत. असा प्रकार कधीं झाला नाहीं. पुढें काय होणार समजत नाहीं.

आपल्या प्रकृतीस जपावें. ती. जीवनराव, नारायणराव वगैरेंना नमस्कार. कळावें ही वि.

(मामांच्या आज्ञेवरून) सौ. प्रमिला

## पत्र नं. ७४

श्री

अमळनेर ता. २६-३-४४

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि. २।३ दिवस पत्र नाहीं. चि. मधूचाहि पत्ता नाहीं. त्याचेकडून पत्र नाहीं. आज डॉ. नानासाहेब यवतमाळला २–३ दिवसांकरितां जात आहेत. येथें उन्हाळा हिवाळा चालला आहे. तुम्ही ता. २८ पर्यंत राहणार आहांत असें दिसतें. माझी तार आल्यासच तुम्ही येथें यावें. तुमचें येथें कांहीं काम असल्यास गोष्ट निराळी. पण माझ्याकरितां तार आल्यासच यावें.

कळावें हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

[पत्र नं. ७५ ते ८०:—हीं सहा पत्र मी पुण्यास महात्माजींकडे असतांना मला गंगाधररावानीं लिहिलीं आहेत..... पुंडलीकजी]

पत्र नं. ७५

श्री

बेळगांव
२७-६-४४

चि. पुंडलीकजी यांस
आ. वि.

तुमचें पत्र पोचलें. मी श्री. आण्णासाहेब लठ्ठे यांचेबरोबर उद्यां निघण्याचा बेत केला होता. पण, तुमचें पत्र पाहून तो बेत बदलावा असें वाटूं लागलें आहे. महात्माजींच्या प्रकृतीबद्दलचें ताजें बुलेटिनहि पाहिलें. त्यावरून त्यांना त्रास देऊं नये असें वाटतें. श्री. लठ्ठे संध्याकाळीं भेटतील. त्यांना विचारून काय तें ठरवीन. न जाण्याचे ठरलें तर प्यारेलालना तार करीन. पू. श्री. नाथजींना मी येईन असें कळविलें होतें. त्यांना वरील मजकूर कळवावा. त्याचप्रमाणें स्वामी, बाबुराव गोखले, व तात्यासाहेब देशपांडे [चिटणीस म. प्रां. कां. क.] यांनाहि कळवावा. तुमचें पत्र वाचून न जाणें बरें असेंच वाटतें.

कृष्णाबाई पंजीकर, नारायणराव व इतर मंडळी जाण्याच्या विचारांत आहेत. तारा वगैरे चालल्या आहेत. अशा वेळीं मी न जाणें बरें असाहि विचार येतो.

बाबासाहेबांबरोबर जें पत्र तुम्ही पाठवणार आहां त्यावरूनही कांहीं कळेल. पण बाबासाहेब उद्यां येतीलच हें कशावरून? तुम्ही उत्कंठा मात्र वाढवली आहे.

मी नाथजींना एक पत्र लिहिलें होतें. त्यांत गांधीजींच्या अगर काँग्रेसच्या नांवावर ज्या लोकांनीं गांधीजींना नापसंत अशा गोष्टी केल्या आहेत त्याची जबाबदारी आपल्यावर उघडपणें घेऊन गांधीजींची जबाबदारी कमी कां करूं नये? असें विचारलें होतें. या बाबतींत महात्माजींचा सल्ला शक्य असल्यास घ्यावा. असें करण्यापासून महात्माजींची जबाबदारी कमी होत असेल तर फायदा आहे. तर त्याबद्दल कांहीं विचारण्यास सवड झाल्यास विचारून पहावें, असें नाथजींना सांगावें.

तरुण भारतांत ठाकूर यांना गांधीजींकडून आलेल्या पत्रांतील मजकूर छापला होता. त्याचप्रमाणें श्री. किशोरलालजींना उद्देशून त्यांची Error of Judgment झाली आहे असें म्हटलें आहे तें वाक्यहि उद्धृत केलें होतें. याबद्दल अशा वाक्यांना प्रसिद्धी दिल्यामुळें जिल्ह्यातील असंख्य लोकांचीं मनें दुखविलीं जातात वगैरे लिहून हिंदुस्थान हा एक तुरुंग आहे, तुरुंग हीच माझी जागा आहे वगैरे गांधीजींनीं जें लिहिलें आहे त्याला बेळगांव समाचारांत उत्तर दिलें आहे! जणुं काय गांधींना नुसता तुरुंगांत जाण्याचा मार्ग पसंत आहे! त्याशिवाय ठाकूर हे ता. ९ ऑगस्टपासून

त्यांना अटक होईपर्यंत ज्या गोष्टी करीत असत त्यावर पांघरूण घालण्याकरितां व आपल्या बचावाकरितां हा प्रयत्न करीत आहेत, असा त्यांच्यावर आरोप केला आहे! C. I. D. चे लोक व हे लोक यांच्यामध्यें फरक काय? यांत आपले स्नेही दत्तोपंत अध्यापक व जयदेव आहेत असें म्हणतात. बेळगांव समाचारचा ता. २४ जूनचा अंक मिळाल्यास पहावा. अशा लोकांपासून जितकें लांब राहातां येईल तितकें बरें. दोन्ही पत्रें 'काँग्रेस'चीं व गांधीजींच्या लिखाणाचा उपयोग परस्परविरुद्ध कसा करतात हें पाहण्यासारखें आहे. मग सरकार गांधीजींच्या लिहिण्याचा विपर्यास करतात यांत आश्चर्य काय? त्याचप्रमाणें प्रश्नोत्तरांची कशी वाट लागते हें तुम्हांला माहीतच आहे. अद्यापि मुंबईहून प्रश्न येतातच आहेत, असें तुम्ही लिहितां! बिचाऱ्या गांधीजींना स्वस्थपणें विश्रांति हे लोक कां घेऊं देत नाहींत?

आचार्य लिमये वगैरे मंडळीबरोबर जी चर्चा झाली ती समजण्याला तुम्ही येईपर्यंत वाट पहावी लागणार. असो! तुम्ही कधीं येणार? गदगला जाण्याचा माझा विचार आहे. तुम्ही बरोबर असल्यास बरें. मी आतां Homeopathic औषध सुरू केलें आहे. कळावें हा आशीर्वाद

गंगाधर देशपांडे

ता. क.

श्री. बाळकृष्णपंत शिखरे यांना नमस्कार. मी आलों तर स्टेशनजवळील द्वे हॉटेलमध्यें किंवा बादशाही हॉटेलमध्यें उतरणार आहें. मी आल्यास सौ. रमाक्का येणार आहेत.

## पत्र नं. ७६

श्री

चि. पुंडलीकजी यांस,

आ. वि. तुमचें पत्र पोचलें. घोत्रेचें पत्र मी कालच पाठविलें. तो विषय माझ्या डोक्यांतून काढून टाकला आहे. तुमच्याबरोबर मी त्याबद्दल पुनः चाटाघाट करणार नाहीं. Quinine च्या गोळ्या नाहींत. डॉ. बाळगीकडे मिळतात काय तपास करीन. तोंपर्यंत दुसऱ्या गोळ्या आहेत त्या पाठवीत आहें. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

ता. क.

श्री. वेंकटरामय्याचें पत्र श्री. गिरजीकडे देणार होतों. पण ते काल भेटले नाहींत. पाठवूं का नको निश्चित कळवावें. त्याप्रमाणें करीन.

## पत्र नं. ७७

श्री

बेळगांव
ता. २८-६-४४

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि. आज बाबासाहेब आले नाहींत. मीं मुद्दाम मनुष्य पाठवला होता. असलीं कामें कोणी सहज येणाऱ्याजाणाऱ्याकडे सोपवावयाचीं नसतात. तुम्ही स्वतः घेऊन गेलां असतां तरी चाललें असतें. कांहीं खुलासा तात्डतोब करण्यासारखे असेल तर तें लांबणीवर पडतें, व नुकसान होण्याचा संभव. असो. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. ७८

श्री

बेळगांव
१-७-१९४४

चि. पुंडलीकजी यांस,
आ. वि.

तुझीं दोन्ही पत्रें ता. २९ व ३० चीं पोचलीं, मजकूर समजला. दोनतीन दिवसांपासून माझी कंबर खूप दुखूं लागली आहे व त्यामुळें आंथरुणावर पडून राहावें लागलें आहे. कमरेचें दुखणें कमी झाल्यास लवकरच गदगला जाण्याचा विचार आहे. तेथें चि. भाऊ वगैरे कोणी नाहीत म्हणून शक्य तितक्या लवकर तूं आल्यास बरें होईल.

काल इकडून श्री. जीवनराव व सौ. रमाक्का गेल्या आहेत. तुझी भेट होईलच. त्यांच्याबरोबर दिलेलें पत्र पोहोंचलें असेलच.

कांहीं पत्रांतून बापूजींच्या भाषणाचे दोन रिपोर्ट आले आहेत. त्यामुळें अधिक घोटाळा होण्याचा संभव आहे. दोन्ही रिपोर्ट वाचून माझें समाधान झालें नाहीं. तथापि रिपोर्टवर किती भरवंसा ठेवावा हा प्रश्न राहतोच. आज जरी बापूजी घडलेल्या गोष्टीबद्दल वैयक्तिक किंवा सामुदायिक कोणाची किती जबाबदारी आहे याबद्दल निर्णय देत नसले तरी सर्व गोष्टी त्यांच्यापुढें आल्यानंतर त्यांना निर्णय द्यावा लागेल. जोंपर्यंत ते तसा निर्णय देणार नाहींत तोंपर्यंत सरकारच्या वृत्तींत फरक पडेल असें वाटत नाहीं. त्यांनीं निर्णय दिल्यानंतरहि सरकार काय करील हें अनिश्चितच आहे हें खरें! तथापि सरकार कांहीं करो या न करो, कार्यकर्त्यांचें मार्गदर्शन करणें व वातावरण शुद्ध करणें ह्या गोष्टी करणें जरूर आहे. जर हें झालें नाहीं तर गोंधळ माजून होतकरू कार्यकर्त्यांची दिशाभूल होण्याचा संभव मला दिसतो. कोणाला दुखवावें किंवा कोणाची छी थू व्हावी असें माझें म्हणणें नाहीं. पण किशोरलालजींच्या संबंधानें ज्या प्रकारानें मतप्रदर्शन झालें त्याप्रमाणें होणें जरूर आहे. पत्रव्यवहारावरून पुष्कळ

गोष्टींचा उलगडा होतो. तथापि स्पष्ट व निर्णयात्मक असा उलगडा झाला पाहिजे. प्रकृति बरी झाल्यानंतर गांधीजी काय करतात पहावें!

परवां महाराष्ट्र कार्यकर्त्यांपुढें गांधीजींचें जें भाषण झाल्याचें प्रसिद्ध झालें आहे त्यावरून माझ्या मतांत फरक झालेला नाहीं.

श्री. हरिभाऊ जोशी यांनीं केलेल्या सूचनेचा अर्थ मला बरोबर कळला नाहीं. आचार्य भागवत यांचीं मतें मला माहीत आहेत. आचार्य जावडेकरांचीं मतेंहि भागवतांच्याच प्रमाणें असतील असें मला वाटतें. त्यांच्याशीं मी किंवा लट्ठे सर्वांशीं सहमत होणें कठीण आहे. त्यामुळें हरिभाऊंच्या कल्पनेचा अर्थ मला समजत नाहीं असें मी म्हणतों.

राजाजी पांचगणीला जाणार कीं काय कळवावें.

तूर्त तर इकडील मंडळी कोणी गेल्याचें दिसत नाहीं.

रा. बाबासाहेबांनीं फारच शोचक हकीकत सांगितली. काल माझाहि वेळ बापूजींना पत्र लिहिण्यांत व तें टाइप करण्यांत गेल्यामुळें व आज बाबासाहेब न आल्यामुळें त्यांच्याशीं विशेष बोलणें झालें नाहीं. माझी प्रकृति बरी असती तर पुष्कळ गोष्टी करायच्या मनांत येतात त्या केल्या असत्या. पण नाइलाज झाला आहे.

विशेष कांहीं असल्यास कळवावें. कळावें. हा आशीर्वाद.

आपला
गंगाधर देशपांडे

ता. क. : वडवीवर बुलेटिन जवळ ठेवल्याचा खटला भरला आहे. तो Defence देत नाहीं. उत्तम आहे.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. ७९

श्री.

चि. पुंडलीकजी यांस—

आ. वि.

तुमचीं पत्रें वाचून पाहिलीं. धोत्रेच्या पत्रांत माझा अभिप्राय मीं लिहिला आहे व पुंडलीकजींचें करणें मला मान्य नाहीं असें कळवलें आहे. वेंकटरामय्याचें पत्र त्यांचेकडे पाठवीत आहें. कळावें.

शुक्रवार गंगाधर देशपांडे

ता. क. : कृष्णराव बंकलवाडकर ह्यांना पाणी तापविण्याचा यंत्र पाठवूं नये असें तातडतोब कळवावें. आज संध्याकाळीं गाड्या निघणार आहेत त्याच्या आधीं कळवावें.

## पत्र नं. ८०

श्री.

बेळगांव २-७-४४

चि. पुंडलीकजी यांस

अनेक आशीर्वाद.—

तुझें पत्र पोहोंचलें. त्यांत श्री. लठ्ठे यांनीं गांधीजींना एक पत्र लिहावें असें राजाजींचें मत असल्याचें समजलें म्हणून तें पत्र लठ्ठे यांचेकडे पाठवलें आहे. उद्यां बहुतेक ते भेटतील त्यावेळीं तें काय करणार आहेत तें समजेल. मी लिहिलेलें पत्र राजाजींना पसंत पडलें हें समजून बरें वाटलें. तथापि त्यांचें मत पहिल्यापासूनच तसें असल्याकारणानें माझ्या पत्राला त्यांनीं पसंती दाखविली, यांत आश्चर्य वाटण्यासारखें विशेष नाहीं. श्री. तात्यासाहेब देशपांडे वगैरेंनीं माझें पत्र पाहिलें कीं काय ? पाहिलें असल्यास त्यांना काय वाटलें हें कळण्याची इच्छा आहे.

तुम्ही लवकर येण्याचा बेत केला हें बरें झालें. तुम्ही आलांत म्हणजे गदगला जाण्याचें ठरवूं. ३–४ दिवसांपासून माझी कंबर दुखत असते. त्यामुळें अंथरुणावर पडून आहें. श्री. जीवनराव मुंबईला गेले असतीलच.

बाकी विशेष असल्यास कळवावें.

कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

[पत्र नं. ८१, ८२, ८३, ८४, ८५, ८६, ८७, ८८, ८९, ९० हीं दहा पत्रें 'कस्तुरबा गांधी फंड' गोळा करण्यासाठीं मी बेळगांव जिल्ह्यामध्यें फिरत होतों त्यावेळीं मला ती. गंगाधररावांनीं लिहिलेलीं आहेत. त्यांत त्यांची कार्याची तळमळ व संघटनाचातुर्य दिसून येतें.—पुंडलीकजी]

## पत्र नं. ८१

श्री

बेळगांव ता. २८-८-४४

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि. तुम्ही हुदली, सुळधाळ, अंकलगी, अकतंगेरहाळ वगैरे खेड्यांतून कस्तुरबा फंड जमवीत आहां असें समजलें. या आठवड्यांत शक्य तितकी वसुली करावी. नुसत्या वचनावर अवलंबून राहूं नये. येत्या आठवड्यांत या खेड्यांतील कामाला प्रसिद्धी मिळाली म्हणजे पुढील आठवड्यांत इतर खेड्यांत कांहीं काम होईल. लाजेकाजेखातर तरी करावें लागेल. ...

येत्या शुक्रवारीं (११९) रोजीं निपाणीस आम्ही जाणार आहोंत. इकडील काम संपवून तिकडील खेड्यांत तुम्ही गेल्यास चांगलें काम होईल. तेव्हां २।३ दिवसांत हें हातीं घेतलेलें काम संपवावें. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. ८२

श्री

बेळगांव ता. ३-९-४४

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि.

निपाणीला गेलेली मंडळी काल रात्रीं परत आली. तेथील काम अपेक्षेपेक्षां जास्त चांगलें झालें आहे. तेथें रोख रुपये ६४९५ झालें असून १२०६ चीं आश्वासनें मिळालीं आहेत व आणखीहि काम चालू होणार आहे. अजमास १०००० पर्यंत निपाणीचा आकडा जाईल.

श्री. अनंतराव कटकोळ काल सुटले. आज त्यांची भेट झाली. थोडे रोडावले आहेत, पण उत्साह कायम आहे. आणि कोणी भोजचे गृहस्थ त्यांच्याबरोबर सुटलेले तेहि भेटले. त्या दोघांनाहि निपाणीच्या आजूबाजूच्या कामाबद्दल मी सांगितलें आहे; व तुम्हाला त्यांच्या मदतीला पाठवण्याची आवश्यकता दिसल्यास तुम्हास पाठवितों असें कळवलें आहे. तुम्ही तिकडील काम लवकर संपवून यावें म्हणजे निपाणीकडे किंवा अथणी तालुक्यांत जरूर पडल्यास जातां येईल. काम लौकर संपवावें. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. ८३

श्री

बेळगांव ता. १०-९-४४

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि.

कार्ड पोचलें. तिकिटें पाठवण्याबद्दल डॉ. तेरगुंडीला कळविलें आहे. तिकिटें नाहींत म्हणून वाट पाहूं नये. वर्तमानपत्रांतून पोंच देऊंच.

बैलहोंगल, संपदत्ती तालुक्यांत अद्यापि कामाला प्रारंभ नाहीं. गोकाक-अथणीकडे विशेष दिसत नाहीं. मी पत्रें लिहीत आहें.

नुसते आंकडे आतां घेण्याचें बंद करावें. वसूलच करावा, असें मंडळींना कळवावें.

येथे आतां तसेंच चालवलें आहे. दिवस थोडे राहिले. ता. २० च्या आंत सर्व काम संपवून हिशेब पुरे करावयाचे आहेत. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. ८४

श्री

बेळगांव ता. १२-९-४४

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि. श्री. धीवाला (M. L. A.) व इनामदार (अध्यक्ष, मुस्लीम लीग) यांनीं प्रत्येकीं १०० रु. व २५ रु. देण्याचें आश्वासन दिलें आहे. आज वसूल होतील. त्यांचीं नांवेंहि तरुण भारतांत दिली आहेत. कर्नाटक एक्स्प्रेसचे धारवाडकर, हाशमसाहेब जमादार, हैदरसाहेब वगैरे मोटारचे मालक उद्यां किती द्यावयाचे हें ठरवणार आहेत. द्यावयाचें ठरलें आहे. भीमराव पोतदार सांगतील तितके देणार आहेत. पोतदारांनीं प्रत्येकीं २०० रु. द्यावेत असें सांगितले आहे. धारवाडकर उद्यां परगांवहून येणार आहेत.

अवधि थोडा राहिला आहे. तेव्हां तिकडील वसुलीसहित कामें लवकर आटोपावींत. नुसतीं आश्वासनें घेतली तर वसुलीचें काम दिरंगाईवर पडतें. व्यापारी लोकांकडील वसुली लवकर होते. पण इतरांची वसुली करणें कठीण होतें. येथील काम आटोपत आलें आहे. ज्यांना भेटावयाचें होतें त्यांना भेटण्याचें काम संपत आलें आहे. आतां सार्वत्रिक काम करावयाचें आहे. एकत्रित काम करावयाचें आहे. एक आठवडा तें करावें असें ठरलें आहे. हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

ता. क. :

श्री. देवचंदजींच्या परयावर डॉ. तेरगुंडी यांनीं कांहीं तिकिटे-बुकें पाठवलीं आहेत. काम लवकर संपवावें.

## पत्र नं. ८५

श्री

बेळगांव

ता. १५-९-४४

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि तुमचें कार्ड आण्णासाहेबांकडे पाठवलें आहे. त्यांचेकडून कांहीं कळवावयाचें असतें तेव्हां त्यांनाहि परस्पर लिहिल्यास काम लौकर होईल. इकडून कळवण्यास वेळ लागतो. काल निपाणीहून २१७६-४ व भोजचे म्हणून ३११ रु. इतकी

रक्कम आली. चिकोडीला २००० रु. पर्यंत जमतील असें श्री. गोखले यांचेकडून पत्र आलें आहे. नुसत्या आश्वासनावर अवलंबून न राहतां वसुलीच्या कामाला तावडतोब लागावें असें मी लिहिलें आहे. बाकी ठिकाणांचा पत्ता नाहीं.

आजच्या टपालानें बहुतकरून कोगनोळीला पत्र जाईल. तार ऑफिस तेथें आहे कीं नाहीं माहीत नाहीं. इकडील काम संपत आलें आहे. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. ८६

श्री

बेळगांव १७-९-४४

चि. पुंडलीकजी कातगडे

आ. वि.

तुमचें पत्र व सोबत १९८९ रु. चा चेक पोचला, व यादीहि पोचली. यादीप्रमाणें १९८३ रु. होतात. ६ रु. जास्ती कोणाचे तपास करावा. तरुण भारतांत देत आहें.

श्री. हिराचंद यांनीं आणखी ७००० रु. ची निरनिराळ्या म्हणजे, १००, १०, ५, १ अशा दराचीं तिकिटें मागविलीं आहेत. त्यांचें अण्णासाहेबांचें नांवें पत्र होतें. ते जमखडीस गेले आहेत. त्यामुळें आज पत्र माझ्या हातीं आलें. तिकिटें पाठविण्याची व्यवस्था करतों असें सांगावें. मला अद्यापि डॉ. तेरगुंडी भेटले नाहींत. भेटल्याबरोबर तिकिटें पाठवण्याचें करतों असें सांगावें.

कोगनोळीबद्दल आण्णासाहेबांनीं (त्हें) तुम्हाला पत्र लिहिलें आहे. तें पोंचलें असेलच. त्याप्रमाणें कोगनोळीस जावें.

मी ठक्कर बाप्पांना निपाणी १०००० रु. मदत करील असें लिहिलें होतें. त्याबद्दल त्यांचें उत्तर आलें आहे.

"Belgaum town and Nipani will contribute Rs. 30000 as you say..Surely Nipani alone is so industrial a town as to give Rs. 35000 by itself" हा निपाणीला compliment आहे. असो. आमच्या मनांत आणखी कांहीं मोठ्या मोठ्या योजना आहेत. त्याबद्दल निपाणीला राखून ठेवूं. निपाणीच्या मित्रमंडळींना कळवून ठेवावें.

आपलें काम पुरें करूनच यावें. सर्व मंडळींना नमस्कार. कळावें, हा आशीर्वाद.

आपला
गंगाधर देशपांडे

पत्र नं. ८७

श्री

बेळगांव ता. २०-९-४४

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि.

आज तुमचेकडून पत्र आलें तें मिळालें. गळतग्याला वसुलीकरितां मागें राहिलां होतां असें कळलें. चिकोडीचें पत्र नाहीं. आज तार आली आहे व जमले असतील ते सर्व पाठवण्यास कळवलें आहे. अथणीला फक्त ७०० रु. च जमले. तालुक्यांतील इतर ठिकाणीं कोणी गेलेंच नाहीं. हुकेरी तालुक्यांत १०००/१२०० जमतील. गोकाक तालुक्यांत अंकलगी वगैरे कडील मिळून जवळ जवळ १५०० रु. जमतील. बैलहोंगलचें कांहींच समजलें नाहीं. त्याचप्रमाणें सौंदत्तीचे १००० पेक्षां जास्ती जमवण्याचा इरादा नाहीं. खानापूर तालुक्यांत १२०० रु. पर्यंत जमले आहेत, असें समजतें. चंदगड महालांत ५०० रु. पर्यंत जमवण्याचा प्रयत्न प्रभु, बांदेकर करीत आहेत. शहापूरचा आंकडा २००० पर्यंत जाईल. बाकी सर्व बेळगांव, निपाणी व त्या भागांतील खेडीं यांवर सर्व अवलंबून आहे. भोज गांवाला त्या मानानें कमी जमले. त्याचप्रमाणें बेडकीहाळ, शमनेवाडी, सदलगा, एकसंबा, बोरगांव वगैरे गांवांचें काय झालें कळत नाहीं. अकोळला चांगली मदत मिळाली पाहिजे. एकंदरींत आतां जे रिपोर्ट आले आहेत त्यावरून ४० हजारावर आकडा जाईल. मी पन्नास हजारांचें अपील केलें आहे. निपाणीच्या मंडळींनीं व बेळगांवच्या मंडळींनीं ज्याप्रमाणें काम चालू केलें तसें सर्व ठिकाणीं चालू असतें तर ५० हजारावर रक्कम सहज गेली असती. लोकांची देण्याची इच्छा आहे. त्या भागांतच जास्ती जमवल्यास ५० हजारांची भरती होईल. आमचे प्रयत्न चालू आहेत.

लो. टिळक वाढदिवस फंड, होमरूल लीग फंड, टिळक स्वराज्य फंड, कॉंग्रेसकरितां वर्गणी, खादी व हरिजन फंड इत्यादि फंडांचा अनुभव मला आहे. पण हा कस्तुरबा फंड देण्याची इच्छा जिकडेतिकडे दिसली. कसूर झाली तर ती कार्यकर्त्यांची. मी या फंडाची जबाबदारी घेऊं नये असें आण्णासाहेब लट्ठे यांचें मत होतें. पण पू. बांच्या स्मारकाची जबाबदारी न घेणें मला कसेसेंच वाटलें. म्हणून मी भीत भीत जबाबदारी पत्करली. गांधींची पुण्याई जबरदस्त, बऱ्याच कार्यकर्त्यांची आस्था दिसून आली; यामुळें अद्यापि मुदत असतांना देखील ८० लाख जमा झाले. विरोधकांना किंवा उदासीनांना काय वाटलें असेल कोण जाणे.

फंड जमवण्याची जबाबदारी माझ्या आयुष्यांतील ही शेवटची. निपाणीच्या मित्रमंडळींना भेटून त्यांचें अभिनंदन करण्याची इच्छा आहे. पण डॉ. शिंडे यांनीं कालच प्रकृति तपासली व घरीं देखील मौन घेणें जरूर आहे, असा सल्ला दिला। त्यामुळें नाइलाज होत आहे. माझ्या वर्तीनें तुम्हीच माझें काम करावें.

. ता. २६ पासून तुम्ही कोल्हापुरला जाणार असें दिसतें. अथणी तालुक्यात

शेडबाळ, फागवाड, ऐनापूर, सची वगैरेकडे गेल्यास सहज १००० रु. तरी मिळतील. शेडबाळ, फागवाडकडे आण्णासाहेब लट्ठे यांच्या पत्राचा चांगला उपयोग होईल. तुमच्या सोयीप्रमाणें करावें. कोल्हापुरला जाण्याचें तुमचें टरलेंच असल्यास जावें. मी अध्यापकाला किंवा दुसऱ्या कोणाला तरी तुमच्या जागीं पाठवीन.

कोगनोळीचें पत्र तुमच्याकडे पाठविलें आहे. तुम्हाला अद्यापि कसें पोचलें नाहीं ? मी पुनः आणासाहेब लट्ठे यांना कळवीत आहें.

माझ्या हिशेबांत मी गळतग्याचे २३०० धरून ५०००० चें अपील केलें आहे. अकोळला गळतग्यापेक्षां कमी होऊं नयेत. मला तार करावी. वसूलीला दिरंगाई करूं नये असें मंडळींना सांगावें. ५०००० जमलेच पाहिजेत. भलत्या वेळीं तुम्ही कोल्हापुरचा प्रोग्राम केला. १।२ दिवस उशीरां गेल्यास भागणार नाहीं काय ? कळावें हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

ता. क. :—प्रमिलेची परीक्षा पुढील महिन्यांत आहे. निमा तुमची आठवण काढीत असते असें पत्र आहे.

## पत्र नं. ८८

श्री — बेळगांव

चि. पुंडलीकजी यांस — ता. २१-९-४४

आ. वि.

डॉ. तेरगुंडी यांचे नांवें श्री राशिवडेकर यांचे तारेला उत्तर म्हणून पत्र आलें आहे. फक्त अजमास ४०० रु. जमले आहेत व फार झालें तर आणखी ३।४ शें जमतील असें लिहिलें आहे. तेथील शाळेचा कांहीं समारंभ आहे. त्यामुळें वसुली होत नाहीं व जास्ती रक्कम जमण्याची खटपटहि होऊं शकत नाहीं, असें कळवलें आहे। गोकाकला श्री. श्रीशैलप्पा काकती यांनीं अजमासें ८।९ शें रुपये जमवले आहेत. त्यानंतर कांहींच काम झालें नाहीं व होईल असें वाटत नाहीं. बैलहोंगलचा अद्यापि एकहि पैसा नाहीं. करीकट्टी चंद्राप्पा पत्तार यांनीं १५० रु. पर्यंत जमवले आहेत व त्यंकरेड्डी १००० पर्यंत जमवतों असें सांगून गेले आहेत. हुकेरी तालुक्यांत १००० रु. जमले आहेत असें आप्पणा पाटील सांगून गेले. अथणी तालुक्यांतून ७७० रु. आले आहेत, ते फक्त अथणीचेच आहेत,

बेळगांव व शहापूर (२०००) मिळून २१००० रु. वसूल आले आहेत. आणखी चार हजार होतील.

खानापूर व चंदगड अनुक्रमें १००० व ५०० झाले आहेत.

निपाणी भागांतील तुम्हाला माहिती आहेच. अकोलचें काय झालें ? गळतग्यापेक्षां कमी तरी होऊं नयेत. सर्व वसूल करण्याला मंडळींना सांगावें. अद्यापि निपाणी

व गळतग्याचा वसूल व्हावयाचा आहे असें दिसतें. वेळगांव व निपाणी माग मिळून ४२ हजार होतील तरच ५०००० ची भरती होईल. त्यांत निपाणी कडील १८००० तरी आले पाहिजेत.

श्री. नारायणराव जोशी मुंबईला गेले आहेत व तेथें आणखी महिना दीड महिना राहणार आहेत. त्यांची प्रकृति बरी नाहीं. हिराचंदकडून त्यांच्या नांवाचा एक चेक आला होता तो परत पाठवीत आहें. तो रद्द करून भीमराव पोतदार किंव माझ्या नांवें पाठवावा असें हिराचंदांना सांगावें.

मोहनला ता. २१ च्या पूर्वी हुदलीला जाण्याला सवड नाहीं. ता. २७ पर्यंत त्याला काम आहे असें म्हणतो.

वर लिहिलेला तपशील तेथील मंडळींना कळवावा.

एकसंबा गांव मोठा आहे. तिकडे कोणी गेल्याचें दिसत नाहीं! आज तुमच्याकडून कांहीं पत्र नाहीं. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

ता. क. :—निपाणी व खेड्यांतील लोकांमध्यें उत्साह असल्याबद्दल 'सकाळ' 'नवाकाळ'मध्यें बातमी यावी म्हणजे जास्ती हुरूप येईल. वर्तमानपत्रांत लिहिण्याचेंहि काम तुम्हीच केलें पाहिजे. रिपोर्ट देतांना अतिशयोक्ति टाळावी; या फंडाच्या महत्त्वाचें वर्णन करावें.

## पत्र नं. ८९

श्री

वेळगांव ता. २५-९ ४४

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि.

कार्ड पोचलें व अकोळला १७०० चे आकडे पडल्याचें समजलें. गळतगा व अकोळ येथील वसुली कशी होते पहावें. मी आज देवचंदशेठजी यांना पुनः पत्र लिहिलें आहे. कालचा प्रयोग कसा काय झाला? किती रुपये जमले? Loud Speaker व collector चा हुकूम वेळेवर मिळाले ना?

आज मोहनची Majority झाली. पण Majority आपल्या विरुद्ध आहे हें समजतांच रामराव देशपांडे यानें आपल्या अधिकारांत निवडणूक पुढें ढकलली असें Ruling देऊन निघून गेला. त्याचेबरोबर त्याचे लोकहि गेले. असें होणार अशी अटकळ होती. म्हणून पुढें काय करावयाचें हें M. P. Patil यांनी ठरवल्याप्रमाणें मोहनच्या लोकांनीं सभा भरवून मोहनची निवडणूक केली. खरोखर रामरावाला सभा Adjourn करतां येत नाहीं. तरी प्रकरण येथें संपत नाहीं. Moral जय मिळाला आहे.

ता. २७ ला प्रेमाबाई कंटक येथें येणार आहेत. आण्णासाहेब दास्ताने यांचें पत्र आलें आहे. त्यानंतर त्या कोल्हापुरला किंवा हुब्बळीला जाणार असें पत्रांत आहे. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

•

## पत्र नं. ९०

श्री

दोनप्रहरीं २, ३०-९-४४ बेळगांव

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि.

चार दिवसांपासून माझी प्रकृति बरीच ढासळली आहे. असो!

आतांपर्यंत ५११८०० रु. रोख जमले. गळतगे व अकोळचे पैसे आले नाहींत. निपाणीचे सगळे आले नाहींत. पण, बरेचसे आले. बेळगांवनें चांगली मदत केली. सौ. अंगडींनीं आपल्या माहेरच्या गांवांतून (बागे वाडीहून) ५२० रु. दिले. खादीरसाहेब शेख यांनीं पाच्छापूरहून २६० रु. पाठविले. व घोडगेरीहून १६० रु. परस्पर आले. हुकेरी तालुक्यांतून इतकीच रकम आली आहे. आप्पणा पाटलाकडे काय जमा आहे अद्यापि समजलें नाहीं. त्याचप्रमाणें बैलहोंगल तालुक्यांत व सौंदत्ती तालुक्यांत व्यंकरड्डीकडे काय जमा आहे हें समजलें नाहीं! ही कार्यकर्त्यांची शिस्त! तरी गांधींची पुण्याई फार. अथणीहून १६००, गोकाकहून १०००, कुंदरनाड १०००, कोण्णूर २५० रु. (अदमास), चंदगड १०००, खानापूर १५०० (अजमास), चिकोडी १०००, बाकी बेळगांव—शहापूर निपाणी—कोगनोळी (५१०) –लाट, मोज वगैरे. संध्याकाळपर्यंत येथें अजमास १५०० जमतील. माझा संकल्प पुरा झाला. परमेश्वराची कृपा असल्यावर काय होणार नाहीं! कोणाच्या मनांत कांहीं असो. २५ हजाराचे ३०००० झाले. तीसाचे पस्तीस, पस्तीसाचे चाळीस, चाळीसचे पन्नास व आतां पन्नासवर आंकडा हातीं आला. 'सत्य संकल्पाचा दाता भगवान!'

आंथरुणावर पडूनच पत्र लिहीत आहें. बोलण्याची मनाई आहे. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

[पत्र नं ९१ :—खादी कार्यकर्ता श्री. व्यंकटरामय्याशीं माझा मतभेद झाला होता. आणि मी नाराज होऊन त्या कामापासून अलग होणार होतों. त्यावेळीं मला माझी चूक समजून सांगण्यासाठीं ती. गंगाधरराव

यांनीं मला हें पत्र लिहिलेलें आहे. कोणत्या कारणासाठीं आणि कोणत्या हेतूनें गंगाप्पा यमकनमर्डीची हुदलीहून बदली करविण्याचा व्यूह रचण्यांत आला होता व त्याच्या पाठीमागें कोण कोण होते, याची कल्पना गंगाधररावांना त्यावेळीं नव्हती. —पुंडलीकजी]

## पत्र नं. ९१

श्री

२७-१२-४४

श्री. पुंडलीकजी यांस

वि. वि.

आज सकाळीं तुम्ही चि. सौ. प्रमिलेला 'मी पत्र लिहिणार आहें.' असा निरोप सांगून गेलां. या निरोपावरून हुदलीचा वर्ग तुम्ही चालवावयाचा नाहीं हें ठरवल्याचें दिसतें. तुमच्या संबंधानें तुम्ही काय वाटेल तें ठरवावयाला पूर्ण स्वतंत्र आहां. पण, मला तुमचा विचार पसंत नाहीं. या विचारामुळें तुम्ही स्वतः तोंडघशी पडत आहांत व मलाहि पाडीत आहांत. श्री. धोत्रे याचें तुम्हांला आलेलें पत्र मी पाहून त्यांनीं तुमच्या संबंधानें केलेल्या आरोपाला उत्तर देऊन तुमच्यावर जबाबदारी टाकून तुमचा उपयोग करून घ्यावा म्हणून त्यांना लिहिलें आहे.

तुम्ही जे व्यंकटरामय्यावर आरोप करता त्यांत त्यांची बाजू काय आहे हें समजून घेण्याचा तुम्हीं प्रयत्न केला नाहीं. त्यांच्यावर ही एक प्रकारची जबाबदारी आहे. हें आम्ही विसरतां कामा नये. हुदलीस तीन मार्गांचें काम चालू आहे. एवढ्या कामाकरितां किती कार्यकर्ते ठेवावयाचे याचा विचार नको का करायला? त्यांचें बजेट नुकसानींत आहे. तें तसेंच किती दिवस चालवावयाचें? कांहीं लोकांना कमी केल्याखेरीज चर्खा संघाचें काम आतबट्टयाचेंच राहील. ही स्थिति जाजूजी कशी चालू देतील?

गंगाप्पा यमकनमर्डीच्या बाबतींत देखील तुमचा आग्रह गैर आहे. त्याला बाहेर जाणें गैरसोयीचें आहे हें म्हणणें योग्य नाहीं. प्रत्येक कार्यकर्ता 'माझ्याच गावांत मला ठेवा, पगार भरपूर द्या, माझें हातून होईल तितकेच काम मी करीन' असें म्हणूं लागला तर योग्य होईल काय? 'माझी हुदलीस प्रपंचाच्या दृष्टीनें सोय आहे म्हणून माझा पगार कमी करा' असें गंगाप्पा म्हणाला असता तर त्याची योग्यता वाढली असती व त्याला त्यांतून अधिकार उत्पन्न झाला असता. त्याची स्थिति कांहीं अगदीं गरिबीची नाहीं. चर्खा संघाच्या दृष्टीनें तो अगदीं Indispensable आहे असेंहि त्यानें काम करून दाखवले आहे असें तुमचें म्हणणें असेल तर तें इतरांना पटवून द्या. तुमच्या प्रमाणें गंगाप्पा मलाहि आपला वाटतो. पण म्हणून तुम्ही भलत्या गोष्टीचा आग्रह धरण्यांत

अर्थ नाहीं. त्यांतून आपलें म्हणणें दुसऱ्यांना पटवण्याचा हा मार्ग नव्हे. आपण काम करावें व त्यांत अडचणी आल्या तर त्यांचा परिहार करून घ्यावा. दुसऱ्यावर आरोप करीत सुटण्यानें आपली बाजू लंगडी पडत असते. हें माझें म्हणणें पटत नसेल तर माझा तुमच्या बाबतींत आग्रह नाहीं. हुदलींतील तुमच्या घरांचा उपयोग खादी वर्गाकरितां तुम्ही करूं द्यावा असें मी तुम्हांला सांगत नाहीं. बौद्धिक वर्ग तुम्ही घेणार नसाल तर तसें मला कळवावें. विद्यार्थ्यांचा बौद्धिक वर्ग तुम्हीच घ्यावा असें मला वाटतें. या बाबतींत तुमच्यावर जबरदस्ती करण्याचा अधिकार मला न द्याल तर मी दुसरी व्यवस्था करण्याचा विचार करीन. पण तुमच्याहि चुका होत आहेत त्या स्पष्टपणें तुम्हाला कळविणें हें माझें कर्तव्य मी केलें आहे. कळावें, हे वि.

गंगाधर देशपांडे

[पत्र नं. ९२,९३,९४,९५ :—ती. गंगाधरराव प्रकृतिस्वास्थ्यासाठीं गदगला जाऊन राहिले होते त्यावेळीं मला हीं चार पत्रें त्यांनीं लिहिलेलीं आहेत. मी ती. गंगाधररावांच्या सर्वच नातलगांशीं कसा एकजीव झालों आहें हें व्यक्त होणारीं हीं पत्रें आहेत. —पुंडलीकजी.]

### पत्र नं ९२

श्री

गदग २-१-४५

चि. पुंडलीकजी यांस

आशीर्वाद वि.

माझ्या प्रकृतींत सुधारणा आहे. दम्याचा उपद्रव कमी आहे. आणखी १०।१२ दिवस तरी राहाण्याचा विचार आहे. पण येथें घरीं अडचण आहे. याकरितां मधु (शिदोरे) आल्याबरोबर त्याला इकडे पाठवण्याचें करावें. मोहनची थोडी गैरसोय होईल. मधु (शिदोरे) बहुतकरून ४/५ तारखेपर्यंत येईल. त्याला पाठवण्याबद्दल मी काल्च चि. मधूला (बावडेकर) लिहिलें आहे. पण, तो तरी मुंबईहून आला आहे कीं नाहीं ? म्हणून हें पत्र तुम्हाला लिहीत आहे.

तसेंच मधूबरोबर ५० रु. पाठवण्यास मोहनला किंवा मधूला सांगावें. हुदलीस कुमरीच्या घरांत माझा एक स्लीपर आहे तोहि आणवून मधूबरोबर पाठवावा.

प्रकृति सुधारत आहे असें डॉ. अनंतराव याळगींना सांगावें. डॉ. व्यंकटरावांनीं आपलें औषध (होमिओ) दिलें आहे. थोडा हवेचा व थोडा औषधाचा गुण असावा.

मोहनला घराकडे कोणी नाहीं म्हणून सावधगिरीनें राहण्यास सांगावें. सामान तसेंच पडलें आहे.

श्री. अण्णासाहेब लठ्ठे व बाबासाहेब सोमण वगैरे मंडळींना नमस्कार सांगावा. चि. सौ. रमाकांची यात्रा कशी काय झाली? खूप 'कानडी' होऊन आल्या असतील. तिकडे कांहीं विशेष असेल तर कळवावें. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. ९३

श्री

गदग ४-१-४९

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि. पत्र पोंचलें. आज चिमूताई व मुलें बेळगांवला गेली. सौ. प्रमिला व तुमचा नानासाहेब वगैरे परवाच गेले. आतां घरीं वत्सला एकटीच आहे.

'शि.' ची हकीकत समजली. यावरून काय होणार? लोकांचीहि सहानुभूति जावयाची. धैर्यानें तोंड दिलें पाहिजे.

मोहनचें पत्र नाहीं. काळजी वाटते. मी आज तार केली आहे. इतके दिवस पत्र कां नाहीं समजत नाहीं.

प्रकृतींत सुधारणा आहे. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. ९४

श्री

गदग ११-१-४९

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि.

तुमचें पत्र पोंचलें. माझी प्रकृति पुष्कळ सुधारली आहे. दररोज फिरावयाला जात असतों. पायीं मैल दीड मैल हिंडतों. दमा पुष्कळ कमी झाला आहे. आणखी ८ दिवस तरी येथें रहाण्याचा विचार आहे. पुढें कांहीं दिवस कुमरीस राहून पहाणार आहे. त्यानंतर अमळनेरास जाईन. तुम्हाला घेऊन येण्याबद्दल डॉ. नानासाहेबांचें अमळनेरहून पत्र आलें आहे. आणखी कांहीं दिवसांनीं तिकडे थंडी कमी होईल. येथें हल्लीं हवा चांगली आहे. मलेरियाचा आजार मात्र आहे.

वडवींची हकीकत समजली. गुळवाडीचे विचार कदाचित् वडवींच्या विचारांशीं जुळत असतील. बाकी मंडळी गांधी विचारांशीं विरोध करणारीच असतील. कोणी प्रच्छन्न तर कोणी उघड, इतकाच भेद असावा. पण, वडवीला इतका त्रास करून घेण्याचें कारण नाहीं. गांधीजी म्हणतात त्याप्रमाणें त्यांच्या मनाला व त्यांच्या

अंतःकरणाला जसें वाटत असेल तसें त्यांना करूं द्यावें. अनुभवानें जेव्हां समजेल तेव्हां समजेल. त्रास करून घेण्यानें कांहीं उपयोग होणार नाहीं. माझा निरोप म्हणून त्यांना पत्र लिहिलें तें बरें झालें. मला त्याच्याबद्दल वाईट वाटतें. पण, त्यालाहि मोह झाला होता हें कांहीं खोटें नाहीं. तो आतां दूर झाला असल्यास त्यांत त्याचें कल्याण आहे.

घाटेचे स्नेही कडोलीचे सदाशिवराव कुद्रे यांच्याबद्दल मी श्री. घोत्रेना लिहिलें होतें. त्यांचें उत्तर आलें आहे. अद्यापि त्यांची योजना विचारांतच आहे. ती पुरी झाली म्हणजे आमच्याकडे येईल. मग कुद्रेच्याबद्दल कांहीं तरी ठरवितां येईल. त्यांना निरोप कळवावा.

मला एक ३६" पंचावन्ना धोतर जोडी (नेसण्याकरितां) विणवण्यास वासुदेवाला सांगावें. त्याचप्रमाणें एक उपरण्याची जोडी विणवावी.

बाकी विशेष नाहीं. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

ता. क. :—चि. अरविंदच्या नांवें मी मोरला पत्र लिहिलें आहे. उद्यां परवां पुनः लिहीन.

## पत्र नं. ९५

श्री.

गदग १६-१-४५

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि. पत्र पोचलें. सोबत काकासाहेबांचें पत्रहि पोचलें. मी ता. २० दिवशीं येथून निघण्याचें ठरविलें आहे. एक दिवस धारवाडला राहीन. व ता. २१ दिवशीं मेलनें बेळगावला येईन. एखादा दिवस जास्ती कमी लागल्यास लागेल. चि. डॉ. व्यंकटरावांच्या संमतीनेंच हें ठरविलें आहे. तेथें आल्यानंतर पुढील कार्यक्रम ठरवूं. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

[पत्र नं. ९६, ९७ :—मी वर्ध्याला असतांना, वर्ध्यांतील श्रेष्ठींशीं पूर्ण चर्चा व विचारविनिमय करून, हुदलींतील कामाची योजना निश्चित ठरवून घेण्याबद्दल मला हीं दोन पत्रें ती-गंगाधररावांनीं लिहिलीं आहेत.]

—पुंडलीकजी]

## पत्र नं. ९६

श्री.

अमळनेर ता. २३-३-४५

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि. पत्र पोचलें. प्रकृति परवां थोडी पुनः बिघडली होती. आतां बरें आहे. मी मधूला बोलावलें आहे. तो उद्यां मुंबईला येणार आहे. सोमवारपर्यंत तरी येथें यावा. त्याचेबरोबर मुंबईस जाईन. मुंबईस २।३ दिवस राहीन. श्री. बाळासाहेब तोंपर्यंत मुंबईला येतील. नाथजीहि गांवांत नाहींत असें स्वामीजींचें पत्र आले आहे. दोन दिवस उशीर झाला, तरी हरकत नाहीं. तुमचीं सर्व कामें संपवून या. निश्चित एक दिशा ठरवा. सेवाग्रामकडील हकीकत कळवाल्च. मधु आल्यानंतर म्हणजे सोमवारीं येथून निघेन. सरदारगृहांत जागेची अडचण असते म्हणून डॉ. भालेरावकडे अगर स्वामीकडे उतरण्याचा विचार आहे. नक्की ठरवलें नाहीं. Empire Hotel opposite V. T. Station या पत्यावर मधूच्या नांवें पत्र लिहावें म्हणजे तो पोचवील. मुंबईला गेल्यानंतर पत्ता कळवीनच. हुदलींतील कामाचें निश्चित धोरण ठरवून घेऊनच तेथून निघावें. सर्वांचा तुम्हाला नमस्कार. कळावें हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

श्री. किशोर लालजी, नरहर भाई यांना नमस्कार.

## पत्र नं ९७

श्री.

अमळनेर २४-३-४५

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि.

काल्च्या पत्रांत गोसंघाच्या कामासंबंधानें तुम्ही लिहिलें आहे. काम चांगलें आहे व मोठे आहे. हुदलींत तुम्ही तुमच्या अंगावर पुष्कळ कामें घेतलीं आहेत, हें खरें आहे. पण तेथील वातावरण तितकेसें अनुकूल नाहीं, असा तुम्हाला अनुभव आला असावा. जिल्ह्यांतील वातावरणहि बिघडलें आहे. अशा स्थितींत काय करावें हा विचाराचा प्रश्न आहे. हातीं घेतलेलें काम सोडूं नये असें वाटणें साहजिक आहे. म्हणून मी म्हणतों कीं, श्री. जाजूजींशीं सर्व बोलून निश्चित योजना आखावी. अर्धवट करूं नये. श्री. व्यंकटरामय्याचे विचार व काम करण्याची पद्धति तुमच्याशीं जुळेल असें मला वाटत नाहीं. ते सेक्रेटरी असल्यानें त्यांना सोडून जाजूजींनाहि काम करतां येणार नाहीं. या अडचणींतून रस्ता काढला पाहिजे. माझ्यामध्यें पूर्वीची धमक

राहिली नाहीं. प्रकृति तर खालावलीच आहे. फार दिवस निघतील असें नाहीं. मार्ग माझा गोंधळ असू नये असें वाटतें. मागचेंच अद्यापि सावरावयाचें आहे. गोविंदरावाशारखा कोणी मदतगार नाहीं. कृष्णरावांनीं कधींच हात सोडला आहे. जीवनराव परिस्थितीमुळें कंटाळला आहे. आमचीं मुलें प्रबुद्ध झालीं आहेत. पण, त्यांचें लक्ष अद्यापि स्थिर होत नाहीं. बाहेरची परिस्थिति उत्साहजनक नाहीं. विचाराचा गोंधळ चालला आहे. सुधारेल पण काल पाहिजे. तुम्हाला कर्जमुक्त करण्याची इच्छा आहे. पण, मार्ग दिसेना. फार ओझें आहे असें नाहीं. तरी उचलण्याची शक्ति नाहीं. त्यामुळें लाज वाटते. असो.

श्री. बाळासाहेब खेर यांचें कार्ड आलें आहे. ता. ५ पर्यंत ते मुंबईला परत येतील. या वेळीं त्यांची भेट होईल अशी आशा आहे.

मी मधूला (शिदोरे) येथें येण्याबद्दल कळवलें आहे. १२ दिवसांत तो येईल अशी आशा आहे. त्याचेबरोबर मी जाईन असा विचार केला आहे. हें काल्च्या पत्रांत लिहिलेंच आहे.

श्री. किशोरलालजींनीं कुमरीस तुम्ही कायम राहण्याचा प्रश्न काढला असें तुम्ही लिहिलें तें समजलें. हा विनोद असावा. त्यांची कदाचित् मुंबईस भेट होईल.

बाकी ठीक आहे. कळावें हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

[पत्र नं. ९८ ते १०४ :—गदग येथेंप्रकृति स्वास्थ्यासाठीं ती. गंगाधरराव पुनः गेले असतांना, त्यांची कालक्रमण कशी चालत असे आणि देशामध्यें होणाऱ्या घडामोडींचा परिणाम त्यांच्या मनावर कसा होत असे, याचें स्पष्ट चित्र देणारीं हीं सात पत्रें आहेत. —पुंडलीकजी.]

## पत्र नं. ९८

श्री

गदग ७-७-४५

चि. पुंडलीकजी यांस
आ. वि.

काल दिवसा थोडें बरें वाटत होतें. ज्ञानेश्वरीचा बारावा अध्याय काल अर्धा वाचला. आज बाकीचा अर्धा वाचला. गीता प्रवचनांतील नववा अध्याय व बारावा अध्याय वाचला. पुष्कळ समाधान वाटलें. श्री. विनोबांनीं व ज्ञानेश्वरांनीं किती सुंदर भाषेंत भावना उचंबळतील असें भक्तीचें वर्णन केलें आहे! ज्ञानेश्वरी मी अनेक वेळ- वाचली आहे. १२ वा अध्याय तर पुष्कळ वेळां वाचला आहे. कांहीं दिवस तर दर एकादां

शील तोच वाचीत असें. त्यावेळीं सुद्धां मनाला समाधान वाटत असे, नाहीं असे नाहीं. पण, दुसऱ्या अनेक प्रकारच्या कामांत व विचारांत मन गुंतून जात असे. आतां तसें नाहीं. कांहीं काम करण्याची आतां शक्ति नाहीं व विचारांची सुद्धां खळबळ कमी झाली आहे. गेलेल्या आयुष्यांतील केलेलीं चांगलींवाईट कामें यांचें स्मरण होतें. आयुष्यांतील व्यर्थ असा भाग किती गेला'याची आठवण होते व वाईट वाटतें. जें कांहीं चांगलें केलें असेल त्याची किंमत किती कमी आहे याची जाणीव होऊन लाज वाटते. अशा मनस्थितींत सध्यां मी आहें. ज्यांचें मरण जवळ आलें आहे त्यांच्या मनाची स्थिति अशीच होत असावी. या स्थितींत मनाला समाधान कशानें होईल हा विचार येतो. पूर्ववयांत जेव्हां सर्व इंद्रियें सामर्थ्यवान असतात तेव्हां सतत अभ्यास करून त्यांना स्थैर्य आणण्याचा प्रयत्न न केल्यामुळें अशी स्थिति होते. वेळींच सावध असतों तर ही स्थिति आली नसती. असो. आतां तरी राहिलेल्या आयुष्याचा उपयोग चागला व्हावा, चांगल्या विचारांत काल जावा, भावना शुद्ध रहाव्यात म्हणजे अंतकाळीं प्राण सुखानें जाईल असें वाटतें. यामुळें गीतेंतील ९ व १२ वा अध्याय मनाला समाधान देत आहेत. ही वृत्ति तरी किती वेळ टिकते पहावें. नाहींतर पुनः ये रे माझ्या मागल्या!

महाभारताच्या शांतिपर्वाच्या भाषांतराचें पुस्तक आणलें आहे. तेंहि वाचण्यास आरंभ केला आहे.

पं. सातवळेकरांचें रामायण सर्व छापून झालें आहे काय? तुळसीदासाचें रामायण —मराठी भाषांतरासहित—आमच्या संग्रहीं हुदलीस किंवा बेळगांवास असावें. शोध करून पाठवण्याचें करावें. १-२ वेळां हें पुस्तक वाचण्याचा प्रयत्न केला होता. पुन्हा एकदां प्रयत्न करून पहावा असें वाटतें.

१९२४ सालापर्यंतच्या आठवणी कशाबशा टिपून ठेवल्या आहेत. पुढच्या ठेवल्या नाहींत याचें वाईट वाटतें. आतां स्मरणशक्ति बरीच कमी झाली आहे. हातानें लिहवत नाहीं. हलींच्या व्याधींतून बरें वाटल्यास तें टिप्पण पूर्ण करावें असें वाटतें. तें प्रसिद्ध व्हावें अशी इच्छा नाहीं. कारण त्यांत महत्त्वाचें असें कांहीं नाहीं व लिहिण्याची कलाहि माझ्यामध्यें नाहीं. पण, माझ्याबद्दल जिज्ञासा असणारा आमच्याच कुटुंबांत कोणी जन्माला आला किंवा कोणा स्नेह्याला अथवा सहकारी मित्राला तें वाचण्याची इच्छा झाल्यास त्याला तें मिळावें हाच हेतु तें टिप्पण पूर्ण करण्यांत आहे.

धुळ्याचे डॉ. अष्टपुत्रे यांनीं नाशिकच्या तुरुंगांत असतांना कांहीं टिपणें लिहिलीं होतीं. तीं त्यांनीं 'नाशिकचीं द्राक्षें' या नांवानें प्रसिद्ध केलीं आहेत. पुस्तक ल्हान आहे. त्यांतील शेवटचीं २-३ पानें माझ्या संबंधाचीं आहेत. माझ्या विषयीं त्यांना काय वाटलें तें त्यांनीं लिहिलें आहे. तें वाचून वस्तुस्थिति खरोखरच तशी आहे काय याचा विचार मी करूं लागतों. वस्तुस्थिति असते एक व दुसऱ्यांना दिसते निराळीच असें असण्याचा संभव आहे. माझ्याकडे त्यांनीं त्या पुस्तकाची एक प्रत पाठविली आहे. स्वतःचे दोष स्वतःला जितके समजतात तितके दुसऱ्याला समजत नाहींत हेंच खरें.

पण स्वतःच्या दोषांचें आविष्करण करणारे किती ? दुसऱ्यांनीं आपली केलेली स्तुति आपल्याला पसंत नसते असे वाटणारे तरी किती ? असो.

येथें हवा बरी आहे. आक्कुताईची आठवण वारंवार होतेच. मागच्या खेपेला ४१८ दिवसांत गुण आला व ३१४ मैल फिरूं लागलों. या खेपेला तसें होण्याचीं चिन्हें नाहींत. दिव्यांतील तेलच संपत आलें आहे. काजळी झाडून काय होणार ? पाहूं. तुमचें कसें काय चाललें आहे ? सिमल्याची परिषद यशस्वी झाल्यास नवीन वळण लागण्याचा संभव. मोठा पेच आहे. धरलें तर चावतें, सोडलें तर पळतें असें आहे. काय होतें पहावें. धरून पहावें असें मला वाटतें. पण धरूं देईल कीं नाहीं सांगवत नाहीं. ४–५ दिवसांत समजेल.

श्री. शंकरराव देव वगैरेंचीं भाषणें वाचलीं असतीलच. मला देवांचें भाषण पसंत पडलें नाहीं. त्याप्रमाणें मी त्यांना कळविलें आहे. कदाचित् लहान तोंडीं मोठा घांस घेतल्याप्रमाणें झालें असावें. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. ९९

श्री

चि. पुंडलीक यांस गदग, ता. १३-७-४५

आ. वि.

पत्र पोचलें. सिमल्याच्या कॉन्फरन्सची इतिश्री झाली. हुरळून गेलेल्या शंकरराव देवासारख्यांची निराशा झाली. काँग्रेसच्या गेल्या चळवळीनें मोठा जय झाला अशी त्यांची समजूत ! चुका झाल्या नसत्या तर जय झाला असता हें खरें आहे. पण चुका दिसल्या तरी त्या टाळविण्याची हिंमत होत नाहीं. आमच्यांतील भेदभावाचा सरकारनें पुरापुरा फायदा घेतला व पुढेंहि घेत राहीलच. कसे भेद पाडावेत व असलेल्यांचा कसा लाभ उठवावा या विद्येंत ते लोक तरबेज आहेत व आम्ही मूर्ख असल्यामुळें बळी पडतों. आज लीग–काँग्रेस, उद्यां महासभा–काँग्रेस, परवां आंबेडकर–काँग्रेस अशीं अनेक शस्त्रें काँग्रेसला मारण्याला त्यांच्याजवळ सज्ज आहेत. काँग्रेसचें धोरण मात्र बरोबर होतें. आमच्या दृष्टीनें काँग्रेसला सर्वें ठेवतां येणार नाहींत. पुढें काय होतें पाहूं.

लोकमान्यांच्या राजकारणावर एक लेख लिहिण्याकरितां श्री. ज. स. करंदीकरांचें पत्र आलें आहे. मी सांगून लिहवणार आहें. लेखक मिळतो काय पहातों. केसरीनें न छापल्यास दुसरीकडे देणार आहें.

कऱ्हाडहून श्री. पांडुअण्णा शिराळकरांचें टिळक पुण्यतिथीला येण्याबद्दल पत्र आले आहे. पण मी जाणार कसा ?

याळगांपैकीं कोणीहि आपल्या खाजगी गोष्टींबद्दल मला सांगत नाहींत. मीहि विचारावयाचें सोडलें. सार्वजनिक कामांत जीवनरावाखेरीज इतर कोणीहि माझ्याशीं बोलत नाहींत, हें तुम्हाला माहीत आहेच.

तुमचें घरें चालल्याचें समजलें. आनंद झाला. मोहननें सार्वजनिक कामांत किती लक्ष घालावें हें मी कोण ठरवणार? ज्याच्या त्याच्या हौसेची ही गोष्ट असते.

काकांना (कालेलकर) मी एक पत्र लिहिणार आहें. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

सोबतचा कागद कृष्णा चंचलवाडकडे द्यावा.

## पत्र नं. १००

श्री

गदग, ता. २१-७-४५

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि. तुमचें पत्र पोचलें. डॉ. व्यंकटरावांना देणगीविषयीं तुम्ही मी येथें असेपर्यंत म्हणजे मला तुम्ही भेटेपर्यंत पत्र लिहूं नये असें मला वाटतें. त्यांचें कसें काय चाललें आहे हें मला माहीत नाहीं. मोहनच्या बाबतींत त्यानें काय करावें हें त्यानेंच ठरवावें. तुमची कल्पना त्याला सांगावी.

तुम्हाला विरोध होणार असें लिहिल्याचें समजलें. काय होईल तें खरें. विरोध करणाऱ्यांना नको म्हणून सांगितल्यानें ते थोडेच थांबणार आहेत? श्रद्धेनें काम करीत राहावें. काय होईल तें खरें. गांधीजींना काय कमी विरोध आहे! काकांचें (कालेलकर) मलाहि एक पत्र आलें आहे. त्यांनीं माझ्याकरितां येथें येऊं नये. मी बेळगांवला आल्यानंतर त्याबद्दल विचार करूं. मी कदाचित् आणखी कांहीं दिवसांनीं अमळनेरला जाईन. त्यावेळीं त्यांना तरी बोलावून घेईन किंवा मी तरी त्यांच्याकडे जाईन. तसें त्यांना लिहावें.

तुमचें पत्र मी पुनः वाचून पाहिलें. तुमच्या कोणत्या प्रश्नाला उत्तर द्यावयाचें राहिलें हें समजलें नाहीं. प्रकृति साधारण आहे. उपचार चालू आहेत. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

मला नेसण्याकरितां एक पंचजोडी (७×४५") ची विणवावी.

## पत्र नं. १०१

श्री

गदग, ता. २९-७-४५

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि. तुमचें कार्ड व पत्र दोन्ही पोचलीं. मी लेख पुण्याला पाठविला आहे. 'मी लेखक किंवा साहित्यिक नाहीं व माझीं मतेंहि केसरीच्या मताहून भिन्न आहेत तेव्हां लेख पसंत नसल्यास परत करावा, त्याबद्दल मला मुळींच वाईट वाटणार नाहीं' असें करंदीकरांना कळविलें होतें. लेख परत आला नाहीं. तो छापणार आहेत असें केसरींत प्रसिद्धहि झालें आहे. त्याचें कानडी भाषांतर संयुक्त कर्नाटककडे पाठविलें आहे.

अनंतराव कटकोळ यांच्या पत्रांतील मजकूर समजला. मी या विषयाबद्दल अद्यापपर्यंत तरी उदासीन आहें.

तूर्त अमळनेरला जाण्याचा विचार नाहीं. प्रमिलेची आई श्रावणांत इकडे येणार आहे असें समजतें. पुढें पाहूं.

येथें मीं सूत काढलें नाहीं. मला वसवत नाहीं. २।३ दिवसांपासून थोडें बरें वाटूं लागलें आहे. बेळगांवांत थोडें सूत आहे.

श्री. नारायण नाईकाकडे तुम्ही गेल्याचें समजलें व त्यांना एक हजार रुपयेपर्यंत मदत करण्याबद्दल विनंति केल्याचें समजलें. त्यांना कामाचें महत्त्व समजून द्या. असल्या कामाबद्दल त्यांना प्रेम असावें असा माझा अंदाज आहे. त्यांची वृत्ति राष्ट्रीय आहे. स्वावलंबनानें त्यांनीं आपली सांपत्तिक स्थितीहि सुधारली आहे. नवीन पिढीला त्यांची चिकाटी व उद्योग आदर्शभूत आहेत. तेव्हां तुम्हाला ते मदत करतीलच. मी त्यांना भेटेन त्यावेळींहि त्यांना सांगेन. पण मी सांगण्यापूर्वीच ते तुम्हाला तुमच्या अपेक्षेप्रमाणें मदत करतील अशी आशा आहे.

तुमचें काम बरें चालल्याचें समजलें. प्रयत्न करणें आपल्या हातीं आहे. तो तुम्ही करीतच आहां. आणखी एक ७।८ दिवसांनीं तिकडे येण्याचा विचार आहे. आतां तिकडे पाऊसहि कमी झालाच असेल.

आचार्य भागवतांचीं दोन पुस्तकें पाठवीत आहें. श्री. आप्पासाहेब पटवर्धनांचें पुस्तक तुमच्याकरितां आलें होतें. तें बेळगांवास होतें. मिळालें असेलच. मी तें वाचलें.

तुमच्या कार्डावरून तुम्हाला तुमचा आत्मविश्वास वाढल्याप्रमाणें वाटत असावें असें दिसतें. हें चांगलें आहे. पण त्या आत्मविश्वासाचा अभिमान नको. त्यामुळें अहंकार उत्पन्न होतो व काम बिघडतें. कांहीं मंडळी तुम्हाला अडथळा करतीलच! त्याला काय इलाज? अक्तंगेरहाळला हुचप्पाकडून चांगलें काम होत असल्यास जास्ती लक्ष घालावें. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १०२

श्री

गदग, ता. ३१-७-४५

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि. मोहन परवां येऊन गेला. त्याचे सांगण्यावरून तुम्ही त्याला गोकाकला मि. व्हाइट हेडकडे Agency करितां घेऊन जाणार आहां असें सांगत होता. धंदा काळजीनें करील असें दिसतें. उधळ्या नाहीं. अंगावर काम पडलें म्हणजे मेहनत करतो. वकीलीचा धंदा मला आवडत नाहीं व तो दिवसेंदिवस जास्त वाईट होत जाणार. तेव्हां त्यानें निराळी Line काढलेली बरी. शेतीच्या उत्पन्नावर फारसें अवलंबून राहण्यांत अर्थ नाहीं. असें मला तरी स्पष्ट दिसत आहे. पांढरपेशांच्या हातांत आतां शेती रहाणार नाहीं. आणि ती कां रहावी? कांहीं उद्योगांत राहून पोटापुरतें मिळालें व जीवन चांगलें गेलें म्हणजे पुष्कळ झालें!

मधू (सावडेकर)ची व गोगटयांची भागीदारी संपली असें त्याचें पत्र आलें आहे. भांडणें वगैरे झालीं नाहींत. दोघांच्या संमतीनें व खुषीनेंच झालें आहे. तेव्हां त्यालाहि आतां धंदा पाहिजेच आहे. गोकाकचें जुळल्यास दोघांच्याहि फायद्याचें होईल. प्रयत्न करून लवकर जुळेल असें करा. मी ता. ७।८ पर्यंत बेळगांवला यावें म्हणतों. त्यावेळीं जास्ती बोलूं. एकंदरींत दोन्ही मुलांनीं रिकामें बसूं नये एवढेंच मला वाटतें. कांहीं पैसा मिळाल्यास त्याचा उपयोगहि होईल अशी आशा वाटते. अगदींच कांहीं व्यर्थ जाणार नाहीं. प्रयत्न जरूर करावा. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १०३

श्री

चि. पुंडलीकजी यांस

गदग, २-८-४५

आ. वि.

काल रात्रीं चि. डॉ. व्यंकटरावांना एकाएकीं Heart attack आला. मागें एकदां त्याला असेंच झालें होतें. सकाळपासून बरें आहे. मी तुम्हाला येण्याबद्दल तार करणार होतों. पण, थोडें बरें वाटूं लागल्यामुळें तार केली नाहीं. या त्यांच्या दुखण्यापुढें माझें दुखणें कमी झालें आहे. काल संध्याकाळीं कर्नाटक संघाची एकीकरणाबद्दल सार्वजनिक सभा झाली. मी अध्यक्ष होतों. थोडें भाषण करावें लागलें. त्यानंतर महाराष्ट्र मंडळांत लोकमान्यांची पुण्यतिथी पाळण्यांत आली तेथेंहि अध्यक्ष मीच होतों. भाषणांचा औषधाप्रमाणें उपयोग झाला कीं काय नकळे! केसरींतील माझा लेख वाचला काय?

अभिप्राय काय आहे? इतर लेख वाचले असतीलच. सगळ्यांचा एकच सूर. माझा मात्र तेवढा निराळा. बाबूरावांना माझा लेख पसंत पडल्यासारखें दिसतें. आमच्या मंडळींत काय टीका होते पहावें. केसरींत कां लेख दिला? ही टीका तर होणारच. आमची मंडळी कोणी केसरी हातांतहि धरीत नसतील. पण हें योग्य नाहीं.

चि. डॉ. व्यंकटरावांची प्रकृति चांगली सुधारेपर्यंत तरी मी येथें राहणारच. पुढें पाहूं. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

लोकशक्ति (ता. १–८ चा) यांत माझ्या लेखाचा गौरव करण्यांत आला आहे.

## पत्र नं. १०४

श्री

चि. पुंडलीकजी यांस गदग, ता. ५-८-४५

आ. वि.

तुमचें पत्र पोचलें. तुम्ही पुण्याहून परतलां असालच. पुण्यांत कोण कोण भेटले? तिकडील हकीकत कळवावी. व्यंकटरावांना थोडें बरें वाटूं लागलें आहे. माझा दमाहि आतां कमी आहे. माझ्या रोगापेक्षां व्यंकटरावांच्या प्रकृतीचें दडपण मनावर जास्ती येत आहे. त्यांना बरें वाटल्यानंतर मी तिकडे येईन. कांहीं दिवस तिकडे राहून जरूर असल्यास पुन्हा येथें येईन.

मोहन पुण्याला गेल्याचें पत्र चि. सौ. प्रमिलेकडून आलें आहे. कांहीं तरी उद्योग करण्याची धडपड आहे हें बरें आहे. पैसा मिळो न मिळो, पण उद्योगाची तरी आवड उत्पन्न झाल्यास एकपरीनें तरी बरें होईल. मधु काय करतो पहावें. कदाचित् दोघे मिळून परत येतील.

श्री. दिवाकर १।२ दिवसांत येथें येणार आहेत.

लीला आली आहे. त्यामुळें वत्सलेला थोडा आधार झाला आहे.

हुदलीकडे हवा कशी आहे? येथें काल थोडा पाऊस पडला. आजहि थोडा थोडा आहे. सर्दी नाहीं.

याळगी मंडळी भांडणें न होतां विभक्त झालीं असें समजतें. बंगल्यांत तीन स्वयंपाकांना प्रारंभ झाला आहे असें कळलें. जीवनराव अस्वस्थ दिसतात. साहजिक आहे. पण करणार काय?

कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १०५

श्री

अमळनेर, ता. १-८-१९४६

श्री. पुंडलीकजी यांस

वि. वि. पत्र पोचलें. मजकूर समजला. मोहनची आर्थिक परिस्थिति काय आहे व काय होईल याची मला चांगली कल्पना नाहीं. मी दरसाल १००० रु. चा बोजा त्याच्यावर घातला आहे. तेव्हां या सर्व गोष्टींचा विचार करून तुमच्या पत्राला उत्तर दिलें पाहिजे. तें येथून करतां येणार नाहीं. तिकडे आल्यानंतरच याबद्दल विचार करूं. मोहन, मधु, प्रमिला वगैरे मुलांबरोबर मला किती जपून वागावें लागतें हें माझें मलाच माहीत. आतां तीं प्रबुद्ध झालीं आहेत, याची जाणीव ठेवूनच मी वागतों.

मी इकडे आल्यापासून बेळगांवकडून पत्र नाहीं. वाट पाहून परवां बाळगींच्या नांवानें तार केली. तरी उत्तर नाहीं. येथें आतांपर्यंत तरी पत्रें मिळत आलीं आहेत.

पोस्टात मुद्दाम मनुष्य पाठवून पत्रें दररोज आणवीत असतात. तुम्ही तरी वेळेवर पत्र घालण्यास त्यांना सांगा व तुम्हीहि लिहीत जा. मुंबईला वसुंधरा भेटली होती काय? तिचेंहि पत्र नाहीं.

माझी प्रकृति बरी आहे. माझी काळजी चांगल्या प्रकारें घेतली जाते. हवा अनुकूल आहे. ५।६ दिवसांपासून दररोज फिरावयास जात असतों. थकवा येत नाहीं. हलु हलु चालावें लागतें.

जर तिकडील क्षेमसमाचार कळला नाहीं तर मन अस्वस्थ होतें. या स्थितींत मला येथें फार दिवस राहणें कठीण होईल. इकडे पाऊस बरा आहे. तिकडे कसें काय आहे? पिकें बरीं आहेत ना?

कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १०६

श्री

अमळनेर, ता. १०-८-४६

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि. तुमचें पत्र पोचलें. मुलांच्या संबंधानें तुम्ही लिहिलें तें खरें आहे. एखाद्या वेळीं माझा तोल जातो. पण मी लगेच सावरतों. असो.

प्रकृति बरी आहे. येथून लवकर निघावें असें वाटूं लागलें आहे. मुलींची फार आठवण होते. नक्की ठरलें म्हणजे कळवीन.

जळगांवहून येणारी गाडी Derail झाली होती. त्यामुळें चार दिवस रस्ता बंद होता. संप मिटला होता तरी यामुळें टपाल चार दिवस उशीरा मिळालें ! येथून १२ मैलांवर पारोळें म्हणून गांव आहे. तेथें काल ९ ऑगस्ट दिनाकरितां जाऊन आलों. बाकी ठीक आहे. आण्णासाहेब जलालपूरकर यांच्याकरितां निरोप दिल्याचें कळलें. त्यांची भेट झाली होती तेव्हां त्याना कां बोललां नाहींत? सर्वच विलक्षण. असो. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १०७

श्री

चि. पुंडलीकजी — अमळनेर २२-८-१९४६

आ. वि.

वेळगांवाहून लिहिलेलें ता. १९ चें पत्र पोचलें. मला येथें संकोच वाटत नाहीं. पण तिकडची ओढहि आहे. चि. सौ. प्रमिला व मुलें यांच्या सहवासांत अलीकडे बरेच दिवस गेल्यामुळें त्यांची आठवण होते. पूर्वी संन्याशाप्रमाणें होतों. तेव्हां कोठेंहि कितीहि दिवस राहिलें तरी कांहीं वाटत नव्हतें. तुम्ही म्हणतां त्याप्रमाणें प्रमिलेच्या मातुःश्री फार आदरानें व ममतेनें वागतात. त्यामुळें घरापेक्षां माझी जास्ती बरदास्त येथें ठेवली जाते. आपल्या कुटुंबांत प्रमिलेच्या आईप्रमाणें गृहिणी असतील तर आदर्श कुटुंबव्यवस्था होईल. फार शिकलेल्या नसतांना उत्तम प्रकारें घर चालवतात. समजूत चांगली आहे. दोनीहि मुली 'देशसेवकांच्या' घरीं आहेत हें पाहून त्यांना संतोष व अभिमान वाटतो. परवां येथील राष्ट्रीय स्वयंसेवक संघाच्या गुरु-दक्षिणेचा समारंभ होता. प्रमिलेचे मामा प्रो. दाते हे या संघाच्या चालक वर्गात आहेत. त्यांच्या आग्रहावरून मी त्या समारंभाचें अध्यक्षस्थान स्वीकारण्याचें कबूल केलें. जवळजवळ सव्वातास बोललों. माझी भूमिका संघापासून कशी निराळी आहे, हें सांगून कॉंग्रेसचें धोरण समजावून सांगितलें. संघाला शिव्या वगैरे देऊन निंदा केली नाहीं. माझें भाषण एकंदरींत मंडळींना आवडलें असें दाते सांगत होते. प्रमिलेच्या आईना तर भाषण फारच पसंत पडलें. येथें आल्यापासून माझीं चार भाषणें झालीं. डॉ. नानासाहेब हजर असतात. एक तास अनायासानें बोलूं शकतों. येथें किती दिवस रहा-वयाचें हें अद्यापि ठरवलें नाहीं. तिकडील पावसाळा कमी होईपर्यंत तरी राहीनच. प्रमिला दिवाळीला येणार आहे. त्यावेळीं महिना दीडमहिना तरी ती राहील. दिवाळीपर्यंत रहावें लागल्यास अजितेला घेऊन येण्याबद्दल लिहीन. प्रमिलेला विचारून ठरवावें म्हणतो.

रामदुर्गची हकीकत समजली. सरदारांना हकीकत कळवीत असावें असें तुम्ही सांगितलेचें समजलें. तेंच योग्य आहे. मी सरदारांना भेटलों त्यावेळीं संस्थानिकां-

संबधानें बोलणें झालें. त्यांत त्यांना union ची योजना पसंत आहे, असें ते म्हणाले. पण शिलरे वगैरे उगीच घाई करतात असेंहि म्हणाले. गांधीजींचें मत मला तितकेंसें पटलें नाहीं. Theory नें तें बरोबर आहे पण व्यवहारांत आज आणणें कठीण आहे. आतां तर कॅांग्रेसच्या हातीं केंद्रसत्ता येण्याचा संभव दिसतो. तेव्हां काय होईल हें सांगतां येत नाहीं. "उतावळा नवरा गुडघ्याला बाशिंग" असें न होवो म्हणजे मिळविली. प्रांतिक कारभारांतहि गोंधळ होईल कीं काय अशी भीति वाटते. बहुमत आहे या घमेंडीवर कारभार चालू आहे. पण ही खरी Democracy नव्हे असें वाटूं लागलें आहे. काय होईल तें खरें.

शंकरराव देवांचें धोरण काय आहे? त्यांनींच संस्थानिकांची व गांधीजींची भेट घडवून आणली असें मी ऐकतों. आप्पासाहेब पंतांचें धोरण काय आहे?

रामदुर्गकरांनीं तुम्हाला चांगली मदत केली असें म्हणावें लागतें. त्यांच्या कारभाऱ्यांनीं प्रयत्न केला असावा. इमारतीवरचें तुमचें कर्ज फेडून एकदां मोकळे झालेलें बरें. तें एक तुमच्यावर दडपण आहे.

पुढील कामाची काय योजना आहे हें तुम्ही लिहिलें नाहीं. नीट विचार करून ठरवावें. जिल्ह्याची, प्रांताची स्थिति फार बिघडली आहे, हें लक्षांत ठेवावें.

चि. अभ्यंकरांचें प्रकरण काय आहे याचा बोध चांगला झाला नाहीं. माझ्याकडून त्यांना कोणत्या प्रकारची मदत पाहिजे तेंहि लक्षांत आलें नाहीं. Political खातें अद्यापि Central कडेच आहे. Constituent Assembly काय करते पहावें. प्रांतिक कारभारांत तूर्त तरी तें नाहीं. काय शक्य असेल तें मी अभ्यंकरांच्यासाठीं करीनच.

आण्णासाहेब जलालपुरकरांच्या मृत्युपत्राची नक्कल आली नाहीं. 'मी कांहीं व्यवस्था केली आहे' असें मोघम त्यांच्या पत्रांत होतें. काय व्यवस्था केली असेल ती योग्यच असेल हें मी लिहिलें होतें. पण, ज्या त्यांच्या कल्पना असतील त्या लागलीच मूर्तस्वरूपांत आणणें बरें असेंहि मी कळवलें होतें. मृत्युपत्रानें भानगडी उपस्थित होतात. त्यांत संस्थान! विनाकारण नाहीं तीं कुलगडी उत्पन्न होतात. हें सर्व स्पष्ट लिहिलें तर, त्यांत आमचा स्वार्थ आहे असें आण्णासाहेबांना व इतरानांहि वाटण्याचा संभव आहे, म्हणून मीं लिहिलें नाहीं.

श्री. मनोळीचा विधायक कार्यक्रम प्रामाणिकपणाचा नाहीं. कांहीं तरी निमित्तानें त्याला संस्थानांत प्रवेश करून घ्यावयाचा आहे. त्याचप्रमाणें रामदुर्गकरांचासुद्धां प्रामाणिकपणा नाहीं. श्री. मनोळींच्या विरुद्ध एक Counter move त्यांची आहे, एवढाच त्याचा अर्थ आहे. जर मनोळीला आपल्याकडून चूक मागें झाली आहे असें खरोखर वाटत असेल व मनापासून लोकांना उपयोगी पडावें अशी बुद्धि झाली असेल तर त्यांना हाताशीं धरून मदत करावी. प्रत्यक्ष परिस्थिति काय आहे हें मला माहीत नाहीं.

दिवाकराबद्दल कांहीं न बोलणें बरें. सरदारांना त्यांच्याबद्दल आदर आहे असें

वाटत नाहीं. सरदारांच्या बोलण्यांत 'छत्री' प्रकरण निघालें होतें. "He deserved it" असें सरदार म्हणाले. तथापि दिवाकर अन्य मार्गानें आपले घोडें दामटीत असतातच. "राजकारण" आहे. कोणाचें काय सांगावें ? बाकी विशेष नाहीं. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

ता. क. :—तुम्ही केव्हां येणार असें डॉ. नानासाहेब व वहिनी विचारीत असतात.

## पत्र नं. १०८

श्री

अमेळनेर, ता. १३-१०-४६

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि. प्रकृति बरी आहे. येथील सर्व मंडळी खुशाल आहेत. कुरुंदवाडकरांनीं ठळकवाडीला लागून कांहीं प्लॉट्स् विकले आहेत. त्यांपैकीं एक प्लॉट खराब आहे म्हणून विकला गेला नाहीं. तो थोड्या किंमतींत मिळण्यासारखा आहे. प्रयत्न करून पहा. मुद्दाम त्यांची भेट घेऊन हें काम करा. विसरूं नका. दिवसगत करूं नका.

वसुंधरेकरितां पातळाला ४५" पांच वाराची खादी पाहिजे आहे. चार पातळें करावयाचीं आहेत. बारीक सूत पाहून विणवून घ्यावीत. तिचा तगादा आहे.

तुम्ही बँकरच्या पुतण्याला वॉनलेस सॅनिटोरियममध्यें भेटून आलांत याबद्दल आभारदर्शक शंकरलालचें पत्र आलें आहे. पुन्हा जाल तेव्हां जरूर भेटून या. त्यांना तेवढाच आधार वाटतो. कळवें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १०९

श्री

अमळनेर २७-१०-४६

चि. पुंडलकजी यांस

आ. वि. तुमचें पत्र पोचलें. बाबासाहेबांच्या प्रकृतीबद्दल काळजी वाटते. अगदीं स्वावलंबी मनुष्याला परावलंबी व्हावें लागेल कीं काय अशी भीति वाटते. लवकर सुधारतील पण पुढें फारच सावधगिरीनें रहावें लागणार.

मोहन येथें एक दिवस होता. काल परत गेला. तो कुरुंदवाडकरांना भेटला नाहीं. तुम्हालाच तें काम करावें लागेल.

खादीच्या बाबतींत विणकऱ्यांवर अवलंबून राहण्यांत चूक झाली असें म. गांधीसुद्धां म्हणत आहेत. कार्यकर्तेच विणकर झाले पाहिजेत. निपाणीच्या लोकांनें

व तुमचें काय बोलणें झालें हें कळल्याशिवायच मी त्यांना लिहावें काय ? मी तिकडे आल्यानंतरच पाहूं.

चार दिवस दिवाळीची गर्दी होती. नाशिकचे लोक आले होते. आज ते सहकुटुंब जाणार आहेत. मग पोटाला थोडी विश्रांति मिळेल. मंगळवारीं मी चोपड्याला जाणार आहें. २–३ दिवस तिकडे राहीन. प्रमिला बेळगांवला येणार आहे.

मुली आनंदांत आहेत. इकडील सर्व मंडळींचा तुम्हाला नमस्कार. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. ११०

श्री

बेळगांव १८-३-४७

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि.

तुझें पत्र पोचलें. तुझी प्रकृति सुधारत असल्याचें समजून समाधान वाटलें. आणखी ५-६ दिवसांत Discharge मिळेल. उगीच वणवण फिरूं नकोस. भोरला वाटेल तर जाऊन ये. मी आतां कुमरीला जाणार आहें. तेव्हां माझ्यापाशीं राहण्यास हरकत कोणती ? प्रकृति पुरी बरी होऊन शक्ति आल्यानंतर भटकावयाचें आहेच.

डॉ. वझेबद्दल लिहिलें तें कळलें. मी त्यांना तुझ्याबद्दल पत्र लिहीन. पण माझ्या पत्रापेक्षां तुझ्याच आपुलकीनें जास्ती काम होईल.

यमुताई आज पुण्याला गेली. उद्यां एक दिवस राहून परवां भोरला जाईल. कुसुम येथें आहे. वसुंधरा काल आली.

माझी प्रकृति Blood pressure वाढल्यामुळें थोडी बिघडली होती. आतां बरें आहे. तथापि लेखन वाचन कांहीं करीत नाहीं. प्रस्तावना माझ्यापेक्षां तूंच चांगली लिहिशील. शीखांचे कांहीं गुण चांगलेच आहेत. त्यांचा गौरव करण्याला कांहींच हरकत नाहीं. सरदार प्रतापसिंहांना माझे नमस्कार.

त्याचप्रमाणें डॉ. वझेना आभारपूर्वक नमस्कार सांग. मोहन हुबळीस गेला आहे. उद्यां परत येईल. मुलें वगैरे सर्व बरीं आहेत. कळावें, हा आ.

गंगाधर देशपांडे

ता. क :—नाथजींचें पत्र आलें होतें. स्वामींचेंहि आलें आहे. दोघेहि बिहारला गांधीजींच्या बोलावण्यावरून गेले आहेत.

दुसऱ्याकडून कांहीं काळ सेवा घेण्याचा तुझ्यावर प्रसंग आला तर त्यांत तुला दुःख वाटण्याचें कांहींच कारण नाहीं. लोकांची सेवा करण्यांत तुझा जन्म गेला

आहे. विशेषतः माझी तूं केलेली सेवा मी कशी विसरूं शकेन ! माझा जन्म मात्र लोकांकडून सेवा घेण्यांतच गेला.

परवां दोनदां चक्कर आली. त्यावेळीं पराधीनता येते कीं काय अशी भीति वाटली होती. तसें कांहीं झालें असतें तर बाबासाहेबांनीं घालून दिलेल्या मार्गाचा अवलंब करण्याचें मनाशीं ठरवलें होतें.

सार्वजनिक कामाची हौस बरीच भागली. स्वप्नसृष्टि देखील खरी होण्याची वेळ आली. स्वराज्य लांब नाहीं असें मनाला पटतें. घरची काळजी बरीच दूर झाली आहे. बरीच म्हणण्याचें कारण वसुंधरेची अद्यापि काळजी वाटते. बाकी सर्व ठीक आहे. हा आशीर्वाद. गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १११

श्री

बेळगांव ता. २३-३-४७

नि. पुंडलीकजी यांस प्रेमपूर्वक आ. वि.

तुमचें ऑपरेशन यशस्वी रीतीनें पार पडलें व आतां बरें आहे हें वाचून आनंद झाला.

तुम्ही लवकरच बरे व्हाल. काळजी करूं नका.

मी १७ तारखेला मोरला जात आहें. तुम्ही मुंबईहून परत येतांना मोरला अवश्य येऊन भेटून जा. आम्ही अगदीं वाट पाहूं. चि. वसुंधरा तेथें आहेच आपली काळजी घ्यायला. त्यामुळें आम्हाला काळजी नाहीं.

ती. मामा तुमच्याबद्दल सारखी विचारपूस करतात. आतां तुम्हाला कसें काय वाटत आहे तें कळवावें.

बाकी इकडे सर्व ठीक आहे. तुमच्या प्रकृतीविषयीं वरचेवर कळवावें म्हणजे मला काळजी लागणार नाहीं. कळावें, हा आशीर्वाद. आपली भगिनी

सौ. यमूताई यावडेकर

## पत्र नं. ११२

श्री

चि. पुंडलीकजी यांस बेळगांव, ता. २४-३-४७

आ. वि.

तुझें पत्र पोचलें. श्री. K. S. पाटील यांचेबरोबर २५ रु. पाठविले होते ते पोचले असतीलच. हॉस्पिटलमधून तूं बाहेर पडला असशील. आतां प्रकृति बरी आहे ना ? दुखण्याला तूं थोडा नरमच आहेस. त्यामुळें जास्ती त्रास झाला असावा.

डॉ. वझेनीं माझ्या सहवासांत कांहीं दिवस घालवावे असें तुझें मत असल्याचें समजलें. पण त्यांना तसें वाटलें पाहिजे. त्यांना माझ्याकडे आकर्षित होण्यासारखें माझ्याजवळ कांहीं नाहीं. चांगली विद्या संपादन करावी, लौकिक मिळवावा, पैसा मिळवावा, ऐप आराम करावा, शिल्लक राहिल्यास संचय करावा, हें त्यांच्या जीवनाचें ध्येय असेल. विद्या संपादन करून त्यांत तज्ञ म्हणून लौकिक मिळविण्यांत कांहीं दोष नाहीं. पण इतर विषय माझ्या सहवासानें साध्य होणार नाहींत. मी सांगणार विद्येचा उपयोग सेवेंत करा व श्रीमंतीचा ह्व्यास धरूं नका. पण आज तें कोणाहि तरुणाला पटणार नाहीं. हल्लीचें वातावरण प्रतिकूल आहे. त्याबद्दल तरुणांना मी दोष देत नाहीं. समाजाची घडी बदलून नवीन विचार प्रभावी होण्याला काल लागेल. परकी सत्ता जाण्याच्या बेतांत आहे, ही स्थिति सामाजिक सुधारणेला अनुकूल होईल.

आमच्या घरांतील मुलांवर माझे विचार किंवा माझे जीवन किती परिणामकारक झालें आहे! वझेंचा व माझा तितका निकट परिचय नसल्यामुळें त्यांच्याबद्दल मी निश्चयात्मक कांहींच सांगूं शकत नाहीं. माझ्या विषयींहि ते कांहीं सांगणार नाहींत. सर्वसाधारणपणें हल्लींच्या सुशिक्षितांच्या आकांक्षा काय असतात हें पाहून मी अनुमान काढलें आहे. काल झपाट्यानें बदलत आहे. जें आमच्याकडून झालें नाहीं तें काल घडवून आणील.

मी आतां कौटुंबिक व सार्वजनिक खटाटोपांतून मोकळा झालों आहें. अलिप्तपणानें निरीक्षण करण्याची मला संवय होऊं लागली आहे. प्रत्येक काम या वृत्तीनें करण्याचा काल निघून गेला आहे. त्या काळींच जर ही वृत्ति आली असती तर किती तरी पटीनें जास्ती व चांगलीं कामें माझ्याकडून झालीं असतीं. असो!

मी उद्यां कुमरीला जाण्याचा विचार केला आहे. वसुंधरा आली असली तर तिला बरोबर घेऊन जाणार आहें. येथें तिचा अभ्यास होत नाहीं. मुलांचा गोंधळ सारखा असतो.

हवेंत उष्णता बरीच आहे. त्यामुळें दम्याचा उपद्रव कमी आहे. साधारणपणें प्रकृति ठीक आहे. फारसें वाचवत नाहीं, एवढें वाईट झालें आहे. स्मरणशक्ति कमी झाली आहे. बाकी ठीक आहे. घरीं सर्व क्षेम आहे. कळावें, हा आ.

गंगाधर देशपांडे

[ पत्र नं. ११३:— श्री. पांडुरंग उत्पात यांना लिहून दिलेल्या पत्राची ही नक्कल ती. गंगाधररावांनीं माझ्याकडे दिलेली होती. महात्माजींना पू. साने गुरुजींच्या उपवासाच्या प्रतिज्ञेची माहिती देतांना जरूर पडल्यास मीं या पत्राचा उपयोग करावा, अशा हेतूनें त्यांनीं हें पत्र माझ्याकडे दिलेलें

होतें. या पत्राचा उपयोग करण्याची वेळच न येईल अशा घटना झटपट एकामागून एक घडत गेल्या. श्री. रघुनायरात्र धोत्रेजी यांच्यापर्यंतहि हें पत्र गेलें नसावें. —पुंडलीकजी]

## पत्र नं. ११३

श्री

बेळगांव ता. २६-४-४७

श्री. रघुनाथराव धोत्रेजी यांना
कृ. सा. न. वि. वि.

हें पत्र घेऊन येणारे श्री. पांडुरंग उत्पात हे माझे स्नेही आहेत. पंढरपुरच्या मंदिरप्रवेशासंबंधानें साने गुरुजींनीं बेमुदत उपोषणाची प्रतिज्ञा केली आहे हें आपल्या वाचनांत आलें असेलच. सर्व दृष्टीनें विचार करतां हा त्यांचा उपवास शुद्ध दिसत नाहीं. पण साने गुरुजींना हें पटवून देण्याचें काम कठीण आहे. हें काम पू. विनोबाजी किंवा बापूजीच करूं शकतील. या कामीं विनोबाजींची भेट घेण्याकरितां श्री. उत्पात व आणखी कांहीं पंढरपुरची मंडळी जात आहेत. विनोबाजींची त्यांची ओळख नाहीं. म्हणून आपण या मंडळींचा परिचय करून द्यावा व यांचें म्हणणें विनोबाजींच्या कानावर घालण्याची व्यवस्था करावी. त्यांच्या कामांत आपणहि मदत करावी.

मुंबई सरकारांनीं मंदिरप्रवेशाबद्दल एक बिल आणिलें आहेच. त्याशिवाय लोकमत बरेंच अनुकूल होतच चाललें आहे. पंढरपूरच्या मंदिराच्या अधिकाऱ्यांपैकीं कांहीं उत्पात, बडवे वगैरे अनुकूल आहेत. पण आजच गडबड केली तर त्यांचें तरी कोण ऐकणार ! सर्व हकीकत आपल्याकडे येणारी मंडळी सांगतीलच. माझी प्रकृति साधारण आहे. कळावें, लोभ असावा ही वि.

आ.
गंगाधर देशपांडे

## पत्र नं. ११४

श्री

बेळगांव ता. ३०-६-४७

चि. पुंडलीकजी यांस

आशीर्वाद वि. पत्र पोचलें. परवां एक कार्ड लिहिलें होतें. तें पोचलें असेलच. मी व सौ. यमुताई उद्यां (ता. १।७) मेलनें निघतों. पुण्याहून मुंबईला मेलनें निघूं. म्हणजे दादरवर उतरण्याला बरें पडेल. तुम्ही मेलला दादरवर यावें. तुम्ही मुंबईला असल्यामुळें इकडून बरोबर कोणाला आणीत नाहीं. तुमच्या Notes मला कशा

मिळणार ? तें शक्य दिसत नाहीं. दमा खूप झाला आहे. खीराकडे जाऊन उतरण्याची सोय आहे कीं नाहीं, चवकशी करून यावें. वझेच्याकडे गर्दी होईल. जागेची अडचण. कळावें. हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. ११५

श्री

चि. पुंडलीक यास अमळनेर, २२-७-४७

आ. वि.

आम्ही परवांच ता. २० रोजीं येथें पोचलों. मुंबईला फार वेळ नव्हतों. कोणालाहि भेटलों नाहीं. काल थोडा बाहेर फिरावयाला गेलों होतों. पाऊस नाहीं.

मिरजेहून श्री. रा. कृ. काळे (जोशी वाडा) याचें पत्र आलें आहे. त्यांनीं तुला ३।८।४७ ला मिरजेस पाठविणेबद्दल लिहिलें आहे. गीताधर्ममंडळाचा कांहीं कार्यक्रम आहे.

मोहन आज मुंबईला परत जात आहे. इकडील सर्व मंडळी क्षेम आहेत. माझी प्रकृति बरी आहे. कळावें, हा आशीर्वाद

गंगाधर देशपांडे

ता. क. :—तुमचें पत्र पोंचलें. काळांतील रिपोर्टासंबंधानें मी बोललोंच आहें. त्यापेक्षां केसरींतील छाटाछाटी केलेल्या रिपोर्टानें गैरसमज होणें स्वाभाविक आहे. माझ्या मनांतहि एक लेख लिहून माझीं मतें सविस्तर मांडावयाचें होतें. पण आतांच तसें केल्यास प्रकृतीवर परिणाम होण्याची भीति आहे. म्हणून मी तो मोह आवरीत आहे. तुम्ही वाटल्यास लिहावें. मी तुमच्याशीं पुष्कळ बोललों आहे.

## पत्र नं. ११६

श्री

अमळनेर ता. ८-९-१९४७

चि. पुंडलीकजी यास

आ. वि. पत्रें पोचली. हुदलीस M. P. पाटील यांची स्वारी आली होती, व त्यांची प्रभावळहि होती वगैरे हकीकत समजली. अण्णु गुरुजी, श्रीरंग वगैरे नव्हते हें कसें काय ? हुदलीला यावें असें त्यांना कदाचित् वाटलें नसेल. एकंदर कार्यक्रम वेळेवर व व्यवस्थित झाल्याचें समजून बरें वाटलें. त्यांच्या मनावर काय परिणाम झाला, समजणें कठीण आहे. माझ्या व मोहनच्या अनुपस्थितीमुळें भासणारें वैगुण्य तुम्ही व थडवींनीं भरून काढलें असावें.

माझी प्रकृति साधारण बरी आहे. परवांच्या दुखण्यांत जो अशक्तपणा आला आहे तो अद्यापि पूर्ण गेला नाहीं. विचारमंथन कमी झाल्यामुळें विश्रांति आहे. पुन Blood Pressure होऊं नये म्हणून काळजी घेत आहें. कोणत्याहि गोष्टीचा फार विचार करूं नये व वामन मल्हार यांनीं लिहिल्याप्रमाणें नाटकांत स्वतः पार्ट करण्यानें जो आनंद मिळतो तो नाटक पाहण्यांतहि मिळवतां येतो. या विचारानें वागण्याची संवय होऊं लागली आहे. त्यामुळें शीण कमी होतो. विशेष बोलावेंहि लागत नाहीं. सवडीप्रमाणें व वाचवेल तेवढें वाचीत असतों. सकाळीं दोनअडीच मैल फिरणें होतें. पावसामुळें एक दिवसच बाहेर गेलों नाहीं. पाऊस भरपूर झाला आहे. आतां उघाडी पाहिजे. एकंदरीत हवा मानवते. मंडळी चांगली असल्यामुळें परकेपणा वाटत नाहीं. प्रमिला व मुलें आहेतच. किती दिवस येथें राहावें हा विचारहि मधूनमधून येत नाहीं असें नाहीं. असो.

कुरुंदवाडकरांकडून मदत मिळाल्याचें कळलें. पण ही भिक्षावृत्ति किती दिवस चालेल व चालवणें इष्ट आहे? तुमच्या कामाचा M. P. वर कांहीं परिणाम झाला काय? त्यांचें मत अनुकूल झालें असल्यास सरकारांतून मदत मिळण्याला उपयोग होईल.

- श्रीमंत दादासाहेब व तात्यासाहेब कुरुंदवाडकर आपसांत क्षुल्लक गोष्टींबद्दल भांडतात. दोघेहि अल्पवयस्क आहत. या दोघांच्या भांडणामुळें अशा लोकांना फाजील महत्त्व येऊन संस्थान पेचांत येण्याचा संभव. हलक्या व स्वार्थी लोकांच्या कारवायांना संस्थान बळी पडेल अशी भीति आहे. तात्यासाहेबांची माझी ओळख नाहीं. पण मला भेटण्याची त्यांची इच्छा आहे असें मला जीवनरावांनीं लिहिलें आहे. जांबोटकर देसाई याचेमार्फत श्रीमंत तात्यासाहेबांचा निरोप होता. खरें काय समजत नाहीं. दोघाचें भांडण मिटावें अशी माझी फार इच्छा आहे. पुनः गांठ पडली तर सहज बोलणें काढण्याला हरकत नाहीं.

तिकडील पिकें वगैरे कशीं आहेत? पाऊस जास्ती म्हणून ओरड असेलच. बाकी विशेष नाहीं.

वर्ध्याला जाण्याचें मीं ठरवलें नाहीं. ठरल्यास कळवीनच. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. ११७

श्री

चि. पुंडलीकजी यास — अमळनेर २३-९-४७

आ. वि.

एक ऑपरेशन करूं असें डॉ. देशमुख मागे म्हणाले होते! तें ऑपरेशन काल डॉ. नानासाहेब म्हसकरांच्याकडून करून घेतलें. त्रास झाला नाहीं. टाके वगैरे काढण्याला ८-१० दिवस लागतील. तोंपर्यंत येथें रहावें लागणार.

परवां चढवी येथें आले होते. काल परत गेले. मोहनहि काल्च आला आहे. माझी प्रकृति बरी आहे. मुंबईला ऑपरेशन करून घेण्यापेक्षां येथें करून घेतलें हें एका अर्थी बरें झालें. सर्व सोयी आहेत. बाकी ठीक आहे. कळावें. हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

[पत्र नं. ११८,११९ :–पाकिस्तान व हिंदी संघ असे देशाचे दोन विभाग पडल्यानंतर, 'हिंदुमहासभा' आणि 'राष्ट्रीय स्वयंसेवक संघ' या संस्थांच्या आंदोलन व प्रवृत्ती संबंधानें आपण नव्यानें विचार करावयास पाहिजे असें ती. गंगाधररावांना वाटूं लागलें होतें. त्यावेळीं पू. श्री. काकासाहेब कालेलकर, किशोरलालजी मश्रूवाला, स्वामी आनंद, केदारनाथजी या गांधीजींच्या प्रभावळींतील अंतेवासी विचारकांशीं विचारविनिमय, त्यांच्या भेटी घेऊन व पत्रव्यवहारद्वारां ते करीत असत. गांधीजींच्या कानावर गंगाधररावांच्या मनांतील ही खळबळ गेली व त्यांनींही आपला अभिप्राय दिला. ही सर्व माहिती या दोन पत्रांमध्यें आहे. —पुंडलीकजी]

## पत्र नं. ११८

श्री

### दे. गंगाधरराव देशपांडे ह्यांचें हिंदुसंघटनेच्या प्रभावर विचारमंथन

राजकारणापासून अलिप्त अशा हिंदू संघटनेस महात्माजींनीं व्यक्त केलेला अनुकूल अभिप्राय.

#### नवा विचार करण्याची जरूरी

अलीकडे देशांत हिंदु-मुसलमानांमध्यें जे दंगे होऊं लागले आहेत त्यामुळें स्वसंरक्षणार्थ हिंदूंनीं काय करावें या प्रश्नाला महत्त्व आलें आहे. हिंदुसभा व राष्ट्रीय स्वयंसेवक संघ या संस्था हिंदुहिताचा पुरस्कार करणाऱ्या व हिंदूंचें संघटन करणाऱ्या आहेत. या संस्था जातीयतेनें भारल्या आहेत व त्यांच्यामध्यें राष्ट्रीयतेची व्यापक दृष्टि नाहीं, असें पुष्कळांना वाटतें. ही समजूत योग्य आहे कीं अयोग्य आहे, याची चर्चा मला येथें करावयाची नाहीं. अर्थात् दोन्ही बाजूंच्या साधकबाधक कारणांचाहि मी येथें विचार करणार नाहीं. या संस्था जातीयतेनें भारल्या असोत किंवा नसोत, स्वराज्य झाल्यानंतर आणि पाकिस्तान आणि हिंदी संघ असे देशाचे तुकडे पडल्यानंतर या संस्थांच्या आंदोलन व प्रवृत्तीसंबंधानें आपण नव्यानें विचार केला पाहिजे.

जातिनिरपेक्ष असलेल्या कॉंग्रेस संस्थेशीं निष्ठेनें राहून ज्यांनें आजवर राष्ट्रकार्य केलें आहे अशा प्रत्येक व्यक्तीला हिंदुसमाजाच्या रक्षणाकरितां विशेष प्रयत्न करण्याचे दिवस आले आहेत असें वाटूं लागलें आहे. संयुक्त प्रांतांतील कॉं. पुढारी व त्या प्रांताच्या विधिमंडळाचे अध्यक्ष बाबू पुरुषोत्तमदास टंडन यांनीं हिंदु संरक्षक दल म्हणून एक नवीन संस्था काढली आहे, हें प्रसिद्ध आहे. याखेरीज हल्लींच्या परिस्थितींत कॉंग्रेस सरकारांनीं आपला राज्यकारभार फार सावधगिरीनें चालविला पाहिजे. कोण राष्ट्रीय व कोण अराष्ट्रीय याची कसून चौकशी करून आपला गाडा चालविला पाहिजे असें म्हणणारे लोकहि कॉंग्रेसमध्यें पुष्कळच आहे. द्विराष्ट्रवादी मुसलमान जोपर्यंत हिंदी संघांत आहेत तोंपर्यंत या सावधगिरीच्या सूचनेला महत्त्व आहे यांत शंका नाहीं.

आपल्या देशांत हल्लीं अनेक विचारांचे प्रवाह चालू आहेत. कित्येकांना 'धर्म' या शब्दाचें इतकें वावडें आहे कीं संस्थानिक, जमीनदार, मांडवलवाले, व्यापारी व कारकुनी पेशावर उदरनिर्वाह करणारे नोकर आपल्या विशिष्ट व अन्यायमूलक हित-संबंधाचें रक्षण करण्याकरितां धर्माचें भूत उठवीत आहेत, असा उघड आरोप ते करीत आहेत.

पंडितजींचें मत : पंडित जवाहरलाल नेहरू यांच्यावर जातीयतेचा आरोप कोणी करणार नाहीं. राज्यकारभार लोकशाहीला धरून चालणार व कोणत्याहि जातीचा व धर्माचा संबंध त्यांत आम्ही येऊं देणार नाहीं असें ते म्हणतात, (so far as India is concerned we have very clearly stated both as a Govt. & otherwise that we can not think of any state which might be called a communal state.) हें बरोबर आहे. पण त्याचवेळीं ते असेंहि सांगतात कीं 'Naturally, in such a state the predominant cultural outlook will be governed by the great majority of the population.'—अशा राज्यव्यवस्थेंत स्वाभाविकपणेंच बहुसंख्य जनतेच्या संस्कृतीची छाप राहील.

अर्थात् 'बहुसंख्य जनता' ही हिंदूंचीच आहे व त्यांच्या संस्कृतीला महत्त्व रहाणार. पंडितजी धर्म शब्दाच्या ऐवजीं संस्कृति हा शब्द वापरतात. पण संस्कृतींत धर्मभावना येणार किंवा धर्मांत संस्कृति येणार. धर्म व संस्कृति अगदीं अलग करणें कठीण आहे.

अशा गोंधळाच्या परिस्थितींत मीं श्री. काकासाहेब कालेलकर व माझे इतर स्नेही यांच्याशीं कांहीं विचारविनिमय केला. काकासाहेबांनीं आमच्यामध्यें झालेल्या चर्चेचा कांहीं भाग महात्मा गांधींना कळविला. महात्मा गांधी हे स्वतःस हिंदु म्हणवून घेतात हें प्रसिद्ध आहे. तेव्हां हिंदु संघटनेच्या बाबतींत त्यांच्या मताला विशेष महत्त्व आहे.

महात्माजींचा अभिप्राय : काकासाहेबांना आलेल्या पत्रांत महात्माजींचा अभिप्राय उत्तरादाखल थोडक्यांत आला आहे. त्याचेंच शब्दशः मराठी भाषांतर खालील-प्रमाणें आहे:—

"हिंदु संघटनाची तर नेहमींच आवश्यकता आहे. परंतु हिंदु संघटन कृपण नासवें. अन्यधर्मांचा विरोध करणारें तें नसावें. हिंदुधर्म सुधारण्याकडे आणि विकसित करण्याकडे त्याचा उपयोग व्हावा. राजकारणाशीं त्याचा संबंध नसावा. अशा प्रकारचें हिंदुसंघटन कोणाच्याहि विरोधी नसणार, विरोधी होऊं शकणार नाहीं. आज तसें आहे."

"हें सर्व श्री. गंगाधररावांच्या ध्यानात येईल, त्यांना पटेल तर हिंदुसंघटनाचा जें (खरोखर) हवें आहे तें ते देऊं शकतील."

वरील मजकूर गांधीजींच्या सेक्रेटरीच्या पत्रांत आला आहे, व तो थोडक्यांत मांडलेला आहे. हें लक्षांत घेऊनच आपण विचार केला पाहिजे.

एक गोष्ट निर्विवाद आहे. हिंदुसंघटन मुळींच नसावें असा महात्माजींचा हेतु नाहीं. फक्त त्यांच्या दोन अटी आहेत. (१) दुसऱ्या धर्मांशीं या संघटनेचा विरोध नसावा. व (२) राजकारणाशीं तिचा संबंध नसावा. या दोन अटी पाळून हिंदुधर्म सुधारण्याकरितां व विकसित करण्याकरितां संघटनेचा उपयोग व्हावा व तो अवश्य आहे.

लोकशाहीचें तत्त्व आज सर्वांना मान्य आहे. राष्ट्राविषयीं निष्ठा बाळगणाऱ्या सर्वांना नागरिक हक्क राहतील. ज्यांना अशी निष्ठा नाहीं त्यांना हक्क मिळणार नाहींत. अशा राज्यसंस्थेंत बहुसंख्य हिंदूंच्या संस्कृतीचा प्रभाव असणेंहि स्वाभाविक आहे, हें पंडितजींचें म्हणणें मान्य केल्यास हिंदुसंघटनेच्या प्रश्नाला बुजण्यासारखें कांहीं आहे असें वाटावयास नको. मुसलमानांसारख्या अल्पसंख्याकांच्या मुर्वतीखातर बहुसंख्याकांच्या संस्कृतीला धोका येऊं देऊं नये एवढेंच बहुसंख्य हिंदूंचें म्हणणें आहे. अशा प्रकारें विचार केल्यास आज माजलेला घोटाळा बराच दूर होईल व हिंदु संघटनेला योग्य वळण मिळेल.

गंगाधरराव देशपांडे

पत्र नं. ११९

श्री

वेळगांव, ता. २१-११-४७

पू. श्री. किशोरलालजींच्या सेवेसी.

कृ. सा. न. वि. वि. अलीकडे हिंदु संघटनेसंबंधानें माझ्या मनांत कांहीं विचार येऊं लागले आहेत. त्याबाबतींत मी पू. नाथजी, काकासाहेब कालेलकर, स्वामी आनंद वगैरेंशीं थोडा विचारविनिमय केला आहे, हें स्वामींनीं आपल्याला कळवलेंच आहे. स्वामींचें पत्र पोचलें.

हिंदु समाज अनेक वर्षांपासून अनेक कारणांमुळें विघटित झाला आहे. जातिभेद, उच्चनीच भाव, स्पृश्यास्पृश्यभाव इ. अनेक दोष धर्माच्या नांवाखालीं हिंदुसमाजांत रूढ झाले आहेत. त्यामुळें हा समाज शरिरानें, मनानें, शीलानें दुर्बल झाला आहे. वैयक्तिक सद्गुण आहेत तथापि सामुदायिक रीत्या विचार केल्यास मी म्हणतों त्याप्रमाणें स्थिति आहे असें दिसून येईल.

*तथापि हिंदुत्वाची भावना सुदैवानें नष्ट झाली नाहीं. कांहीं अपवाद* सोडले तरी समाजांतील हिंदु म्हणून संबोधल्या जाणाऱ्या प्रत्येक व्यक्तीला मी हिंदु आहे याची जाणीव आहे. हिंदु या शब्दांत मी शीख, जैन इ. ज्यांचा धर्म या देशांतच स्थापला गेला त्यांचा समावेश करतों. एवढ्यापुरती सावरकरांनीं केलेली व्याख्या मला मान्य आहे.

विघटनेमुळें हिंदुसमाज दुर्बल झाला आहे याची जाणीव प्रायः सर्व मुसलमानांना आहे. 'सर्व मुसलमान' हे शब्द मी विचारपूर्वक वापरले आहेत. याचा अर्थ अपवादात्मक कोणी नसतील असें नाहीं, तथापि सामाजिक दृष्टया त्यांचा प्रभाव मुसलमान जमातीवर नाहीं असा अनुभव गेल्या २५-३० वर्षांत आला आहे. आज आपल्याला व्यक्तिगत विचार करावयाचा नसून सामाजिक दृष्टया विचार करावयाचा आहे.

कोणीहि मुसलमान घेतला तरी इस्लामी धर्माबद्दल त्याला आपुलकी वाटणें स्वाभाविक आहे व तशी त्याला वाटतेहि. त्या धर्मांत पुष्कळ उच्च व उदार तत्त्वें आहेत म्हणून त्याकडे सद्भावनेनें पाहिलें पाहिजे हें मान्य आहे. पण, त्याबरोबरच दुसऱ्या धर्मांतील लोकांना बाटविणें हें धर्मकृत्य आहे असें त्यांच्या धर्माचें मुख्य सूत्र आहे. जबरदस्तीनें बाटविणें किंवा फसवून बाटविणें या प्रकारांना त्या धर्मांत मान्यता नसेल. पण प्रत्यक्ष आचार मुसलमानी धर्म स्थापनेपासून काय चालला आहे याची साक्ष इतिहास देत आहे. हिंदुस्थानांत बाटवण्याचा प्रकार पद्धतशीर चालू आहे. *या संबंधांत* हसन निझामी नांवाच्या गृहस्थानें एक पुस्तक प्रसिद्ध केलें आहे याची माहिती आपल्याला असेलच. या 'पवित्र कर्तव्याला' द्रव्यसाहाय्यहि मुबलक मिळत असतें. विशेष आश्चर्याची गोष्ट म्हणजे हा प्रकार बंद करण्याकरितां कोणीहि मुसलमान संघटित रीत्या प्रयत्न करीत नाहीं. वैयक्तिक रीत्या केव्हां तरी कोठें तरी कोणीतरी कांहीं उद्गार काढीत असतील. पण त्याचा उपयोग होत नाहीं. उलट विरुद्ध प्रचार मात्र सरसहा सार्वत्रिक सारखा चालू आहे व त्याचा परिणामहि प्रत्यक्ष अनुभवाला येत आहे.

यांतच राजकारणाची भर पडली. अल्पसंख्यांक म्हणून त्यांना खास हक्क मिळूं लागले. बहुसंख्यांक असलेल्या प्रांतांत त्यांचें वर्चस्व मान्य होऊं लागलें. याचा परिणाम थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे शुद्ध राष्ट्रीयत्वाचा लोप झाला व त्यांच्यामध्यें आक्रमणाची बुद्धि वाढली. त्याचा प्रतिबंध करण्याचे अनेक प्रयत्न झाले. पण पदरांत कांहीं पडलें नाहीं.

या परिस्थितींत फाळणी पत्करावी लागली. यांत राष्ट्रीयत्व कोठें राहिलें? पण एवढ्यानें मुसलमानांची भूक शमली नाहीं, हें स्पष्ट आहे. आचार्य कृपलानींनीं या

वृत्तीचें स्पष्टीकरण नुकतेंच केलें आहे. मुसलमान हा मुसलमान म्हणून अराष्ट्रीय समजणें हें योग्य नाहीं. पण हें निवडण्याचें काम कठीण झालें आहे. 'उडदा-माजीं काळेगोरे' अशी स्थिति झाली आहे. हिंदूंमध्यें विश्वासघातकी नाहींत, अराष्ट्रीय नाहींत असें नाहीं. सामाजिक अशी हिंदूंची संघटना नसल्यामुळें पंचम-स्तंभीपणा हा दोष आपल्यामध्यें १०००-१२०० वर्षांपासून आला आहे. पण आजच्या प्रत्यक्ष परिस्थितीकडे पाहतां हा दोष नाहींसा करण्याला अनुकूल काल आला आहे असें मला वाटतें, व त्याकरितांच पायाशुद्ध हिंदुसंघटनेची आवश्यकता आहे. अशा संघटनेनें पारशी, यहुदी, ख्रिस्ती वगैरे अल्पसंख्याकांना वाईट वाटण्याचें मुळींच कारण नाहीं. त्यांनीं आपल्या समाजाच्या संघटना केल्याच आहेत. त्यांतून आम्ही आमच्या समाजांतील रूढ असलेले रोटीबेटी व्यवहाराचे निर्बंध काढण्याचा प्रयत्न केल्यास त्यांना भीति कां वाटावी? त्यांनादेखील या इस्लामी आक्रमणाची भीति वाटत नाहीं असें नाहीं. इतर धर्मांतील लोकांशीं बेटीव्यवहार करून मुसलमान आपल्या धर्माची विवाहितांना दीक्षा देतातच कीं नाहीं?

आज दुर्दैवी घटनेमुळें फाळणी झाली आहे. पाकिस्तान हें मुसलमानांचें झालें आहे, व तें तसेंच राहणार आहे. तेथील मुसलमानांचें मतपरिवर्तन होऊन पाकिस्तान सर्वांचें ही भावना उत्पन्न होणें प्रस्तुतच्या व्यावहारिक राजकारणांत शक्य दिसत नाहीं. इतकेंच नव्हे तर पाकिस्तानी मुसलमानांच्या आक्रमक वृत्तीला आळा घालणें हें कठीण आहे. जोंपर्यंत हिंदुसमाज आहे तसाच विघटित राहील तोंपर्यंत मुसलमानांच्या या आक्रमक वृत्तीला उत्तेजनच मिळत जाईल. संघटना कशी करावी हें आपल्यासारख्यांचें काम आहे. जातीय भावना, व त्यांमुळें उत्पन्न होणाऱ्या उच्चनीच कल्पना, मूर्तीमुळें उत्पन्न होणारा अभिमान वगैरे अनेक कारणें नाहींशीं झालींच पाहिजेत. बहुजन समाज त्यामुळें बिथरेल हें खरें आहे. पण, केव्हां तरी हें काम करावेंच लागणार. अस्पृश्यता घालवण्याचें काम महात्माजींनीं केलेंच कीं नाहीं? आतां जातिभेदावरहि हल्ला करण्यास त्यांनीं सुरवात केली आहे.

आज काँग्रेसनें अहिंसेचा मार्ग सोडला आहे. बोलण्यांत काँग्रेस पुढारी कांहींही बोलोत. पण प्रत्यक्ष कृतींत सैन्याची वाढ, शस्त्रास्त्रांचे कारखाने काढणें, सार्वत्रिक सक्तीचें लष्करी शिक्षण (conscription) हेच विषय प्रामुख्यानें काँग्रेस सरकारापुढें आहेत. या कार्यक्रमाला काँग्रेस सोडील असें वाटत नाहीं. 'माझें कोणी ऐकत नाहीं,' असें महात्माजीच म्हणूं लागले आहेत.

हिंदुमहासभेला जातीय म्हणावयाचें व त्या संस्थेचे एक प्रमुख डॉ. शामाप्रसाद मुकर्जी यांना मंत्रिमंडळांत घ्यावयाचें हें विसंगत नाही काय? माझ्यासारख्यांचा देखील गोंधळ होतो.

रा. स्व. से. सं. चे कांहीं लोक निवडणुकींत भाग घेत होते म्हणून ती संस्था राजकीय आहे असें म्हणतां येणार नाहीं. या संघाचे लोक आपल्याला मदत करीत

नाहींत असें हिंदुमहासभेचे उमेदवार तक्रार करीत होते हें मला माहीत आहे.

पंजाबकडे संघाच्या लोकांनीं केवळ Rescue चें काम केलें असें मी म्हणत नाहीं. संघांतील कांहीं लोकांच्या हातीं हत्यारें होतीं. त्याचप्रमाणें हिंदूंच्या हातींहि हत्यारें होतीं. तिकडील परिस्थिति पाहतां हातांत हत्यारें असून त्यांचा उपयोग न करणें हें काम जवळजवळ अशक्य होतें. ज्या संघेतर हिंदूंनीं हत्यारें वापरून मुसलमानांचा प्रतिकार आपल्या शक्तीप्रमाणें व बुद्धीप्रमाणें केला त्यांत कॉंग्रेसचे लोक नव्हतेच असें खात्रीपूर्वक सांगतां येईल काय? त्यांतून संघानें कॉंग्रेसप्रमाणें अहिंसा मान्य केली नाहीं हेंहि लक्षांत घेतलें पाहिजे. संघांतील लोकांनीं हिंदूंवर हत्यार उपसलें नाहीं. केंद्रवर्ती सत्ता काबीज करण्याच्या संघाच्या आकांक्षा होत्या या आरोपाला पुरावा आहे काय? केंद्रवर्ती सत्ता लोकांचें संरक्षण करूं शकत नाहीं म्हणून लोकांनीं आपापलें संरक्षण करून घेण्याला समर्थ झालें पाहिजे असें सरदार बोलले, इतरहि बोलतात. याचा अर्थ लोकांनीं काय करावा व या स्थितींत लोकांनीं कसें वागावें?

एखाद्या संस्थेमध्यें हिंदुस्थान सारख्या अफाट देशांत अनेक लोक येतात. त्या सर्वांवर नियंत्रण करणें संस्थेला कठीण होतें. वैयक्तिक कोणाचें आचरण संस्थेच्या धोरणाला सोडून झाल्यास संस्थेला जबाबदार धरतां येईल काय? कॉंग्रेसला हीच कसोटी लावल्यास काय होईल? मागच्या सर्व चळवळींचा इतिहास काय सांगतो? १९४२ च्या चळवळीनें तर कहर केला! मी मी म्हणणारे कसे त्यांत गुरफटले हें आपल्याला माहीतच आहे. परिस्थिति सावरतां सावरतां पू. बापूजींना काय काय करावें लागलें! इतकें करूनहि त्यांना यश आलें नाहीं तें नाहींच!

मला महासभेला किंवा रा. स्व. संघाला प्रमाणपत्र द्यावयाचें नाहीं. महासभेला मी विरोध करीतच आलों आहें, व आजदेखील मी विरोध करीन. पण, मुसलमानांच्या बाबतींत कॉंग्रेसचें धोरण मुसल्मानांना खुष करण्याचें होतें व त्याचा गैरफायदा मुसल्मानांनीं घेतला ही गोष्ट कांहीं खोटी नाहीं. हिंदुसभेचा हाच दावा आहे.

संघांतील कांहीं कार्यकर्त्यांशीं मी बोललों आहें. आज तरी राजकारणापासून अलिप्त राहाण्यांतच आपली संघटना होईल असें त्याना वाटतें. अशा स्थितींत त्यांना सहानुभूतीनें वागवल्यास त्यांच्यांतील दोष घालवणें शक्य आहे असें मला वाटतें. तसा प्रयत्न करण्यांत कांहीं दोष आहे असें मला वाटत नाहीं.

आज प्रत्येक पक्ष आपल्या अभिनिवेशानें भारलेला आहे. सर्वत्र विस्कळितपणा आला आहे. कॉंग्रेस कमिट्यांत काय चाललें आहे हें पाहिलें म्हणजे आतां या कमिट्या बंद करण्याची वेळ आली आहे असें वाटूं लागतें. मी मंत्रिमंडळाचा उल्लेख मुद्दाम करीत नाहीं.

फाळणीमुळें देशाचे तुकडे पडून एक मुसलमानांचा व एक हिंदूंचा असा समाज झाला आहे. हिंदूंच्या भागांतील मुसलमानांवर विश्वास ठेवून राज्यकारभार चालवणें धोक्याचें आहे. सैन्य, पोलीस यांच्या मदतीनेंच देशांत शांतता राखणें व आक्रमणाचा

प्रतिकार करण्याचा प्रसंग (आपत्ति!) आला आहे. ही वस्तुस्थिति आहे. अशावेळीं हिंदुसमाज एका सूत्रांत आणणेंच शहाणपणाचें होणार आहे व श्री. धनंजयराव गाडगीळ सारख्या विचारवंताला देखील हिंदुत्व हेंच Cohesive force यापुढें राहील असें वाटूं लागलें आहे. सरदारांचें धोरण अशाच प्रकारचें आहे असें म्हणतात. मुसल्मानांबद्दल उत्पन्न झालेला संशय व अविश्वास त्यांनींच आपल्या वर्तनानें दूर केला पाहिजे. तोंडानें ते कांहीं म्हणत असले तरी पाकिस्तानाबद्दल त्यांना वाटत असलेली आत्मीयता जाणें कठीण आहे. या स्थितींत राज्यकारभार चालवावयाचा आहे. हें काम फारच कठीण आहे. हिंदूंच्या शुद्ध संघटनेनें हें काम सोपें होईल. राज्यकारभारांत उदार तत्त्वाच्या नांवानें भोंगळपणा आला तर राज्य कोल्मंडून पडेल.

महात्माजींच्या तत्त्वाला अनुसरून तरी चालावें किंवा सावधगिरीनें व धूर्तपणानें तरी वागावें. तिसरा मार्ग नाहीं. महात्माजींचा मार्ग सुटला आहे. पुढें जास्ती जास्ती सुटत जाणार आहे.

या सर्व गोष्टींचा विचार करण्याकरितां देशांतील सत्तालोलुपता नसलेल्या माणसांनीं एकत्र येऊन मार्गदर्शन करण्याची आवश्यकता उत्पन्न झाली आहे. तसें न होतां प्रत्येक पक्ष आपापल्या अभिनिवेशानें वागूं लागल्यास फाटाफूट होईल व मिळालेलें स्वातंत्र्यदेखील टिकवणें कठीण होईल अशी भीति वाटते.

पत्र लिहितांना माझ्या मनांत जसे विचार आले तसे लिहिले आहेत. त्यांत सुसंगतता नाहीं. आपणच सर्व जुळवून घेऊन विचार करावा.

प्रकृति साधारण बरी आहे. आपली प्रकृति नेहमींप्रमाणेंच असल्याचें समजलें. जपून असावें.

स्वामी आनंद मुंबईला गेले असतील म्हणून आपल्या नांवेंच हें पत्र लिहीत आहें. त्यांचेकडे आपण तें पाठवावें. आपल्या भेटीची अपेक्षा तर आहेच. श्री. माईंना नमस्कार. कळावें, लोभ असावा ही वि.

गंगाधर देशपांडे

ता. क. :—हिंदु महासभेची एक तरी मागणी अराष्ट्रीय आहे हें दाखवून द्यावें अशा प्रकारचें आव्हान भोपटकरांनीं केलें आहे.

[पत्र नं. १२० व १२१ : जयपूर काँग्रेसच्या वेळीं खादी प्रदर्शनाच्या प्रचार व संघटनेचें काम करण्यास आगाऊ एक महिना मी जयपूरला जाऊन राहिलो होतो. त्यावेळीं ती. गंगाधरराव यांनीं मला हीं दोन पत्रें लिहिलेलीं आहेत. —पुंडलीकजी]

पत्र नं. १२०

श्री

बेळगांव, ता. ७-११-४८

चि. पुंडलीकजी यांस,

आ. वि. ता. ५ चें पत्र पोचलें. मजकूर साधारणपणें समजला. समक्ष भेटींत जास्ती स्पष्टीकरण होईल. हल्लींच्या वातावरणांत अशा प्रकारचें काम करणाऱ्या काहीं व्यक्ति निरुपयोगी नाहींत असें नाहीं. पण वातावरण प्रतिकूल असावें असें मला वाटतें. तोंडानें पुष्कळ पुढारी कांहीं बोलत असले तरी त्यांची श्रद्धा पारखून पाहिल्यास तुम्हीं लिहिलेल्या कामाला प्रतिकूलच आहे. इतर राष्ट्रांप्रमाणेंच आमचें राष्ट्र होईल अशी भीति वाटूं लागली आहे. जगांतील वातावरणांतच बदल झाला तर त्याचा परिणाम आमच्यावरहि होईल. तूर्त तर मोठ्या प्रमाणावर औद्योगीकरण, यंत्रसाहाय्य, सैन्यभरती, वगैरे राष्ट्रीय कामेंच डोळ्यासमोर आहेत. तुमच्यासारखे कांहीं लोक श्रद्धेनें धडपडत आहेत. परमेश्वरानें त्यांना यश द्यावें हीच माझ्यासारख्याची मागणी. असो!

हुदलीला तुम्ही म्हणतां तसली जमीन मिळणें कठीण आहे. नव्या कुळ-कायद्यानें जमीनदारानें कुळालाच जमीन विकली पाहिजे. तुम्ही म्हणतां त्या टापूंत जमीनदारांच्या जमिनी किती असतील हें मला माहीत नाहीं.

जीवनराव गोसेवेंत आनंद घेत आहेत. माझ्याकडे देखील फारसे येत नाहींत. मलाहि एकट्याला स्वस्थ शांतपणें बसण्याची संवय झाली आहे. निसर्गाचीच ही योजना असते.

सकाळीं तासभर फिरून येतों. मग घरींच असतों. बहुतकरून कोणी येत नाहींत. आले तर जीवनराव, हणमंतराव वगैरे. एखादा कोणी स्वयंपाकाला मिळाल्यास कुमरीला जाण्याचा विचार आहे.

मधूनमधून अद्यापि थोडाथोडा पाऊस पडत आहे. आतां पाऊस नको आहे.

सरदारांची मुंबईस भेट झाली. खूप कडकडून उत्तर हिंदुस्थानच्या पद्धतीप्रमाणें त्यांनीं मला मिठी मारली. जातांना बाहेरपर्यंत पोचवावयाला आले. त्यांच्या जन्मदिवशीं अभिनंदनपर मीं एक तार पाठविली होती. उत्तरहि लगेच आलें.

कुरुंदवाडकर, रामदुर्गकर व मिरजेचे युवराज मुंबईस भेटले होते. त्यांची इच्छा सरदारांकडे मीं त्यांना घेऊन जावें व त्यांच्याबद्दल बोलावें अशी होती. पण मला तें करावें असें वाटलें नाहीं. खाजगी अशा प्रकारचीं कामें करण्यालाहि मर्यादा आहे.

तूर्त अण्णासाहेब लठ्ठे प्रकरण इकडे गाजत आहे. कानडी मंडळींना आनंदाच्या उकळ्या फुटत आहेत! लठ्ठयांनीं कोल्हापूर सोडावें असें मीं त्यांना पूर्वीच सुचवलें होतें. पण, तें त्यांना पटलें नाहीं. प्रजा विरुद्ध, मुंबई व दिल्ली सरकार विरुद्ध, प्रशासक विरुद्ध अशा

वातावरणांत केवळ महाराजांवर अवलंबून रहाणें योग्य नाहीं असें मला वाटत होतें. महाराज तरी काय? असो.

माझी प्रकृति बरी आहे. काकासाहेब कालेलकर यांचें पत्र नाही. माझ्याशीं पत्रव्यवहार त्यांनीं बंद केला आहे असें दिसतें. असें कां व्हावें? याचा मी विचार करीत आहे. घरांकडे सर्व क्षेम आहे. कळावें हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १२१

श्री

बेळगांव, ता. ११-१२-४८

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि. तुमचें ता. ९ चें पत्र पोचलें. प्रकृतीला संभाळून असावें. थंडी फार व कामहि फार. म्हणून मुद्दाम सुचवीत आहें. इकडून जयपूरला कोण जाणार आहेत मला माहीत नाहीं. जीवनराव जाणार नाहींत. आजच श्रीकृष्णदास गांधी यांची प्रदर्शनाला येण्याबद्दल आमंत्रणपत्रिका आली. मला येणें शक्य नाहीं. मोहन, प्रमिला व मुलें सर्व अमळनेरला गेलीं आहेत. घरीं यमुताई आहे. कृष्णदासांना नमस्कार सांगावा. प्रदर्शनांत व कॅाँग्रेस अधिवेशनांत कांहीं विशेष असल्यास कळवावें. प्रकृति बरी आहे. बाकी सर्व ठीक आहे. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १२२

श्री

बेळगांव, ता. १७-४-४९

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि. ता. २५ ला येण्याबद्दल श्रीमंत दादासाहेब कुरुंदवाडकर यांचें पत्र आलें आहे. पण त्याच दिवशीं राजेंद्रबाबू येथें येणार आहेत. संधि मिळाल्यास त्यांना भेटण्याची इच्छा आहे. तेव्हां त्या दिवशीं निघणें होणार नाहीं. पुढें ४-५ दिवसांत वसुंधरा व सदाशिवराव वझे येणार आहेत. ५-७ दिवस तरी ते राहतील. त्यावेळीं मी येथें असणें बरें. म्हणून ता. २५ ला मला जातां येईल असें वाटत नाहीं. याकरितां तूं मुंबईचें काम झाल्यानंतर इकडे निघून ये. माझ्याकरितां तिकडे राहण्याची आवश्यकता नाहीं.

आज पहाटेला डॉ. याळगी, विमल, रमाक्का वगैरे विजापुरला गेले.

डॉ. वझेना तूं सवड झाल्यास भेटून ये. त्यांची परीक्षा उद्यांपासून आहे. भाऊ (हुईलगोळ) ला पाहून ये. डॉ. जोशी यांच्याकडे तो आहे. ते माटुंग्यावर रुईया कॉलेजजवळच राहतात.

पुण्याला गेलास तर मधूच्या बायकोला भेटून तिची प्रकृति पाहून ये. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १२३

श्री वेळगांव, ता. ५-५-४१

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि. चिठी पोचली.

श्रीमंत तात्यासाहेब, राजेसाहेब मिरज, यांना मीं चिठी द्यावी असें मला वाटत नाहीं. माझा व त्यांचा अद्यापि तितका विशेष परिचय नाहीं व श्री. वखले यांनींहि त्या बाबतींत तशी कांहीं आशा मला दाखवली नाहीं. तेव्हां विनाकारण उपद्व्याप नको.

मी आचार्य भागवतांचें व्याख्यान वाचीन. विचारप्रवर्तक मांडणी करण्याची त्यांची प्रतिपादनशैली मला आवडते.

डॉ. वझेच्या मनांत इंग्लंडला जाण्याचें आहे. जानेवारींत परीक्षा आहे. दहा हजारपर्यंत खर्च येईल. वसुंधरेच्या मनांत मुंबईला धंदा सुरू करावा असें आहे. अर्थात् त्याला ३-४ महिने जातील. तिला प्राथमिक खर्च म्हणून पांचसहा हजार तरी लागतील. इतकी रक्कम कशी उभी करावी हा प्रश्न आहे. कोणी कर्ज म्हणून दिल्यास त्यांचें काम होईल. एकाकडून मिळाले नाहींत तरी ३-४ लोकांकडून मिळाल्यास त्यांना उपयोग होईल. सरदार प्रतापसिह, अथवा घोरगांवकर कांहीं कर्ज देतील काय पहा! दुरून डोंगर दिसतात व पास होतील. मीहि शक्य तो प्रयत्न करीत आहें. पण माझ्या प्रकृतीमुळें मी हैराण झालों आहें. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १२४

श्री हुदली, ता. ५-६-४१

सी. गंगाधरराव यांचे सेवेसी

कृ. शि. सा. न. वि. वि. आपण कार्यक्रमास आज याल असें मी मानून चाललों आहें. प्रकृति बरी असल्यास अवश्य यावें. फायनम ९॥ वाजतां सकाळीं ठेवलेला आहे. भोजनास आपण परत वेळेवर पोहोंचूं शकाल.

चि. सौ. प्रमिला व मोहनराव आणि मुलेंहि येतील तर मला बरें वाटेल. त्यांनाहि मीं कळविलें आहेच.

कळावें, ही विज्ञापना.

आपला नम्र
पुंडलीकजी

ता. क. :—काल सायंकाळीं बडवी आले आहेत.

उत्तरीं

आ. वि.

काल रात्रीपासून प्रकृति जास्ती बिघडल्यामुळें मी रात्रीनें येईनच असें वाटत नाहीं. तरी तुमचा आग्रह माझ्यापुढें आहे. लोकांना भेटण्याची इच्छाहि आहे. फसें जुळतें पाहतों.

आजच्या कार्यांत आपली निष्ठा असेल असें मी गृहीत धरीत आहें. निष्ठेचें महत्त्व तुम्हांला मी सांगावें असें नाहीं. तुमच्या कार्याची हकीकत ऐकून मला आनंद होत आहे. परमेश्वरानें तुम्हांला पुष्कळ आयुष्य द्यावें व तुमचेकडून अशीच सेवा घ्यावी, हीच प्रार्थना.

तिकडे येण्याचा प्रयत्न करीत आहें. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १२५

श्री

अमळनेर, ता. १३-७-४९

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि. श्री. बाळूभाईचें पत्र आल्यावरून तूं धुळ्याला निघाल्याचें समजलें. इकडे २।४ दिवस राहून गेला असतास तर बरें झालें असतें. आतां माझी प्रकृति बरी असल्याचें बाळूभाईना कळवावें. माझ्या प्रकृतींत फार हळूहळू सुधारणा होत आहे. अनेक कामें हातीं घेऊन धडपड करणें आतां तुला दतक्यांत झेपणार नाहीं, व तें बरेंहि नाहीं. तुझी प्रकृति बरी आहे असें कळल्यानंतर पुनः लिहीन. तिकडे पाऊस नाहीं असें दिसतें. येथेंहि अगदीं थोडा पडला. तेवढ्यानेंहि पिकाला बरें झालें असें म्हणतात. प्रकृति सांभाळून रहा. उत्तर लिही. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १२६

श्री

अमळनेर, ता. २०-७-४९

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि. पत्र पोचलें. यापूर्वी मी एक कार्ड लिहिलें होतें, पोचलें असेलच. तुमची प्रकृति बरी नाहीं; म्हणून इकडे तिकडे धांवपळ करून दगदग करून घेऊं नये. विश्रांति घ्यावी. 'पुंडलीक' पुस्तकाला प्रस्तावना काकासाहेबांकडून लिहून घ्यावी. ते हल्लीं मुंबईला असावेत. त्यांचा मुंबईचा पत्ता कळवा. मीहि त्यांना प्रस्तावना लिहिण्याबद्दल कळवीन. माझी प्रकृति सुधारत आहे. पण बसून लिहवत नाहीं. तिकडे पाऊस बराच कमी दिसतो. पिकें कशीं आहेत ? आप्पा खाडिलकरांकडून पुस्तक आजच आलें, पोंच त्यांना कळवली आहे. हुदलीच्या कामाची नीट व्यवस्था करा. Trust वगैरे करून ठेवा. भाडेपत्र वकीलांच्या समतीनें लिहून घ्या. पुढें तक्रारी नकोत. घरांत आतां फक्त चारच माणसें आहेत. बाकी सर्व पांगली आहेत. त्यामुळें घर ओकें ओकें वाटतें. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १२७

श्री

चि. पुंडलीकजी यांस

अमळनेर, ता. २६-७-४९

आ. वि.

पत्र पोचलें. अथणीला तुम्ही कॉं. क. च्या सभेला जाण्याची आवश्यकता नव्हती. कमिटीच्या सभेत तुम्ही भाषण करण्याची तर मुळींच जरुरी नव्हती. ज्याचें भाषण व्हावयाचें त्याच्याविषयीं आदर असला तर काहीं उपयोग होण्याचा संभव. तसें नसलें तर बाष्कळपणा अंगीं चिकटावयाचाच. 'पुंडलीक' पुस्तकाला प्रस्तावना लिहिण्याचा प्रयत्न केला. साधत नाहीं. लिहिणें कठीण वाटतें. काकासाहेबांनीं-ते फार जवळचे म्हणून-प्रस्तावना लिहूं नये असें वाटत असलें तर आणखी कोणाकडून तरी लिहून घ्यावी हें बरें. आपला व माझा संबंध इतका निकटचा आहे कीं, मला प्रस्तावना लिहितां येणार नाहीं. प्रकृति साधारण बरी आहे. वयाचा विरोध आहे.

ता. ११।८ ला सदाशिवरावांनीं निघण्याचा बेत केला आहे असें वसुंधराचें पत्र आहे. त्यावेळीं त्यांना पोचवून पुढें तिकडे येईन. काय होतें पहावें. आज चि. जयंतला पत्र लिहीत आहें. इकडील सर्व क्षेम आहे. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

ता. क. :—पिकापुरता तरी पाऊस झाला आहे काय ? इकडे बरें आहे.

## पत्र नं. १२९

श्री अमळनेर, ११-८-४९

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि. तुमचें चि. जयंत बाळचें वर्णन वाचून लवकर येऊन त्याला भेटावें असें मला वाटूं लागलें आहे. हूडपणा चांगला पण मर्यादेंत असेपर्यंतच. द्वाडपणांत रुपांतर होऊं नये. जपलें पाहिजे. सदाशिवराव बक्षे येथें येऊन मला भेटून गेले. मुंबईला जाण्याचा माझा विचार नाहीं. तुम्ही राजेंद्रबाबूंना 'पुंडलीक'च्या प्रस्तावनेबद्दल लिहीत आहां हें फार चांगलें आहे. त्याचेकडून चार ओळी आल्या तर तुमचें काम होईल— इतरांनाहि त्रास नाहीं! गेल्या महिन्यांतील प्रुफें मीं वाचलीं नाहींत.

काल श्री. गुलझारीलालजी नंदा येथें आले होते. मला भेटावयाला घरीं आले होते. सप्टेंबरमध्यें हुदलीला येण्याचा त्यांचा विचार दिसतो. हें आकर्षण तुमच्यामुळें असावें! तुमचा व त्यांचा संबंध मला माहीत आहे.

मोहनच्या बाबतींत निश्चित कांहीं नाहीं. आमचें सरकार म्हणूनच शंका वाटते. निःस्पृहतेचे प्रयोग व प्रात्यक्षिक ओळखीच्या माणसावरच व्हावयाचें!! न्याय–अन्याय याचा विचार पुढें! पहावें काय होतें तें. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १३०

श्री अमळनेर, १५-८-४९

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि. पत्र पोचलें. मजकूर समजला. हिंडलग्याच्या जेलसमोरील जागेंत झालेल्या सभेचा वृत्तांत Times मध्यें वाचला होता. तुम्ही 'Graphic description' दिल्याचें त्यांत होतें. अभ्यंकरबाईंचें पत्र आलें आहे, दादासाहेब खाडिलकरांच्या आमंत्रणावरून मी सांगलीस जात आहें. तिकडे आल्यानंतर ठरवीन. मुंबईहून मोहन येईल. त्याचेबरोबर मी निघेन. आज येथें झेंडावंदन माझ्या हातें झालें. पण मी बोललों नाहीं. जामनेरचे राजमल व प्रतापशेठ यांचीं भाषणें झालीं. राजमल काल भेटावयाला आले होते. तुमची आठवण काढली. प्रकृति बरी आहे. बुद्धिमांद्य आहेच. जामनेरला तुमचें व्याख्यान झालें होतें ना?

हिंडलगा जेलच्या समोर काय स्मारक करणार याची कल्पना मला नाहीं. 'लोकसत्ता' पत्रांत बेळगांवसंबंधानें एक लेख आला आहे. लेखक कोण? कळावें, लोभ असावा, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

वसुंधरेचें जागेचें अद्यापि जुळत नाहीं. त्याबद्दलहि तुम्हाला कांहीं दिवस प्रयत्न करावा लागेल. माझ्याकडून दगदग होत नाहीं. वसुंधरेबद्दल तुम्हांला आपुलकी आहेच.

प्रकृति बरी नाहीं. घरचें काम संपवावें असें वाटतें. आतां न झाल्यास पुढें लवकर होणार नाहीं. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

ता. क. :—सरदार प्रतापसिंहांना भेटून वसुंधरेसाठीं जागेबद्दल तपास करावा.

## पत्र नं. १३३

श्री

बेळगांव, ता. १०-१०-४९

श्री. पुंडलीकजी यांना स. न.

तुम्ही आतांशी विशेष कधीं भेटतच नाहीं. माझ्या प्रॅक्टिसची सर्व व्यवस्था लावून देण्याचें तुम्ही कबूल केलें आहे. सरदार प्रतापसिंहांना भेटून त्यांना जागा बांधून देतात का, चौकशी करावी. ती जागा साधारण आमच्या घरापासून किती दूर आहे तें मला कळवा. त्याचप्रमाणें Ground floor वर किती खोल्या बांधून देतील व त्यास साधारण भाडें किती पडेल हें सर्व चौकशी करुन मला पत्रानें कळवा. म्हणजे मी तेथें येईन. तुम्ही स्वतः जाऊन ती जागा पाहून या. सध्यां जागाभाडें सरकारच्या हातांत आहे. तेव्हां त्याचा प्रश्न राहणार नाहीं. सध्यां मला ८–९ खोल्या तरी बांधून पाहिजे आहेत. त्या किती महिन्यांत बांधून होतील ? Binding कांहीं राहील काय ? म्हणजे आम्हाला जर दुसरी चांगल्या ठिकाणीं जागा मिळाली तर आम्हाला ही जागा सोडून जातां येईल कीं नाहीं ?

तुम्ही तेथें गेलांच आहांत तर सर्व तपास करा. आजपर्यंत सर्वांसाठीं तुम्हीं कांहीं ना कांहीं केलें आहे, पण माझ्यासाठीं तेवढें वसुंधरेचें काम करा. माझी जरुरी असली तर तसें मला कळवा म्हणजे मी येईन. कळावें, ही वि.

सौ. वसुंधरा घळे

## पत्र नं. १३४

श्री

बेळगांव, ता. १२-१०-४९

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि.

काल पत्र लिहिल्याप्रमाणें व्यवस्था करावी. चि. मोहनची नेमणूक कोरेगांवला झाली. तो उद्यां सकाळीं कोरेगांवला जाणार आहे. १९ तारखेपर्यंत तो तिथें आहे.

वाटतें. तूं केव्हां यावेंस हें मी तुला कळवीन. तूर्त घरांत येथें कांहीं पाहुणे आहेत. माझी प्रकृतीहि थोडी जास्ती सुधारली पाहिजे.

हें काम संपवून शक्य झाल्यास यवतमाळ, अमरावती व वर्ध्यापर्यंत जाऊन यावें असें वाटतें. पण प्रकृतीवर अवलंबून राहणार.

मोहन मुंबईपर्यंत आमचे बरोबर होता. तो सोमवारीं परत कोरेगांवला गेला. बाकी सर्व ठीक आहे.

कळावें, हा आशीर्वाद. गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १३६

श्री

चि. पुंडलीकजी यांस :— अमळनेर ता. १६-८-५०

आ. वि.

तुझें पत्र पोचलें. तूं हुबळीला व्याख्यान देण्याला जाणार हें समजलें. व्याख्यानांचा, लेखांचा परिणाम होतो असा तुला अनुभव येत असावा! मला मात्र त्यांत गोडी राहिली नाहीं. टिळक पुण्यतिथीच्या दिवशीं श्री. भाऊसाहेब सोमण, बुवा गोसावी, डॉ. आठल्ये वगैरे मंडळींच्या आग्रहामुळें मी साताऱ्याला गेलों होतों. पण माझें भाषण अगदीं मामुली व फिकें झालें असें मला तरी वाटलें. लोकांना काय वाटलें मला माहीत नाहीं. काल येथें भाषण करण्याबद्दल काहीं मंडळीचा आग्रह होता. त्यात डॉ. नानासाहेबहि एक होते. पण मीं साफ नाकारलें. मला त्यांत आतां हौस वाटत नाहीं.

जी गोष्ट व्याख्यानाची तीच लेखांची. चरित्रलेखन व आठवणी, त्याच सदरांत येतात. चरित्र वाचून स्फूर्ति घेणारे किती लोक आहेत? केळकरांनीं तीन खंडांमध्यें टिळकांचें चरित्र प्रसिद्ध केलें. किती लोकांच्या वाचनांत तें आहे? बरींच चरित्रे प्रसिद्ध झालीं आहेत. पण त्याचा फायदा किती लोकांना होतो? म्हणूनच मला वाटतें रानडे, टिळक, गोखले, आगरकर, भांडारकर, तेलंग, खाडिलकर, शिवरामपंत, मेथा, मंडलीक इत्यादि थोर पुरुषांनीं आपलीं चरित्रें लिहिलीं नाहींत. दुसऱ्यांनीं लिहिलीं पण तीं उपयोगी ठरलीं नाहींत. गांधींना एका विशिष्ट तत्त्वाचा प्रचार करावयाचा होता व त्याची सार्थकता नव्यानें पटवावयाची होती, म्हणून त्यांनीं आत्मचरित्र लिहिलें. पण तेंहि पुरें करावें असें त्यांना वाटलें नाहीं! जवाहरलालचें चरित्र वाचून स्फूर्ति घेणारे किती तरुण दिसतात? परदेशांत काय स्थिति आहे मला माहीत नाहीं. पण आपल्याकडे मात्र मोठ्या लोकांचीं चरित्रें निरुपयोगी ठरून पडलीं आहेत!

तुझ्यासारख्या कार्यकर्त्यांची गोष्ट निराळी. तुला गंभीर वाचनाची गोडी व हौस आहे. आपल्यासारखाच एक कार्यकर्ता आहे, त्याला अडचणी काय आल्या, त्या त्यानें दूर कशा केल्या वगैरे जिज्ञासेनें कांहीं परिणाम होतकरू कार्यकर्त्यांच्या मनावर

होण्याचा संभव आहे. मी स्वतः मोठा पुढारी नाहीं, विद्वान नाहीं, 'कार्यकर्ता'हि नाहीं. माझें कांहींच घड नाहीं. त्यामुळें माझ्या आठवणींना अगर चरित्राला किंमत नाहीं असें मला वाटतें. तुला हें पटणार नाहीं हें मला माहीत आहे.

शिवाय माझा स्वभावहि तुला माहीत आहेच. मी कधींहि मानाच्या स्थानाची अपेक्षा केली नाहीं. हें पाप माझ्याकडून जन्मांत घडलें नाहीं, एवढें मी खात्रीपूर्वक सांगूं शकतों. माझ्यामध्यें इतर दोष पुष्कळ आहेत. पण मोठेपणाची हांव धरणें व त्याकरितां पुढें पुढें करणें हें मी कधीं केलें नाहीं. टिळक होते तोंपर्यंत त्यांच्या आश्रयाखालीं व त्यानंतर महात्माजींच्या हाताखालीं एक दुय्यम प्रतीचा 'पुढारी' म्हणून काम करण्याची संधि मला मिळाली. मी निःस्वार्थ बुद्धीनें तिचा उपयोग केला. कीर्तीची हांव धरली नाहीं, पैशाचा लोभहि माझ्यांत नव्हता. वाटल्यास याला तुझ्यासारखा स्नेही गुण म्हणेल. पण हा गुण आहे हें देखील लोकांना पटणार नाहीं.

या व अशाच कारणांकरितां मी माझ्या आठवणी किंवा डायरी प्रसिद्ध होऊं नये म्हणतों. तथापि माझे इष्टमित्र, आप्त, वंशिक वगैरेंना माझी माहिती असावी असेंहि वाटतें. म्हणून ते छापावें व private circulation करितां कांहीं प्रती काढाव्या असें वाटतें. माझ्या पश्चात् छापावयाचें झाल्यास त्याला प्रतिबंध मी तरी कसा करणार ? म्हणून मोहननें त्याला योग्य वाटल्यास खर्च करावा व छापण्याचें काम करावें असें मी लिहिलें होतें. पुस्तक खपून त्याचा खर्च निघाल्यास उत्तमच आहे. पण न निघाला तरी तो खर्च मोहननें सोसावा. त्याबद्दल पुन्हा कळवीन. तुम्हाला बोलवावयाचें झाल्यास कृष्णाला किंवा थाळगींना लिहीन. ते खर्चाला रुपये देतील.

तुझें 'पुंडलीक' पुस्तक छापून तयार झालें म्हणजे त्याचें प्रसिद्धीकरण वगैरे सर्व मामुली व्यवहार होणारच. त्याकरितां बाबूरावांची योजना योग्य आहे. त्यांनीं आमंत्रण स्वीकारल्याचें कळवलेंच. मी त्यांना लिहूं का ?

मिरजकरांचें आमंत्रण पुष्कळ वेळां आलें आहे ! श्रीमंतांचेकडे एकदां गेलें पाहिजे. आपण मिळून जाऊं.

इकडील मंडळी सर्व क्षेम आहेत. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १३७

श्री

चि. पुंडलीकजी यांस — अमळनेर, २१-८-१९५०

आ. वि.

माझें पत्र पोंचलें असेलच. यवतमाळकडे वगैरे जाण्याचें मनांत आहे. पण प्रकृतीमुळें प्रवास करूं नये असें वाटतें.

आज कृष्णा बेवळवाड याला पत्र लिहिलें आहे. पत्र या सोबतच आहे. त्याचेकडून २५ रु. घ्यावे व इकडे येण्याचें करावें. म्हणजे आठवणी लिहिण्याचें काम पुरें करूं. इकडे पाऊस नाहीं. उकाडा खूप आहे. ८ दिवसांत पाऊस झाला नाहीं तर पिकें बुडतील. सर्व मंडळी क्षेम आहेत. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

[पत्र नंबर १३८:—घराचें बांधकाम लवकर संपविण्याची घाई करणारें एक प्रदीर्घ पत्र ती. गंगाधरराव यांनीं मला लिहिलें होतें. "वास्तविक आपण आतां निवृत्त झालें पाहिजे. मग ही आसक्ति कां? घराचें बांधकाम यथाकाल संपणारच आहे. रंगण्णासारखे एक तज्ञ एन्जीनियर तेथें ठाण मांडून बसलेलेच आहेत. आपल्या आध्यात्मिक साधनेमध्यें ही आसक्ति बाधारूप ठरेल," अशा आशयाचें पत्र मी त्यांना लिहिलें होतें. त्या माझ्या पत्राला हें उत्तर गंगाधररावांनीं लिहिलेलें आहे. माझ्या पत्रानें त्यांना थोडा राग आल्याची छटाहि त्यांत दिसून येते. —पुंडलीकजी]

## पत्र नं. १३८

श्री

श्री पुंडलीकजी यांस अमळनेर, २६-८-५०

कृतानेक सा. न. वि. वि.

आपलें पत्र पोचलें. नाशिकला जाण्याकरितां मला यातायात करावयाची नाहीं. काँग्रेसमध्यें काय होणार आहे याचा अंदाज मला आहे. कांहीं विशेष झाल्यास वर्तमानपत्रांवरून समजेलच. सहज गेलों तर कांहीं लोकांच्या गांठीभेटी होतील, इतकेंच.

आपल्या पत्रांतील शेवटचा भाग माझ्या चांगला लक्षांत आला नाहीं. घराच्या बांधकामाच्या दिरंगाईसंबंधानें मला वाईट वाटलें म्हणून मी लिहिलें होतें, त्याला उद्देशून तो भाग असावा. मला तुम्ही म्हणतां तशा प्रकारची निवृत्ति आली नाहीं व ती यावी असेंहि वाटत नाहीं. शरीर थकल्यामुळें मी निष्क्रिय झालों आहें. मनानें मी निष्क्रिय नाहीं, व व्हावें असेंहि मला वाटत नाहीं. आपण म्हणतां तशा प्रकारची निवृत्ति माझ्या स्वभावाच्या विरुद्ध आहे. तेव्हा घर लवकर होत नाहीं याबद्दल वाईट वाटल्यास त्यांत अस्वाभाविक कांहीच नाहीं. पण तें वाईट वाटणें फार वेळ टिकलेंहि नाहीं. लवकर घर झाल्यास आयुष्यांतील कांहीं दिवस तेथें घालवावेत असें वाटतें, हें खरें आहे. आयुष्य संपल्यानंतर शरीर कोठेंहि पडलें

तरी त्यांत विशेष नाहीं हें मी जाणतों. पण, घरीं रहावें असें वाटल्यानें मात्र मी लंपट झालों आहें असें ठरत नाहीं. लंपटपणा पदरांत न घेतां स्वाभाविक प्रवृत्ति निर्दोष असूं शकते.

दुसऱ्या कोणत्या तरी कल्पनेनें हा मजकूर लिहिला असेल तर कळवावें. प्रकृति साधारण आहे. बाकी सर्व ठीक आहे. कळावें, ही वि.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १३९

श्री

बेळगांव, ता. २९-१२-५०

श्री. पुंडलीकजी यांस

कृ. सा. न. वि. वि.

तुमचें पूज्य मामांना लिहिलेलें पत्र पावलें. त्याप्रमाणें मी येथून सोमवारीं (ता. १ जा.) ला निघून तेथें मंगळवारीं सकाळीं येतों. पण श्री. पटेल तेथें मंगळवारीं नसतील तर तसें तारेनें कळविण्याबद्दल तुम्हाला तार केली आहे. चौकशी करून ताबडतोब तार करावी. मंगळवारीं नसतील तर ते मुंबईला असतील त्या दिवशीं आम्ही जाऊं. नक्की काय तें तारेनें कळवावें. कळावें, ही वि.

आ.

रंगण्णा देशपांडे.

ता. क. —कसेंहि करून परमिट मिळविलें पाहिजे. स्वामी आनंद आले आहेत. त्यांना मी वेगळें पत्र लिहिलें आहे. तुम्ही त्यांना भेटावें.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १४०

श्री

बेळगांव ता. २-१-५१

श्री. पुंडलीकजी यांस

कृ. सा. न. वि. वि.

मी श्री. नाडकर्णी यांना आज मेलनें निघतों असें सांगितलें होतें. पण नामदेव सबओव्हरसिअर न आल्यामुळें व चौकशी तपासून ताबडतोब दाखविण्याची जरुरी असल्यामुळें मला तिकडे येतां आलें नाहीं. श्री. नाडकर्णी यांना तिकडील काम तुमच्या मदतीनें पुरें करून घेण्यास सांगावें. निराळा नकाशा करण्याची जरुरी असेल तर

इकडेच करून घेऊं. तुम्ही सफारियाकडे जाऊन तावडतोब शटर्स पाठविण्याबद्दल सांगावें. माझी वाट पाहूं नये. कळावें, लो. अ. ही वि.

आ.

रंगण्णा देशपांडे

ता. क. :—आज श्री. रंगण्णांनीं तार केली आहे ती पोचली असेलच. परमिटचें काम पुरें करावें. रंगण्णांची वाट न पाहतां काम संपवावें.

गंगाधर देशपांडे

## पत्र. नं. १४१

श्री

बेळगांव, ता. ३-२-५१

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि. काल तार पोचली. तुझी तार येण्यापूर्वी रंगण्णांनीं एक तुझ्या नांवें तार केली होती. तुझें पत्र आज आलें नाहीं. वाट पहात आहें. इकडे प्रमिला, बाळ, अरुणा, शरद, मधुकरराव, टकूताई तापानें आजारी होते. आतां सर्व बरे आहेत. मोहन व त्याची मंडळी काल कुंदगोळला गेली. तूं इकडे कधीं येणार? कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १४२

श्री

चि. पुंडलीकजी यांस

कुंदगोळ, ता. १२-२-१९५१

कृतानेक आशीर्वाद वि.

परवाच्या दिवशीं दोन प्रहरीं मी येथें येऊन पोहोंचलों. धारवाडहून चि. सौ. प्रमिला व मुलें त्याच गाडीनें आलीं. मोहन आमच्या आधीं आला होता. प्रवासाचा थोडा त्रास झालाच. पायावर सूज आली. गाडींत बसून यावें लागलें, पडावयाला जागा नव्हती. धारवाडहून थोडा भात, भाजी वगैरे प्रमिलेनें आणिली होती. थोडा भात हुबळी स्टेशनवर खाल्ला. येथें आल्यानंतर एक पोळी खाली. प्रवासाची दगदग व खाण्यांत अनियमितपणा त्यामुळें पोटांत बिघाड झाला. काल ८।१० वेळां शौचास जावें लागलें. थोडें थोडें होत होतें. मल पडत होता. आम वगैरे नाहीं. संध्याकाळीं एनिमा घेतला. त्यामुळें बरें वाटलें. रात्रीं कांहीं खाल्लें नाहीं. फक्त एक कप चहा घेऊन झोपेची गोळी घेतली व निजलों. झोप बरी लागली.

परवां व काल अगदीं उन्हाळ्याप्रमाणें हवा वाटली. उकाडा होता. आज सकाळीं थोडी थंडी आहे. वेळगांवच्या हवेपेक्षां येथें कोरडें वाटतें. कितपत मानवेल पहावें.

चि. जीवनराव आज वेळगांवला येणार होते. आले असतील. माझा गेला सबंध महिना आजारांत गेला. शक्ति बरीच कमी झाली. सर्व कारभार लवकरच संपण्याचीं चिन्हें आहेत. आतां संपलें तरी त्यांत वावगें कांहीं नाहीं. तयारींतच आहें.

तुम्ही सर्वांनीं माझी सेवा अनन्यभावानें केली. तरी तुमचे कोणाचेच आभार मानावेत असें मला वाटत नाहीं! पूर्वजन्मींचा ऋणानुबंध आहे. जवळजवळ ४५ वर्षे मी तुमच्यावर अनेक प्रकारें सत्ता चालविली व तुम्ही सर्व लहानथोर मंडळींनीं चालवून घेतली. माझ्या पश्चात् असेंच चालावें असें वाटतें. पण, पुढचें कोण काय सांगणार? मला तर याळगींचें कुटुंब व माझें कुटुंब यांत भेदभाव वाटत नाहीं. हें कुटुंब म्हणजे परमेश्वराची मला बहुमोल देणगी आहे. जास्ती काय लिहूं!

प्रकृतीचें मान वरचेवर कळवीत जाईन. चि. सौ. रमाक्का, सौ. विमल, व कमल यांना आशीर्वाद. मुलांना आशीर्वाद. डॉ. अनंतराव याळगीनें सांगितलेले उपचार आजपासून सुरू करीन. कळावें, लोभ असावा हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १४३

श्री कुंदगोळ, ता. १८-२-५१

चि. पुंडलीकजी यांस

कृतानेक आ. वि. तुमच्याकडून अद्यापि पत्र नाहीं. हरीहरकडे जाऊन आलों व सर्व प्रवास गडबडींतच झाला. त्यामुळें प्रकृतीवर कांहीं परिणाम झाला की काय कांहीं कळलें नाहीं, त्यामुळें काळजी वाटते. तरी उलट टपालीं पत्र घालून तुमची खुशाली कळवावी. डॉ. याळगींनाहि २–३ पत्रे घातलीं. पण त्यांचेकडूनहि उत्तर नाहीं.

आज मला येथें येऊन आठ दिवस झाले. प्रकृतींत सुधारणा दिसत नाहीं. उलट, पचनक्रिया चांगली होत नसावी. त्यामुळें पोट ठीक नव्हतें. वेळगावपेक्षां कोरडी हवा आहे. पण पाण्यांत कांहीं दोष आहे की काय समजत नाहीं. एकंदरींत प्रकृति बरी नाहीं व आतां फार दिवस जगावें असेंहि वाटत नाहीं. कशाकरितां मीं जगण्याची इच्छा करावी? मरणाच्या प्रश्नाचा विचार केला. त्यात वाईट काय आहे? असें शरीर घेऊन जगण्यापेक्षां नवें चागलें शरीर मिळालें तर त्यांत काय वाईट आहे? आतां कांहीं करावयाचें शिल्लक आहे व असलें तरी तें करण्याची मला शक्ति आहे असें वाटत नाहीं. या स्थितींत मी आहें. किती दिवस आणखी काढावे लागतील समजत नाहीं. कधीं थोडें वाचन वगैरे करीत असतों.

घर लवकर बांधून तयार होईल व कांहीं दिवस तेथें मला रहावयाला मिळेल, चार स्नेही मंडळींना घरीं बोलावितां येईल, अशा कांहीं कल्पना आलेल्या होत्या. यांत कांहीं पुरुषार्थ आहे असें नाहीं. पण हा विचार आला म्हणून घर बांधण्याला मीं घाई केली. पण ती हौसहि आतां राहिली नाहीं. कारणें कांहींहि असोत, अपेक्षेप्रमाणें घर लवकर झालें नाहीं हें खरें. आज वर्ष होऊन गेलें. आणखी किती महिने लागतील सांगवत नाहीं. असो. सार्वजनिक काम करण्याची शक्ति नाहीं. प्रापंचिक काम कांहीं दिसत नाही. पारलौकिक विषयाकडे लक्ष आहे, पण त्या विषयाला अंत ना पार! त्यांतच समाधान मानून दिवस घालवीत आहें.

माझ्या घरच्या माणसाप्रमाणें तुम्ही सर्व मंडळींनीं माझ्यावर प्रेम केलें. हें प्रेम असेंच चालू रहावें असें वाटतें.

वरचेवर पत्र पाठवून क्षेमसमाचार कळवीत असावें. घरांतील सर्व मंडळींना आशीर्वाद. कळावें, लोभ असावा हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

[पत्र नं. १४४:—या पत्राच्या पार्श्वभूमीविषयीं कांहींहि लिहिण्याची आवश्यकताच नाहीं इतकें तें स्पष्ट आहे.—पुंडलीकजी]

पत्र नं. १४४

श्री

कुंदगोळ ता. २३-२-५१

श्री. जीवनराव यांना

सा. न. वि. वि. आजचा 'तरुण भारता'चा अंक पोचला. त्यांत माझा सत्कार व थैली अर्पण करण्याचा समारंभ आपण कांहीं मंडळींनीं करण्याचें ठरविल्याचें समजलें! आणि हा समारंभ 'अखिल भारतीय' होणार हें वाचून तर मी थक्क झालों!! कोणतेंहि काम चांगलें असलें तरी त्याला sense of proportion असलें पाहिजे. हा कार्यक्रम ठरवितांना proportion राखण्यांत आलें नाहीं असें मला म्हणावें लागतें. माझ्या इच्छेकडे लक्ष न देतां, माझ्या स्नेह्यांना माझ्याकरितां कांहीं करावें असें वाटल्यास त्यांत चूक आहे असें म्हटलें गेलें नाहीं तरी त्या कार्यांत प्रमाणबद्धता असली पाहिजे. ती नसली तर चांगली गोष्ट देखील थट्टेचा विषय होते. श्री. हेरवाडकराच्या माडीवर जमलेली मंडळी व्यवहारदृष्ट्या हुषार, अनुभवी होती. मग त्यांच्याकडून अशी चूक कशी झाली, हेंच समजत नाहीं. यांत श्री. बाबुराव ठाकुरांचा उतावीळपणा स्पष्ट दिसतो! त्यांत त्यांचा हेतूहि चांगला आहे; तो इष्ट आहे

असें मानलें तरी माझी त्यांत गट्टा होईल असा कार्यक्रम नको होता. माझा विचार घेतला असता तर मी त्याचें समाधान करूं शकलों असतों.

पुण्यास झालेल्या समारंभात हा 'थैली'चा प्रश्न नसल्यामुळें मी संमति दिली. संमति देण्यापूर्वी मीं पुष्कळ विचार केला होता; व प्रथम ती कल्पना मी धुडकावून दिली होती. या गोष्टी तुम्हाला माहीत असून 'माझा विचार घ्यावा' ही सूचना तुम्ही कशी केली नाहीं? श्री. बाबुराव ठाकुर व पुंडलीकजी यांचे स्वभाव तुम्हाला माहीत आहेत. पण मग तुम्ही त्याला बळी कसे पडलांत?

येथें परवां पुंडलीकजी आले होते. त्यांनीं एक शब्दानेंहि मला यांतील कांहींहि कळविलें नाहीं. श्री. बाबुराव गोखल्यांच्या सारख्यांना सल्ला तरी घ्यावयाचा होता. हे असले सत्कार, थैली अर्पण करणें, व असल्या गोष्टींना 'अखिल भारतीय' म्हणणें, वगैरे गोष्टींची मला खरोखर चीड आहे! अशा प्रकारच्या समारंभाला योग्य अशीं माणसें थोडीं आहेत. कै. श्री. अण्णासाहेब लट्ठ्यांचें स्मारक करण्याचें तसेंच पडून राहिलें आहे! मग मध्येंच ही माझ्या सत्काराची घोरपड कां गळ्यात घेतली? मला तर कांहीं समजत नाहीं. गोंधळ झाला आहे!

या गोष्टीला माझी संमति नाहीं, म्हणून हा विचार रद्द करावा असें माझें मत आहे. तुम्हाला हें पसंत नसल्यास, येथपर्यंत येऊन मला भेटून, याबद्दल विचार करावा. गडबडीनें कांहीं तरी करावयाला जाऊं नये. मी हें केवळ विनयानें लिहीत नाहीं. वस्तुस्थिति लक्षांत घेऊन विचारपूर्वक लिहीत आहें. जास्ती काय लिहूं? कळावें ही. वि.

आपला
गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १४५

श्री

कुंदगोळ, ता. १६-३-१९५१

चि. पुंडलीकजी यांस
आशीर्वाद वि.

हुबळीहून लिहिलेलें तुमचें कार्ड पोचलें. चि. सौ. यमूताई आजारी आहे व ती उद्यां बेळगांवला येणार आहे असें पत्र आलें आहे. म्हणून मी आज बेळगांवला जाण्याकरितां निघत आहें. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

[पत्र नं. १४६–१४७–ती. गंगाधरराव देशपांडे यांनीं श्री. जीवनराव याळगी यांना लिहिलेलें पत्र आणि श्री. जीवनराव याळगी यांनीं त्यांना लिहिलेलें उत्तर हीं दोन्ही त्या त्या पत्रांच्या मालकांकडून मला मिळालीं होतीं. हीं दोन्ही पत्रें मी माझ्या संग्रहामध्यें जपून ठेविलीं होतीं. या दोघांचा संबंध, नातें व आपुलकी किती उत्कट होती हें या पत्रांवरून व्यक्त होतें. शिवाय त्यामध्यें माझाहि एका छोट्याशा बाबतींत उल्लेख आलेला आहे आणि म्हणूनच या दोन्हीहि पत्रांचा समावेश मी या पत्रसंग्रहामध्यें केला आहे. या पत्रांमधील आशय अगदीं उघड व स्पष्ट असल्यामुळें, मी त्याविषयीं कांहींहि लिहिण्याची आवश्यकता मला वाटली नाहीं. —पुंडलीकजी]

## पत्र नं. १४६

श्री

कुंदगोळ, ता. २२-७-५१

चि. जीवनराव याळगी यांस

कृतानेक आ. वि.

मी शनिवारीं मेलनें येथें आलों. येथेंहि बारीक पाऊस आहे. हवेंत गारठा आहे. पण बेळगांवापेक्षां हवा कोरडी आहे असें वाटतें. मला कितपत मानवते पहावें. न मानवल्यास अमळनेरला जाण्याचा विचार करीन. डॉ. अंताला प्रकृतीसंबंधानें आज कार्ड लिहिलें आहे.

चि. सौ. प्रमिलेबरोबर बोलत असतांना तुमच्या कुटुंबाच्या परिस्थितीसंबंधानें बोलणें निघालें. पुंडलीकजींचें व तिचेंहि बोलणें एकदां झालें होतें. तेव्हां 'गंगाधरराव आतां पूर्वीचे राहिले नाहींत' असें पुंडलीकजी म्हणाले. तुमच्या हल्लींच्या परिस्थितीसंबंधानें बोलतांनाच पुंडलीकजींनीं हे उद्गार माझ्यासंबंधानें काढले असें मला कळलें. मागें तुमच्यावर सांपत्तिक दृष्ट्या प्रसंग आल्यावेळीं मी स्वतः जामीन राहून व अन्य मार्गांनीं तुमची अडचण भागवण्याला मदत केली; पण या खेपेला मी तसें करीत नाहीं हा आरोप पुंडलीकजींनीं माझ्यावर केला असावा. एका अर्थीं हें खरें आहे. पण त्यासंबंधानें थोडा खुलासा करतां येण्यासारखा आहे.

मुलांच्या शहाणपणामुळें मागें आपल्या धंद्यांत ठोकर बसली होती. त्यांत कृष्णरावांचा हात मुळींच नव्हता असें मला म्हणवत नाहीं. त्यांत कृष्णरावांचा हात असावा असें तेव्हांहि माझें मत होतें. कदाचित् हें मत चुकीचें असेल. तें कसेंहि असलें तरी ती एक व्यापारांतील ठोकर आहे असें समजून मी मला काय करावयाचें तें केलें. त्यांतून मुक्त झाल्यावर तुमचा गाडा मार्गावर येईल अशी अपेक्षा होती. तुम्ही, बाबासाहेब सोमण व भीमराव पोतदार यांच्या मार्फत वांटण्या करून घेतल्यात.

मला कांहींच कळवलें नाहीं. मीहि तुम्हाला विचारलें नाहीं. तुम्ही ज्या कामांत आहांत तें काम कोणाला बुडविण्याच्या हेतूनें केलें असेल असें मला वाटलें नाहीं व आजहि वाटत नाहीं. असो.

मोहनच्या लग्नानंतर, मोहनच्या आधारावरच रहावयाचें असें मीं ठरविलें. १९४२ चळवळीनंतर मोहनवरच मी अवलंबून आहें! त्यानें मीं केलेलें कर्ज वगैरे फेडलें व कांहीं शिल्लकहि केली. त्यांतूनच हल्लीं घर बांधलें जात आहे.

घर बांधण्याचा खर्च अंदाजाबाहेर जाईल याची मला जाणीव होती.

कृष्णराव प्रामाणिक आहेत. कोणाला बुडवावें असें त्यांना वाटत नाहीं. पण, त्यांचा स्वभाव चमत्कारिक आहे हें मुलाशीं वगैरे त्यांची वागणूक पाहून कोणीहि सांगेल. व्यवहारांत प्रामाणिकपणाबरोबर इतर गुणहि असावे लागतात. ते तुमच्यामध्यें आहेत असें मला वाटतें.

अशा परिस्थितींत तुमच्यावर आतांचा पेच आला आहे. तो दूर कसा करावा यासंबंधी विचार होत नाहीं. मी मागे सुचवला तो विचार तुम्हाला पटत नाहीं. या पेचांत तुम्ही सांपडलां आहां.

माझें वय झालें आहे. शरीर व्याधिग्रस्त आहे. मृत्यूच्या दारांत आहें.

मी तुम्हाला काय सुचवावें मला समजत नाहीं! मी सुचवलें तें तुम्ही करीत नाहीं. या कैचींत मी आहें.

तेव्हां पुंडलीकजींचा माझ्यावरील आरोप खरा नाहीं. हें तुम्हाला कळावें म्हणून मी हें पत्र लिहिलें आहे. याचा अर्थ तुम्ही माझ्यावर अविश्वास करीत आहांत असें नाहीं. पण, पुंडलीकजींसारख्या अगदीं जवळच्या माणसालाहि असें माझ्याविषयीं वाटावें हें माझेंच दुर्दैव आहे. कळावें, लोभ असावा, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १४७

श्री

बेळगांव, ता. २६-७-५१

गुरुवर्य गंगाधरराव देशपांडे यांचे सेवेसी

कृ. सा. न. वि. वि.

आपलें ता. २३ चें कृपापत्र पोचलें. श्री. पुंडलीकजींचा आपले संबंधीं कसलाहि गैरसमज होणें कधींच शक्य नाहीं. त्यांची आपल्यावरील निष्ठा व श्रद्धाच तशी आहे. ते येथेंच होते. त्यांना मी आपलें पत्र दाखवलें आहे. ते आजच हुबळीला जात आहेत. एकदोन दिवसात कुंदगोळला जाऊन आपली भेट घेणार आहेतच.

मागचा इतिहास व आजची परिस्थिति प्राप्त होण्याला कारणीभूत झालेल्या

व्यक्तींचा संबंध ध्यानांत घेतां त्यांनीं केलेल्या वाईट गोष्टींबद्दल त्यांना दोष देत बसल्यानें परिस्थिति सुधारणार नसून स्वतःच्या मनालाच अत्यंत वेदना होऊन त्याचा परिणाम दैनंदिन व्यवहारावर होऊन परिस्थितींत सुधारणा घडून येण्याऐवजीं जास्त बिघडण्याचा संभव असतो. अशी बिकट परिस्थिति आम्हास प्राप्त होण्यांत जीं अनेक दृश्य कारणें आहेत, त्याबरोबरच अदृश्य अशींहि आमच्या बुद्धीला न समजणारीं दैवी कारणेंहि असणारच. परमेश्वरी इच्छाच आमचेवर असा प्रसंग यावा अशी असल्याशिवाय ही घटना घडून आली नाहीं.

अगदीं सुरळित सर्व कांहीं चाललेल्या वेळीं अशा प्रसंगाची कल्पनासुद्धां मनुष्य करूं शकत नाहीं. मी पैशाच्या व्यापाचा संबंध सोडून आत्मनिरीक्षणाची संधि, गेलीं कित्येक वर्षें पहात होतों. परंतु दैवानें माझ्यापुढें वेगळाच प्रसंग आणून ठेवला आहे. कै. दादांच्या मुलांना त्यांच्या इच्छेप्रमाणें स्वतंत्र करून दिल्यानंतर तरी मी या व्यापांतून सुटेन असें मला वाटलें होतें, पण तें आतां शक्य नाहीं. परमेश्वरी इच्छा तशी नाहीं. माझ्या इच्छेचाहि प्रश्न नाहीं. परिस्थिति मला माझ्या इच्छेविरुद्ध ओढून नेत आहे. कोणाच्याहि चुकीमुळें अगर दोषामुळें कां असेना, माझ्याबद्दल आपल्यासारखे अनेक लोक, ही माझीच चूक असें म्हणणारच. या सर्व गोष्टींना तोंड देणें आवश्यक कर्तव्यहि होऊन बसलें आहे.

'पुराणांतील हरिश्चंद्राच्या कथेवर विश्वास ठेवावयाचा झाल्यास आणि त्याचें अनुकरण करणें योग्य असेंच जर आपण समजत असूं तर, त्यानें भोगलेल्या सर्व आपत्ति परमेश्वरी संकेत म्हणून धैर्यानें आणि शांत चित्तानें भोगण्यास मला परमेश्वरानेंच साहाय्य करावें अशी त्याचेजवळ अहर्निश प्रार्थना आहे. यांतहि परमेश्वरी हेतु माझें कल्याण करण्याचाच आहे अशी माझी समजूत आहे.

मागील घडामोडींवरून मी कांहीं धडा घेत नाहीं असेंहि समजण्याचें कारण नाहीं. जें जें करतां येणें शक्य आहे तें सर्व करण्याचा विचार आहे. आपण मात्र आपल्या मनावर या घटनेचा परिणाम करून घेऊं नका, अशी विनंति आहे. आपली प्रकृति वृद्धावस्थेमुळें आधींच जर्जर झाली आहे, त्यांत घरगुती स्वाभाविक कारणामुळें थोडेसें असमाधान, अशा वेळींच आमचेबद्दलची काळजी, यामुळें आपल्या अखेरच्या दिवसांत सुखासमाधानानें उरलेलें आयुष्य घालविण्यांत आपल्याला अडथळा निर्माण झाल्याबद्दल मला अत्यंत वाईट वाटत राहतें. आपणास मी लिहावें असें नाहीं. आपण आपल्या घरची तसेंच आमच्या संबंधींची काळजी करण्याचें सोडून द्या. परमेश्वर योग्य तेंच करील ही श्रद्धा ठेवून समाधानानें, शांत वृत्तीनें रहा, हीच माझी आपल्या चरणीं अखेरची मागणी आहे.

आमच्या व आपल्या आजपर्यंतच्या संबंधामुळें हें करणें आपल्यास अत्यंत जड जाणार याची जाणीव मला आहे. परंतु आपण ते पाश निग्रहानें तोडण्यास समर्थ आहांत असा मला विश्वास वाटतो.

गेल्या सोमवारीं श्री. घोत्रे मेलनें बेंगळूरला गेले. मी स्टेशनवर गेलों होतों. तिकडून ते परस्पर वर्ध्याला जाणार आहेत. त्यांनीं कुंदगोळला चि. मोहनला पत्र लिहिलें होतें. आणि स्टेशनवर चि. सौ. प्रमिलेला बोलाविल्याचें मला त्यांनीं सांगितलें. आपली प्रकृति बरी नसल्यानें आपली भेट कदाचित् झाली नसेल.

गेल्या मंगळवारीं श्री. जगन्नाथ महाराज व श्री. शंकरराव ओगले आले होते. बेंगळूरहून पहांटेच्या गाडीनें येऊन संध्याकाळीं मेलनें पुण्यास गेले. आपल्या घरीं जाऊन आल्याचें सांगत होते. बरेच दिवसांनीं त्यांची माझी भेट झाली. ते मोदग्यास बॉंबे सिल्क फिनेचर कंपनीच्या डायरेक्टरांच्या सभेसाठीं गेले होते. संध्याकाळीं स्टेशनवर जाण्यापूर्वी अर्धा तास आमच्या घरीं येऊन गेले.

गेले चार दिवस पाऊस एकसारखा पडत आहे. अशा पावसांतहि आपल्या घराचें बांधकाम शक्य तेवढें सुरू आहेच. श्री. रंगण्णांनीं आपल्याला पत्र पाठविलें असेलच.

डॉ. चि. अंताला आपण पाठविलेलें पत्र पाहिलें. त्यावरून समजलें कीं, आपणास व्याधीमुळें बराच त्रास होत आहे. अशा वेळीं आपण अमळनेरला जाऊन राहणें बरें असें मला वाटतें. तेथील हवा आणि डॉ. नानासाहेब म्हसकर यांचे उपचार, यामुळें आपला त्रास कमी होईल. तिकडे जाण्याचें ठरल्यास कधीं जाणार तें कळवावें. आम्ही सर्व मंडळी बरी आहोंत. वरचेवर पत्र पाठवून आपलें प्रकृतिमान कळवीत जाणें.

चि. मोहन, चि. सौ. प्रमिलाताई व मुलांना आशीर्वाद. कळावें, ही विज्ञापना.

आपला

जीवनराव याळगी

## पत्र नं. १४८

श्री

चि. पुंडलीकजी यांस — अमळनेर, ता. १५-९-५१

आ. वि.

मुंबईला आल्यावेळीं इकडे तूं येशील असें वाटलें होतें. जळगांवला सांगलीचे अभ्यंकर कलेक्टर आहेत. त्यांचीहि भेट झाली असती. असो. येथें आल्यामुळें माझ्या प्रकृतींत सुधारणा नाहीं. डॉ. नानासाहेब Injections देतात. औषधेंहि देत आहेत. येथें पाऊस मुळींच नाहीं. त्यामुळें भयंकर उकाडा आहे. मी आतां येथून लवकर निघणार आहें. मला मुंबईला रहावें लागल्यास तूं असलास तर बरें. रामचंद्राला आगाऊ पाठवीन. तो घरांत सर्व तयारी करील. मुंबईला, पुण्याला तुझा उपयोग होईल. याळगींच्याकडे मी तार करीन. तुला बोलाविल्यास जरूर ये. मुंबईला वसुंधराकडेच राहण्याचा विचार आहे. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे.

## पत्र नं. १४९

श्री अमळनेर, ता. २०-९-५१

चि. पुंडलीकजी यांस आ. वि.

पत्र पोचलें. मुंबईपर्यंत येऊन येथें येण्याला काय हरकत होती ? Film शिवाय आलां असतां तर कोणी रागावलें नसतें. मी आतां येथून लवकरच निघणार आहें. मी याळगींना तार करीन. तुम्हाला मी घोलावणार आहें. रामचंद्राचा मुंबईला काय उपयोग ? तुम्ही आल्यास मुंबईला दोनतीन दिवस राहीन व पुण्यांतहि एक दिवस राहीन. वरचेवर येणें होत नाहीं. मंडळींना भेटून जावें असें वाटतें. श्री. अभ्यंकर कलेक्टर याचा मुक्काम येथें आहे. आज सकाळीं मला मुद्दाम भेटावयाला आले होते. १५।२० मिनिटें बसले होते. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

ता. क. :—सोमवारनंतर निघेन. मीना पुण्याला गेली आहे. मागच्या खेपेला तिची भेट झाली नाहीं. तेव्हां आतां भेटूनच बेळगांवला येईन. कळावें.

## पत्र नं. १५०

श्री अमळनेर, ता. २४-९-५१

चि. पुंडलीकजी यांस आ. वि.

मला डॉ. नानासाहेब इंजेक्शनें देत आहेत. ता. २-१० पर्यंत तरी माझें निघणें लांबलें. ता. २८-९ ला निघतों म्हणून तुझी तार पोचली. इतक्या लवकर येथें येण्याची जरुरी नाहीं. मुंबईला तुझी जरुरी लागेल. येथें आणखी कांहीं तुझें काम असल्यास येण्याला हरकत नाहीं. बाकी भेटीअंतीं.

पाऊस नसल्यामुळें उकाडा फार आहे. प्रकृति साधारण आहे. कळावें, हा आ.

गंगाधर देशपांडे

ता. क. :—ता. २-१० मंगळवार दिवशीं मी निघणार. आज ठरविलें.

## पत्र नं. १५१

श्री बेळगांव, ता. २-५-५२

श्री. पुंडलीकजी यांस आ. वि.

पत्र पोचलें. मजकूर समजला. रामचंद्र मुंबईला ऑपरेशनकरितां गेला आहे. डॉ. वझे यांच्याकडेच गेला आहे. काल सोमलिंग आला होता. चि. सौ. प्रमिलेनें त्याचेकडे खादी दिली.

मी निंबाळला जाण्याचा विचार करीत आहें. ५-६ दिवसांत जावें असें वाटतें. तोंपर्यंत तुम्ही आल्यास बरोबर जाऊं.

मध्यें ५-६ दिवस प्रकृति बरी नव्हती. आतां बरी आहे. कळावें, हा आ.

गंगाधर देशपांडे

ता. क. :—आपल्या पुतणीचें लग्न जमवण्याकरितां श्री. बुवा गोसावी येथें आले होते.

घरच्या लोखंडासंबंधानें कांहीं काम चाललें आहे हें तुम्हाला माहीत आहे. तें प्रकरण कोठपर्यंत आलें व काय करणें शक्य आहे, त्याचा तपास करावा.

## पत्र नं. १५२

श्री बेळगांव, ता. ५-१२-५२

चि. पुंडलीकजी यांस आ. वि.

तुमचें पत्र पोचलें. रामचंद्राचें ऑपरेशन बरें झाल्याचें समजलें. १५ दिवसांत इकडे येईल. डॉ. फाटकचें कोठपर्यंत आलें तें कळवा. जबाबदारी मोठी आहे. सर्व सुरळित चालल्यास कांहीं हरकत नाहीं. हल्लींचे दिवस आमच्यासारख्यांना कठीण झाले आहेत. तुमचीं पत्रें redirect केलीं आहेत. कधीं येणार तें कळवावें, डॉ. सदाशिवराव वझे यांना शक्य ती मदत करावी. मला मुंबईची परिस्थिति माहीत नाहीं. त्यांनाच जास्ती माहिती. जमीनदार वर्ग बुडाला. आजपर्यंत दुसऱ्याच्या मदतीशिवाय दिवस गेले, पुढें कठीण आहे. परमेश्वर ठेवील तसें राहणें प्राप्त आहे. मी निंबाळला जाण्याचें ठरविलें आहे. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

३ कार्डें व एक पाकीट redirect करून पाठविलीं आहेत.

## पत्र नं. १५३

श्री अमळनेर, ता. ४-८-१९५३

चि. पुंडलीकजी यास आ. वि.

मी येथें सुखरूपपणें पोंचल्याचें समजलेंच असेल. जव्हालपुरकरांचें काम तुम्ही करीतच आहां. मी जास्ती काय लिहिणार ? तें काम काळजीपूर्वक संपवावें. तें घराणें इतिहासप्रसिद्ध आहे. तें सांभाळलें पाहिजे.

चि. पुरुषोत्तम म्हसकराबद्दल मी सांगितलेंच आहे. त्याला सर्व मदत करावी. इकडील सर्व मंडळी क्षेम आहेत. कळावें, हा आ.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १५४

श्री

अमळनेर, ता. ५-८-१९५३

चि. पुंडलीकला

आ. वि.

मी काल येथें सुखरूपपणें पोचलों. कालपासून येथें पाऊस आहे. आतां उघाडी व्हावी असें इकडे वाटूं लागलें आहे. मुंबईलाहि पाऊस कमी झाला असावा.

चि. आण्णासाहेब व चि. भाऊसाहेब जलालपूरकर यांचेबरोबर बोलण्याला मला फार वेळ मिळाला नाहीं. आण्णासाहेबांचा अर्ज मीं काळजीपूर्वक पाहिला. त्याचें म्हणणें योग्य आहे असें मला वाटतें. चि. आण्णासाहेब जलालपूरकर फार धोरणी व हुषार आहेत. तुमचें दोघांचें जुळतें यांत मला आनंद वाटतो. श्री. बखले सेक्रेटरी हे निर्विकार मनानें विचार करणारे अधिकारी आहेत. त्याचप्रमाणें मंत्रि श्री. हिरे यांच्याकडूनहि जाणूनबुजून अन्याय होईल असें मला वाटत नाहीं. या दोन अधिकाऱ्यांच्या हातीं त्यांच्या कामाचा निकाल असेल तर काळजी करण्याचें कारण नाहीं. या कामीं माझा यथेष्ट उपयोग करून घ्यावा. जरूरच असली तर मी स्वतः मुंबईस येईन. हें काम होईपर्यंत तुमच्या डोक्यांतील अन्य कामें व विषय काढून टाकावेत. तुम्ही मुंबईला किती दिवस राहणार आहांत तें कळवावें. आण्णासाहेबहि किती दिवस राहणार आहेत ? कांहीं झालें तरी त्यांच्या कामांत यश मिळविलें पाहिजे. चि. नानाच्या संबंधानें मी त्यांना उद्यां पत्र लिहीन. Administrative service च्या परीक्षेची तयारी तो करीत आहे. परीक्षा जवळ आली आहे म्हणून त्यांच्या लग्नाबद्दल तूर्त विचार करूं नये, असें मला वाटतें. माझा निरोप आण्णासाहेबांना कळवावा. मला येथील हवा मानवेल असें वाटतें. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १५५

श्री

अमळनेर, ता. १७-८-५३

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि.

मिरजेहून लिहिलेलें पत्र पोंचलें. श्री. भाऊसाहेब हिरे यांना काय पत्र लिहावें विचार करीत आहें. उद्यां लिहीन.

आज चि. आण्णासाहेब जलालपूरकरांचें पत्र आलें आहे. त्यांना उत्तर लिहिलें आहे. त्यांत तुझ्या प्रयत्नाचा निर्देश केला आहे. पुंडलीकजी प्रयत्नाची शिकस्त

करतील असें त्यांना कळविलें आहे. या कामीं मी कोणाच्या नांवानें काय पत्र देऊं तें कळवावें. प्रकृति साधारण आहे. लवकर येथून निघावें असें वाटतें. मुंबईला १।२ दिवस राहीन. जयसिंगपुरला एकदां जावेंसें वाटतें. कसें जुळतें पाहीन.

बेळगावहून पत्र नाहीं! पत्र लिहिण्याला सवड होत नसेल. असो.

इकडील सर्व क्षेम आहे. पाऊस बरा पडला. पिकें उत्तम आहेत. आतां उघाडी पडावी. कळावें, हा आ.

गंगाधर देशपांडे

ता. क. :—मुंबईला श्री. भाऊसाहेब जलालपूरकर यांना पत्र लिहिलें.

## पत्र नं. १५६

श्री

अमळनेर, ता. २६-८ ५२

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि.

पत्र पोंचलें. हुदलीचें खादीकाम बंद करण्याचें ठरवलें हें समजलें. यांत वाईट वाटण्यासारखें काय आहे? वीस वर्षे पुष्कळ वर्षे प्रयत्न केला. फल कांहीं नाहीं. हुदली गावांत खादी घालणारे किती आहेत? सूत काढणारे किती आहेत? केवळ मजुरीकरितां कांहीं खेड्यांत सूत काढतात. मजुरीकरितां विणकरी विणतात. पण हें कांहीं 'खादीकार्य' नव्हे. हें ओझें आहे. त्याचा बोजा किती दिवस सहन करावयाचा! गांधींनीं देखील किती संस्था उभारल्या व किती मोडल्या? उपयुक्तता नाहीं असें कळल्यानंतर संस्था चालविण्याचा आग्रह धरणें हा हट्ट आहे, अभिमान आहे. तो दूर सारलाच पाहिजे. यांत वाईट वाटण्याचें कारण नाहीं. तुम्ही योग्य तेंच केलें. डॉ. नानासाहेबाचे उपचार चालू आहेत. कांहीं गुण आहे असें वाटतें. बेळगावकडे पाऊस अद्यापि आहे. जयसिंगपुरला जावें असें मनांत येतें. पुण्याला गेल्यास आळंदीला जाऊन येण्याची इच्छा आहे. पुष्कळ दिवसांपासून जावयाचा संकल्प आहे; या खेपेला तरी पुरा होतो कीं नाहीं पहावें.

इकडील सर्व क्षेम आहे. श्री. काळे यांच्या चिरंजीवांचें नागपूरहून कार्ड आलें आहे. त्यांची अप्रेंटिस म्हणून नेमणूक झाली आहे व ते कामावर गेले. कायमची नोकरी केव्हां लागते पहावें. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १५७

श्री

अमळनेर, ता. ९-८-५४

चि. पुंडलीकजी यांना

आ. वि. सोबतचें पत्र अजितेला द्यावें.

पत्र पोचलें व चि. नानासाहेबांचा लेख वाचला. चांगला आहे. वर्ध्याला पत्र पाठवीन. तुम्ही लिहिलेल्या पत्राखालीं सही केली व पत्र पाठविलें. तुमचा मुक्काम वेळगांवांतच आहे ! माझी प्रकृति बरी आहे. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

चि. अजितेला आशीर्वाद

परीक्षेंत तुझा दुसरा नंबर आल्याचें समजलें. तुझें अभिनंदन. पुढील परीक्षेंत नंबर पहिला आला पाहिजे. चि. बाळच्या परीक्षेचें काय झालें ?

माझी प्रकृति बरी आहे. चि. अरुण व बाळला आशीर्वाद सांग हा आ.

मामा

## पत्र नं. १५८

श्री

श्री. जीवनराव यांना बेळगांव, ता. १२-१०-५६

कृ. सा. न. वि. वि.

काल रोजीं आपलें ६ चें पत्र डॉ. अनंतरावांनीं आणून दिलें. पत्रांतील मजकूर समजला. तुम्ही दूर गेलां आहांत त्यामुळें प्रथम वाईट वाटलें. परिस्थिति प्रतिकूल आल्यामुळें तुम्हांला लांब जावें लागलें, इलाज नाहीं. तथापि तुम्ही धैर्यानें सर्व प्रसंगाला तोंड देत आहांत व कालाचा सदुपयोग करीत आहांत हें पाहून मला संतोष वाटतो. प्रसंगविशेषीं व त्यांतूनहि अडचणीच्या वेळीं मनुष्याची पारख होते. आपल्यावर तसा प्रसंग आला व आपण धैर्यानें त्याला तोंड देत आहांत हें पाहून आपल्याबद्दल अभिमान वाटतो. झाल्यागेल्या गोष्टी विसरून तुम्ही धैर्यानें आयुष्याला प्रारंभ केला आहे याबद्दल तुमचें जेवढें अभिनंदन करावें तितकें थोडेंच आहे. या स्थितींतच तुमच्याबरोबर सुखदुःख अनुभवण्याला तुमची सहधर्मचारिणी आनंदानें तयार झाली ही संतोषाची गोष्ट आहे. याबद्दल सौ. रमाक्कांचें मी आनंदानें अभिनंदन करतों. तुम्ही पुरुष आहांत, प्रपंचांतील सुखदुःखें भोगण्याची शक्ति तुमच्यामध्यें आहे. पण, सौ. रमाक्कांचा संसाराचा अनुभव वेगळा होता. दुसऱ्याचें करण्यांतच आजपर्यंत त्यांचा जन्म गेला. त्यामुळें आतां त्यांना थोडा त्रास होत असावा. तथापि आपण

जवळ आहां व आपलें अनुकरण करण्याची संवय त्यांना असल्यानें त्यांचा कालहि आनंदांत जात असावा. समाचार कळवीत असावें.

माझ्याबद्दल काय लिहू ? वय झालेलें आहे. व्याधि आहे. परमेश्वराच्या कृपेनें मिळालेलें आयुष्य आनंदात व शक्य तितक्या समाधानांत घालवण्याचा प्रयत्न करीत आहें.

घरीं मुलेंबाळें सर्व क्षेम आहेत. डॉ. अनंतरावांचें आम्हाकडे लक्ष आहे, त्यामुळें बरें वाटतें. चि. मोहन मुंबईला गेला आहे. कौन्सिल चालू आहे, संपल्यावर इकडे येईल. कळावें, लोभ असावा ही वि.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १५९

श्री

चि. पुंडलीकजी यांस — बेळगांव ता. १७-१२-५६

आ. वि.

काल तुझी तार पोंचली. मी वाट पहात होतों. आज पत्रहि मिळालें. ऑपरेशनचा फार त्रास झाला नसावा. परमेश्वरकृपेनें सर्व सुरळित झालें, मला आनंद होणें स्वाभाविक आहे. आणखी १५ दिवस तरी हॉस्पिटलमध्यें रहावें लागेल. दुसऱ्या ऑपरेशनची जरुरी नसावी. याबद्दल डॉक्टरांचें मत काय आहे तें कळवावें. कळावें, हा आशीर्वाद.

सोबतचें पत्र चि. नानाला द्यावें.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १६०

श्री

बेळगांव, ता. १७-१२-५६

चि. नानाला आ. वि.

तुझें ता. १५ चें कार्ड आजच पोंचलें. ऑपरेशन बरें झालेंच असेल. तुला त्रास झाला नसावा. डॉ. बालिगा चांगल्या डॉक्टरांपैकीं आहेत. तथापि, पुंडलीकजींची तार येईपर्यंत कालचा आमचा दिवस काळजींत गेला. स्वभावानें तू शांत आहेसच. तुला शांत रहा म्हणून लिहिण्याची आवश्यकता नाहीं.

चि. सौ. वसुंधरा व चि. सदाशिवराव भेटून गेल्याचें समजलें. डॉक्टर सांगतील त्याप्रमाणें वागण्याबद्दल मी तुला लिहावें असें नाहीं. इकडील सर्व क्षेम आहे. पुंडलीकजींना सांगून तुझ्या प्रकृतीबद्दल रोज कळवण्यास सांगावें. कळावें, हा आ.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १६१

श्री

चि. पुंडलीकजी यांस | वेळगांव, ता. १८-१२-५६

आ. वि.

पत्र पोंचलें. चि. नानाच्या प्रकृतीबद्दल समजलें. तो बरा होईपर्यंत रोज एक कार्ड घालून कळवीत असावें. थोडें कमीजास्ती होणारच. पण, आतांपर्यंत पुष्कळ सुधारणा झाली असेल. सर्वांना आशीर्वाद. डॉ. वझे किंवा सौ. वसुंधरा ऑपरेशनच्या वेळीं हजर राहूं शकले नाहींत हें समजलें. तें एटिकेट आहे. एका डॉक्टरच्या हातांत रोगी असला म्हणजे दुसऱ्या डॉक्टरानें त्याच्या संमतीशिवाय हजर राहूं नये. गैरसमज करून घेऊं नये, असें सर्वांना सांगावें. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १६२

श्री

चि. पुंडलीकजी यांस . | वेळगांव, ता. २१-१२-५६

आ. वि.

तुझें कार्ड पोंचलें व चि. नानाची प्रकृति सुधारत असल्याचें समजून आनंद वाटला. काल चि. भाऊसाहेबांना मी पत्र लिहिलें आहे. इकडील सर्व क्षेम आहे. चि. सौ. टकूताईचें कार्ड आलें होतें. मी उत्तर घातलें आहे.

इकडील सर्व क्षेम आहे. जलालपूरकर मंडळींना आशीर्वाद सांगावा. कळावें; हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १६३

श्री

चि. पुंडलीकजी यांस | वेळगांव, ता. २४-१२-५६

आ. वि.

पत्रें पोचलीं. चि. नानाची प्रकृति सुधारत असल्याचें समजून आनंद झाला.

मी कदाचित् धारवाडला एक दिवसाकरितां जाईन. निश्चित नाहीं. प्रो. रामभाऊ रानडे तेथें येणार आहेत. इकडील सर्व क्षेम आहे. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

सर्व मंडळींना आशीर्वाद सांगावा. चि. नानालाहि सांगावा.

## पत्र नं. १६४

श्री

धारवाड, ता. २७-१२-५६

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि.

काल येथें आलों आहें. इकडील सर्व मंडळी क्षेम आहे. प्रो. रामभाऊ रानडे येथें आले आहेत. त्यांना भेटण्याकरितां आलों आहें. उद्यां किंवा परवां हुबळीला जाईन. तेथूनच बेळगांवला जाईन.

चि. मोहन, सौ. प्रमिला व लहान मुलगी आणि मुलगा कोल्हापुरला गेले आहेत. तेथून आज वाडीला जाणार आहेत. परवांपर्यंत परत बेळगांवला येतील. चि. अजिता व अरुणा हंपीला गेल्या आहेत. त्याहि परवांपर्यंत परत येतील. चि. नानाची प्रकृति बरी असेलच. त्याला व इतर मंडळींना आशीर्वाद सांगावा. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १६५

श्री

बेळगांव, ता. ३१-१२-५६

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि.

चार दिवस मी धारवाडला गेलों होतों, काल संध्याकाळीं परत आलों. धारवाडकडे सर्व क्षेम आहे.

चि. नाना हॉस्पिटलमधून घरीं आला असावा. त्याची प्रकृति बरी असल्याचें समजून बरें वाटलें. त्याला भेटण्याची इच्छा आहेच.

३।४ दिवसांनीं निपाळला जाण्याचा माझा विचार आहे. तिकडे गेल्यास ४।५ दिवसांनंतर परत येईन.

आमच्या घरांतील मुलेंबाळें कोल्हापूर व हंपीला गेली होतीं. सर्व परत आलीं. सर्व क्षेम आहे.

चि. नानाला, चि. भाऊसाहेबांना व इतर मंडळींना आशीर्वाद सांगावा. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १६६

श्री

बेळगांव, ता. ९-९-५८

चि. पुंडलीकजी यांस
आ. वि.

तुमचें ता. ८ चें कार्ड पोचलें. सौ. ठकूताईला अद्यापि बरें नाहीं असें दिसतें. मी तिकडे येऊं कीं काय कळव. मलाहि बरें नाहींच. घटप्रभा दवाखान्याला मुंबईचे डॉक्टर येणार आहेत. त्यांना माझी प्रकृति दाखवून येण्याचा विचार आहे.

येथें हवा बरी आहे. पाऊस थोडा थोडा पडतो.

चि. नाना आज सकाळीं भेटला होता, तुमचें कार्ड त्याला दाखविलें. आमच्या घरीं चि. अंजूला खोकला आहे. उपचार चालू आहेत. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १६७

श्री

बेळगांव, ता. १०-९-५८

चि. पुंडलीकला आ. वि.

काल्च्या तारखेचें पत्र पोचलें. मजकूर समजला. सौ. ठकूताईला भेटावयाला येऊं काय ? विचारुन कळवावें. तिकडे सर्वच आजारी आहेत. म्हणून मी तिकडे आलों नाहीं. सर्वांना बरें वाटूं लागलें म्हणजे १।२ दिवसांकरितां येईन. परत येताना सौ. ठकूताईला बेळगांवला घेऊन येईन. सर्वांना आशीर्वाद.

इकडे सर्व क्षेम आहे. चि. नाना काल भेटला होता. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १६८

श्री

बेळगांव, ता. ११-९-५८

चि. पुंडलीकजी यांस
आ. वि.

ता. १० चें कार्ड पोचलें. सौ. ठकूताईला इतकी काळजी कां वाटते ? मी सर्व पाहून घेतों. तिनें कशाकरितां धडपड करावी ? चार दिवस स्वस्थ पडून रहा म्हणून सांग. थोडें बरें वाटलें म्हणजे येथें आमच्याकडे येऊं दे. म्हणजे तिचें म्हणणें मी

सर्व समजून घेईन, व काय करावयाचें तें करतां येईल. आतां प्रकृति बरी नसतांना त्रास करून घेऊं नकोस म्हणून सांग. काळजी करण्यासारखें कांही नाहीं. आज चि. नाना भेटला होता. दररोज एक कार्ड लिहीत जा. सर्वांना आशीर्वाद. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १६९

श्री

बेळगांव, ता. १२-९-५८

चि. पुंडलीकजी यास

आ. वि.

दोन्ही कार्डें पोचलीं. श्री. वडवी येथें आले नसावेत. मला भेटले नाहींत. भेटल्यास तुमचा निरोप कळवतोंच. कार्डहि देतों.

माझी प्रकृति दाखवण्याकरितां मी रविवारीं घटप्रभा दवाखान्यांत जाऊन येणार आहें. सौ. टकूताईला येथें आमच्याकडे ठेवणार आहें. बाकी मुली बऱ्या असतीलच. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १७०

श्री

अमळनेर, ता. ६-१०-५८

चि. पुंडलीकजी यांस आ. वि.

तुमचें मिरजेहून पाठविलेलें पत्र पोचलें व त्यासोबत पाठविलेल्या पत्रिका पोचल्या. श्रीमत तात्यासाहेबांना मीं अभिनंदनपर तार पाठविली होती. त्यांच्या चिरंजीवांचें मला समारंभाला हजर राहण्याबद्दल आमंत्रण आलें होतें. पण मी नुकताच येथें आल्यामुळें मला मिरजेला जाणें शक्य नव्हतें. म्हणून मीं चिरंजीवांना पत्र लिहिलें होतें व श्रीमंतांना तारहि केली. श्रीमंतांनीं तारेचें उत्तर तारेनेंच पाठवलें. एकंदर समारंभ थाटाचा झाला असावा. तुम्ही समारंभाला गेलां होतां हें समजलें. मला बरें वाटलें.

माझी प्रकृति हळुहळु सुधारत आहे. चि. सौ. टकूताईला भेटण्याची इच्छा वाटूं लागली आहे. म्हणून येथून लवकरच निघणार आहें.

येथें हवा सकाळीं बरी असते. पण दोनप्रहरीं बराच उकाडा होतो. सारखा पंखा लावून बसतों.

घरचेच डॉक्टर असल्यामुळें उपचारहि जोरांत आहेत.

दृष्टि फारच मंद झाली आहे. पूर्ण मंद झाल्यानंतर ऑपरेशन करावें लागणार असें डॉक्टर म्हणतात. भोग भोगलाच पाहिजे.

चि. सौ. ठकूताईची आठवण मात्र वारंवार होते. तुम्ही तिच्याकडे जाणार आहांत असें समजून बरें वाटलें. तुम्हांला कामें आहेत हें खरें आहे. तथापि तिच्याजवळ राहून काळजी घ्या. तुमच्याकडून कोणतीहि सेवा घेण्यास मला मुळींच संकोच वाटत नाहीं. तिला मी एक पत्र लिहिलें आहे. तें पोचलें असावें. मी येथून थेट बेळगांवला येईन. मध्यें मुंबईला व पुण्याला उतरणार नाहीं. चि. मोहनला माझ्याबरोबर येण्याबद्दल कळविलें आहे. पराधीनतेचा अनुभव येऊं लागला आहे. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १७१

श्री बेळगांव, ता. १४-१-१९५९

चि. पुंडलीकजी यांस
आ. वि.

तुम्ही तुमच्या दौऱ्यावरून मिरजेला परत आलां असाल. अनगोळच्या श्री. मराठे यांनीं मी जेलमध्यें केलेल्या टिपणांची नक्कल नेली होती. ती तुम्ही त्यांचेकडून परत आणल्याचें समजतें. तुमच्याकडे असल्यास येतांना आणावी. ती येथेंच असल्यास कोठें ठेवली आहे तें कळवावें. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १७२

श्री. बेळगांव, ता. १३-६-५९

चि. पुंडलीकजी यांना आ. वि.

आज श्री. देवगिरीकर येथें आले आहेत. ते उद्यां सकाळीं मोटारीनें पुण्यास जाणार. मी लिहिलेल्या हकीकतीचीं सर्व पुस्तकें त्यांनीं आपल्याबरोबर नेलीं आहेत. वाचून पाहून तीं छापावींत कीं नाहीं याचा विचार करून ते ठरवितील. पुढील आठवड्यांत तुम्हाला सवड होईल तेव्हां पुण्याला जाऊन देवगिरीकरांशीं बोलून काय तें ठरवावें. माझी प्रकृति बरी नसल्यानें १५ दिवसांत मी मुंबईला जाणार आहें. तेथें डॉक्टरांना दाखवून त्यांची संमति मिळाल्यास अमळनेरला जाण्याचा माझा विचार आहे. कसें जुळतें पहावें. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १७३

श्री वेळगांव, ता. २३-९-५९

चि. पुंडलीकजी यांस आ. वि.

तुझे पत्र काल पोचलें. त्याप्रमाणें मी तूं पाठविलेल्या पत्रावर सही करून या पत्रासोबत पाठवीत आहें. पोचल्याचें उत्तर यावें.

श्री. बाबूराव गोखल्यांचा सल्ला घेऊनच काम पुरें करावें. माझी प्रकृति साधारणच आहे. कळावें, लोभ असावा ही वि.

गंगाधर देशपांडे

ता. क.:—तुमचें ता. २२ चें पत्र पोचलें व फोटोबद्दल मजकूर समजला. माझ्या मतें फोटोचा आग्रह धरूं नये. श्री. देवगिरीकर म्हणतात त्याप्रमाणें करावें. पुस्तकात जास्ती फोटो घातल्यास फोटोंचेंच प्रदर्शन होईल. तसें न करतां निवडून काढून योग्य तेवढेच फोटो घालावेत. याबद्दल श्री. बाबूराव गोखल्यांचा सल्ला घ्यावा.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १७४

श्री

श्री. पुंडलीकजी यांना

सा. न. वि. वि.

तुमचीं दोन्ही पत्रें मिळालीं. तीं मीं मामांना वाचून दाखविलीं. त्यांनीं संबंधितांना उत्तर लिहिलें आहेच. त्यांची तब्येत बरी आहे. डॉ. नीं थोडें थोडें हिंडावयाला सांगितलें आहे. म्हणजे फक्त न्हाणीघरापर्यंत जायला परवानगी दिली आहे. बाकी तब्येत बरी आहे. मुंबईला जावयाच्या गोष्टी चालू झाल्या आहेत.

मुलें सर्व बरीं आहेत. चि. अजिता भेटली तर तिला सांगा कीं, सौ. जान्हवी-बरोबर टपा पाठवला आहे. पोहोंचला कीं कळव.

तीं. मधुभाऊ आले तर बरं! कळावें, ही वि.

(मामाच्या आज्ञेवरून) सौ. प्रमिला

## पत्र नं. १७५

श्री वेळगांव, ता. २८-९-५९

चि. पुंडलीकजी यास आ. वि.

तुझें कांहीं पत्र नाहीं. श्री. बापूजी अणे यांचें पत्र आलें आहे. तें यासोबत पाठवीत आहें. माझ्या थैलीं मिळण्याबद्दल एक ड्राफ्ट मीं केला होता. परंतु तो

बेकायदेशीर टरल्यामुळें रद्द झाला. या ट्रस्टसंबंधानें कांहीं मजकूर माझ्या हस्तलिखितांत आला असेल तर तो वगळावा, पुस्तकांत घालूं नये. इतर टिपणें छापायला द्यावींत.

माझी प्रकृति सुधारत आहे. पण अशक्तपणा आहे. कळावें, हा आ.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १७७

श्री

वेळगांव, १-१०-५९

चि. पुंडलीकजी यांस, आ. वि.

तुमचें ता. ३० चें पत्र पोहोंचलें. चित्रशाळेमध्यें माझें पुस्तक छापण्याची आवश्यकता श्री. देवगिरीकरांना वाटत नाहीं असें दिसतें. अशा स्थितींत त्यांना आग्रह करण्याची माझी इच्छा नाहीं. तुम्हीहि दुसऱ्या छापखान्यांत छापवण्याचा प्रयत्न करावा असेंहि आतां मला वाटत नाहीं. तर याबद्दल तुमचा विचार काय ठरतो तें कळवावें. माझ्या लिखाणाचा बोजा दुसऱ्यावर पडावा अशी माझी इच्छा नाहीं. त्यामुळेंच हें हस्तलिखित इतके दिवस पडून होतें. श्री. देवगिरीकरांच्या पत्रामुळें व आग्रहामुळेंच मी तें त्यांच्याकडून छापवण्याचा विचार केला. पण आतां त्यांना तें छापवूं नये असें वाटत असावें असें दिसतें. मी त्यांना आग्रह करणार नाहीं. तुम्हीहि कोणाला आग्रह करूं नये.

कानडीचें भाषांतर कोठपर्यंत आलें हेंहि मला श्री. वडवी यांचेकडून कळलें नाहीं. त्यांना पत्र लिहून भाषांतराचें काम कोठपर्यंत आलें हें कळवण्यास लिहावें. श्री. वडवीकडून पत्र आल्यानंतर मी श्री. दिवाकरांना लिहीन. त्यांची इच्छा काय आहे हें समजून येईल. श्री. वडवीकडून भाषांतर किती झालें आहे याबद्दल मला कांहींच कळलें नाहीं. तुम्हाला कळलें असेल तर मला कळवावें.

माझी प्रकृति अद्यापि असावी तशी नाहीं. डोळ्याला दिसणें अगदीं कमी झालें आहे. म्हणून हें पत्र सौ. प्रमिलेकडून लिहविलें आहे.

पुस्तक छापवण्याचा आपणहि प्रयत्न करूं नये. कानडींत भाषांतर झाल्यावर तेंहि छापवावें किंवा नाहीं याचा विचार करूं. कळावें, लोभ असावा हा आशीर्वाद.

आपला

गंगाधर देशपांडे

पत्र नं. १७८

श्री

बेळगांव, ६-१०-५९

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि.

तुमचें ता. ५ चें पत्र पोहोंचलें, काल श्री. स्वामी आनंदच्या पत्त्यावर मीं एक पत्र पाठविलें आहे. त्यांतच तुम्हाला उद्देशून ४ ओळी लिहिल्या आहेत.

प्रा. न. र. फाटक चिकित्सक आहेत. त्यांना मी पत्र लिहिलेलें कितपत आवडेल हें सांगतां येत नाहीं. त्यांचा विचार काय आहे हें तुम्ही कळवालच.

माझी प्रकृति सुधारत आहे. परंतु डोळ्यांना मात्र दिसत नाहीं. जपाची माळ घेऊन वेळ घालवितों. त्यामुळें बरें वाटतें. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

चि. अरुणा व बाळ कोल्हापुरला गेले आहेत.

पत्र नं. १७९

श्री

बेळगांव, १२-११-५९

चि. पुंडलीकजी यांस, आ. वि.

तुमचें पत्र व फोटो पोहोंचले. दोन दिवसांपासून माझी प्रकृति बरी नाहीं. डॉ. वाळगी इथें नसल्यानें डॉ. हणमशेट यांना प्रकृति दाखविली.

इकडील सर्व ठीक आहे. पुस्तक छापायला सुरुवात झाल्याचें समजलें. त्वकर काम संपावें अशी माझी इच्छा आहे. कळावें, हा आ.

आपला
गंगाधर देशपांडे

पत्र नं. १८०

श्री.

बेळगांव, ता. २१-११-५९

चि. पुंडलीकजी यांना आ. वि.

तुमचें पत्र व कार्ड पोहोंचलें. मजकूर छापण्याला सुरुवात झाल्याचें कळलें, व पहिलें प्रूफ श्रीयुत फाटकांकडे दिल्याचें समजलें. श्री. फाटकांना वेळ मिळेल त्याप्रमाणें

त्यांचेकडून काम होईल. त्यांना विनंति करुन काम लवकर संपवण्यास सांगावें. माझ्या वतीनें विनंति करावी.

माझी प्रकृति वरुन दिसावयाला बरी दिसली तरी ती तितकीशी बरी नाहीं. अशक्तपणा फार वाढत चालला आहे. बाहेरच्या लोकांना तो दिसत नाहीं. परंतु मला अनुभव येत आहे. शक्य तितक्या लवकर पुस्तक बाहेर पडल्यास मला पहावयाला मिळेल. डॉ. याळगींचे उपचार चालू आहेत. ते नसतांना डॉ. हणमशेट येत असत.

स्वामी आनंद आपल्या मुक्कामावर जाणार म्हणून सांगत होते. ते गेले कीं काय कळवावें. त्यांच्या सहवासांत वेळ आनंदांत गेला. माझ्या डोळ्यांना फारच कमी दिसू लागलें आहे. वाचण्याची व लिहिण्याची तर सोयच राहिली नाहीं. परमेश्वराच्या चिंतनांत आनंदानें काल घालवीत असतों.

शक्य तितक्या लवकर पुस्तक छापून प्रसिद्ध व्हावें अशी मनापासून इच्छा आहे. परवां श्री. दिवाकर आले होते. त्यांनीं माझे आत्मचरित्र लवकर छापण्याचें पत्रहि मला लिहिलें आहे. आतां लवकर भाषांतर संपवण्याचें श्री. वडवींना पत्र घालून कळवावें, म्हणजे लवकर काम होईल, व कानडींत पुस्तक लवकरच प्रसिद्ध होईल. तेव्हां गडबडीनें भाषांतर करण्यास लिहावें.

परवां दिवाकर आल्यावेळीं, दिवाकर, मी व स्वामी आनंद अशा तिघांचा मिळून फोटो घेतला आहे. माझ्याकडे कॉपी आली म्हणजे मी तुमच्याकडे पाठवीन. त्याचा उपयोग पुस्तकांत करावा.

शक्य तितक्या लवकर मराठी पुस्तक प्रसिद्ध व्हावें असें मला वाटतें. कळावें, हा आशीर्वाद.

आपला

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १८१

श्री

बेळगांव, २५-११-५९

चि. पुंडलीकजींना आ. वि.

आपलें पत्र पोंचलें. शक्य तितक्या लवकर पुस्तक छापवून प्रसिद्ध करण्याचें काम तुम्ही करीतच आहांत. त्याबद्दल मी विशेष लिहावें असें नाहीं. पुस्तक प्रसिद्ध झालेलें पहाण्याची आतां इच्छा आहे. माझ्या प्रकृतींत कमी जास्त होत असतें. आमचे व्याही डॉ. नानासाहेब व त्यांच्या पत्नी ५-६ दिवसांपासून येथें आहेत. १-२ दिवसांत कोल्हापूरला जातील. वरचेवर पत्र लिहीत असावें. शक्य तितक्या

माझी प्रकृति साधारणच आहे. लवकर पुस्तक छापवले जावे अशी माझी इच्छा आहे. भागवतांना मी वारंवार लिहूं शकत नाहीं. एकदां श्री. श्रीपाद शंकर नवरे यांना लिहावें असें मनांत आहे.

आमच्या वडिलांचा फोटो तयार होऊन मिळाला आहे. पण तुम्ही मुंबईत नसल्याकारणानें तो तसाच माझ्याकडे पडून राहिला आहे. तुम्ही इकडे आल्यावरच तो देईन. कळावें, हा आ.

आपला
गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १८४

श्री. बेळगांव, ता. २६-१-६०

चि. पुंडलीकजी यांस
आ. वि.

माझी प्रकृति दिवसेंदिवस बिघडत चालली आहे! काळाला अनुसरून काय व्हावयाचें तें होईलच. शक्य तितकें लवकर तिकडील काम उरकून घ्यावें. चि. भाऊसाहेब जलालपुरकर यांची मुलगी चि. सौ. इन्दा तिकडेच आहे. शक्य असल्यास तिला भेटावें. स्वामी आनंद मुंबईला आहेत काय ?

श्री. फाटक यांची प्रकृति सुधारत असेल. त्यांना नमस्कार सांगावा. कळावें हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १८५

श्री बेळगांव, ता. २२-१-१९६०

चि. पुंडलीकजींना आ. वि.

पत्र पोचलें. मजकूर समजला. माझी प्रकृति दिवसेंदिवस बिघडत चालली आहे. डॉक्टर Injections देत असतात. त्यामुळें असो किंवा इतर कारणामुळें असो, कसा तरी आतांपर्यंत जिवंत राहिलों आहें. पुस्तक लवकर प्रसिद्ध व्हावें असें मनापासून वाटतें. तें लवकर प्रसिद्ध करण्याची जबाबदारी तुम्हीं पतकरली आहे. ती पार पाडाल अशी आशा आहे. माझ्या लिखाणांत भाषेच्या दृष्टीनें व इतर कारणांनीं वैगुण्य आहे, हें मला माहीत नाहीं असें नाहीं. म्हणूनच तें इतके दिवस पडून राहिलें होतें. तें छापवण्याचें काम तुम्ही आपण होऊन अंगावर घेतलें आहे हें ओळखून त्वरा करावी.

## पत्र नं. १८७

श्री

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि. • वेळगांव, ता. ८-२-६०

५० रु. चा चेक यासोबत पाठवीत आहें. पोचल्याचें उत्तर यावें. माझी प्रकृति दिवसेंदिवस ढासळत चालली आहे. तिकडील काम संपवून लवकर इकडे यावें. कळावें, हा आशीर्वाद. .

आपला

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १८८

श्री वेळगांव, ता. १८-२-६०

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि.

तुमचीं पत्रें पोचलीं. संकेश्वर स्वामींचें नांव मला आठवत नाहीं. माझ्या डोळ्यांना आतां अगदीं कमी दिसूं लागलें आहे. लवकरच अमळनेरला जाऊन डोळ्याचें ऑपरेशन करून घेण्याचा विचार आहे. तुमचें काम लवकर संपवावें व इकडे यावें. कळावें, हा आशीर्वाद.

आपला

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १८९

श्री वेळगांव, ता. २२-२-६०

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि. मी व मोहन उद्यां किंवा परवां बुधवारीं पहांटे मोटारीनें येथून निघणार आहोंत. मोहननें एक नवी मोटार घेतली आहे. पुण्याहून नाशिकला जाऊं. बुधवारीं संध्याकाळीं नाशिकला पोहोंचूं. गुरुवारीं सकाळीं निघून अमळनेरला जाऊं. मी अमळनेरला कांहीं दिवस राहणार आहें. डोळ्याचें ऑपरेशन तेथेंच करून घेणार आहें. मोहन १-२ दिवसांत परत येईल. अमळनेरहून मी परत येईपर्यंत पुस्तक छापून प्रसिद्ध होईल. डावा डोळा अगदींच बिघडला आहे. डॉ. म्हसकर काय म्हणतात पहावें.

पुस्तकाचें काम संपत आलें असेलच. कळावें, हा आ. आपला

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १९०

श्री अमळनेर ता. ३-३-६०

चि. पुंडलीकजी यांस

आ. वि. येत्या मंगळवारीं ता. ८ दिवशीं डॉ. नानासाहेब माझ्या उजव्या डोळ्याचें ऑपरेशन करणार आहेत. ऑपरेशन नंतर २४ तासपर्यंत उताणें पडून रहावें लागेल. २४ तासांनंतर टेकून बसायची परवानगी मिळेल. या परिस्थितींत तुम्ही माझ्याजवळ असणें जरूर वाटतें. याकरितां सोमवारींच तुम्ही येथें येऊन पोहोंचावें. ऑपरेशन झाल्यानंतर बुधवारीं परत जातां येईल. मला मात्र ५।६ दिवस पुढें रहावें लागेल. चि. मोहन बंगलोरला गेला आहे. माझ्या ऑपरेशनकरितां मी त्याला बोलावीत नाहीं. ऑपरेशननंतर ७-८ दिवसांनीं मी मोटारींतून बेळगांवला जाईन. त्या वेळीं मोटार घेऊन येण्याबद्दल मोहनला कळवीन. डॉ. वझे यांचा पत्ता मला कळवावा. त्यांच्या नांवानें मी एक पत्र तुमच्या पत्राबरोबर धाडलें होतें. तें तुम्ही चि. सौ. वसुंधराला आतांपर्यंत दिलें असावें. दिलें नसल्यास त्यांचा पत्ता मला उत्तरीं कळवावा. म्हणजे मी येथून त्यांना पत्र लिहीन. तुम्ही मात्र दोनतीन दिवसांची सवड करून सोमवारीं ता. ७ ला येण्याचे करावें. पुण्याला चि. मोहनची गांठ पडली असावी. मला येथें पोहोंचवून एक दिवस येथें राहून मोहन पुण्याला गेला. पुण्याहून तो व चि. प्रमिला हे बेळगांवला गेले. बेळगावला पोहोंचल्याची मला तार आली. माझी प्रकृति ठीक आहे. कळावें, हा आशीर्वाद.

आपला

गंगाधर देशपांडे

दुपार

ता. क.:—तुमचें दिनांक २-३-६० चें पत्र आतांच मिळालें. मजकूर समजला. ती. मामांना काल्पासून निजवून ठेविलें आहे. त्यामुळें दमा व खोकला जवळजवळ नाहींसा झाला आहे. अशीच प्रगति होत राहिली तर ५-६ दिवसांत टीक उजव्या डोळ्याची काढण्याचा विचार आहे. तेव्हां तुम्ही ४।५ दिवसांनंतर येथें येण्याचें करावें, म्हणजे टीक काढल्यानंतर त्याचेवर २४ तास अटेंडन्स २-३ दिवस तरी पाहिजे म्हणून आपलें येथें येणें आवश्यक आहे. क. लो. अ. ही वि. आपला

ना. वि. म्हसकर

## पत्र नं १९१

॥ श्री ॥ बेळगांव, ता. २३-४-६०

चि. पुंडलीकजींना अ. आ. वि.

माझी स्मरणशक्ति अगदीं कमी झाली आहे. त्यामुळें तुमच्या पत्रांत विचारलेली

माहिती देणें मला कठीण आहे. तथापि प्रयत्न करून पाहतों. आठवण करून देणारेहि येथें कोणी नाहींत.

गोकाकच्या परिषदेला शौकत अल्ली महंमद अल्ली आले होते एवढें आठवतें. पुढें कराचीला जो ठराव पास झाला तो गोकाकच्या सभेतहि त्यांनीं पास करून घेतला. मी तटस्थ होतों. कळावें, हा आशीर्वाद.

आपला
गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १९२

श्री बेळगांव, ता. १६-६-६०

चि. पुंडलीकजी यांस

अनेक आशीर्वाद

तुमचें पत्र पोहोंचलें व पुस्तकाची बहुतेक सर्व तयारी झाल्याचें समजलें. राजेंद्रप्रसाद व अणे यांनीं पुस्तकाच्या प्रस्तावनेदाखल लेख लिहिले व श्री. न. र. फाटक यांनीं प्रुफ तपासून अनेक सूचना केल्या याबद्दल या सर्वांचे आभार प्रकाशकांनीं मानावेत. त्याचप्रमाणें स्वामी आनंद यांनीं हें पुस्तक छापवून प्रसिद्ध करण्याची परवानगी माझ्याकडून मिळविली याबद्दलहि त्यांचे आभार प्रकाशकांनीं मानावेत.

पुस्तकांच्या कांही प्रती तुम्ही मुंबई, पुणें येथें देणार आहांत. त्यांच्या नांवाची यादी तुमच्याजवळ ठेवावी व येतांना घेऊन यावी. त्याशिवाय पुस्तकें आणखी कोणाला पाठवावयाचीं त्याची यादी तुमच्याजवळ आहे. त्या यादीप्रमाणें पुस्तकें मुंबईहूनच पाठवल्यास सोयीचें होईल. बेळगांवला ज्यांना पुस्तकें द्यावयाचीं आहेत तीं येथेंच देतां येतील. मुंबई व पुण्याचीं पुस्तकें तुम्ही द्यावींत व माझ्याकडून हीं पुस्तकें आल्याबद्दल एक नोट छापवून पुस्तकाला चिकटवावी. किंवा तुम्ही लिहून माझ्याकरितां म्हणून सही करावी. पुस्तकाचें काम लौकर संपवून यावें. इकडे देण्याचीं पुस्तकें तुम्ही आल्यानंतर देण्याचें करूं. कळावें, हा आशीर्वाद.

आपला
गंगाधर देशपांडे

ता. क. :—चि. बाळचा पाय बरा आहे. अजून प्लॅस्टरमध्येंच आहे. २२ तारखेला प्लॅस्टर काढावयाचें आहे.

## पत्र नं. १९३

श्री

बेळगांव, दि. २७-६-६०

चि. पुंडलीकजी यांस आ. वि.

तुमच्याकडून पुस्तकाच्या प्रकाशनाचें काम किती झालें व पुस्तक केव्हां प्रकाशित होईल याबद्दल कळवावें. श्री. अणे यांच्याकडून प्रस्तावना आली किंवा नाहीं हें पण समजलें नाहीं. वेळ होत चालला आहे. माझी प्रकृति बरीच अशक्त झाली आहे. बहुतेक सारा वेळ अंथरुणावर पडून रहावें लागतें. पुस्तक प्रसिद्ध करण्याची तुमची इच्छा प्रबळ होती. तिच्यापुढें माझें काहीं चाललें नाहीं. पण पुस्तक प्रसिद्ध झालेलें मी पाहीन कीं नाहीं याबद्दल मला अद्यापहि शंका वाटते. असो!

तुमच्या मर्जीप्रमाणें करावें. कानडी पुस्तक प्रसिद्ध व्हावें अशी माझी इच्छा होती. पण कानडीच्या पुस्तकाचा पत्ताहि नाहीं. श्री. दिवाकर ते छापण्याला तयार आहेत. पण त्यांच्या हातीं कानडी भाषांतर जाईल तेव्हांच छापतील ना! सर्व घोटाळाच झालेला आहे. मी जास्त काय लिहूं! मी अंथरुण धरलें आहे. म्हणून गडबडीनें पुस्तक प्रसिद्ध व्हावें असें मला वाटतें.

तुमच्या मर्जीप्रमाणें तुम्ही करीतच आहां. मी जास्त लिहूं इच्छीत नाहीं. तुम्हीच पुस्तक छापण्याचा सर्व गोंधळ घातलात. तो निस्तरण्याचें काम तुमच्यावरच होतें व आहे. तें काम संपवून आतां त्यांतून तुम्ही मुक्त व्हाल असें दिसतें. जास्त काय कळवूं!

कळावें, लोभ असावा हा आशीर्वाद.

आपला

गंगाधर देशपांडे

## पत्र नं. १९४

श्री

बेळगांव, ता. २९-६-६०

चि. पुंडलीकजी यांस आ. वि.

माझ्या वर्तनानें आभार मानावयाचे असतील, तर ते राजेंद्र प्रसाद, श्री. बापूजी अणे व स्वामी आनंद याचे मानावेत. श्री राजेंद्रप्रसादांनीं माझा व त्यांचा परिचय असल्याचा उल्लेख आपल्या लेखांत केला आहे. श्री. बापूजी अणे यांनीं सर्व पुस्तक वाचून आपली प्रस्तावना लिहिली. चित्रशाळेनें पुस्तक छापविण्याबद्दलची नापसंती दाखवली त्याचें मला आश्चर्य वाटलें व वाईट वाटलें. त्यानंतर तुम्ही तीं पुस्तकें घेऊन

मुंबईला गेलांत व तेथें स्वामी आनंद यांनीं त्यापैकीं कांहीं पुस्तकें वाचलीं व श्री. फाटकांवर पुस्तक छापविण्याची जबाबदारी टाकली. त्याचप्रमाणें प्रेसचे मालक श्री. भागवत यांना बोलवून त्यांना पुस्तकें वाचण्याकरितां दिलीं. छापखान्याच्या मालकांनीं पुस्तकें छापून प्रसिद्ध करण्याच्या दृष्टीनें ती वाचली व श्री. फाटकांनीहि तीं वाचलीं व पुस्तकें छापण्याचा सल्ला दिला. छापखान्याच्या मालकांना तो सल्ला पटला व त्यांनी तें पुस्तक छापण्याचें मान्य केलें. जेलमध्यें असतांना तीं पुस्तकें मी लिहिलीं असल्या-मुळें, कांहीं ठिकाणीं वर्तमानपत्रें व पुस्तकें माझ्याकडे नसल्यामुळें references न देतां जागा सोडली होती. ती सर्व माहिती श्री. फाटकांनीं भरली म्हणून व पुस्तकाचीं प्रुफें तपासलीं म्हणून श्री. फाटकांचे विशेष आभार मानले पाहिजेत. मी त्यांचा ऋणी आहें.

मी मराठींत भाषणें करीत असें व तीं लोकांना पसंत पडत असत. परंतु लेखनाचें काम मी केलेलें नाहीं. साधारणपणें खाजगी पत्रें लिहिण्यापलीकडे मी कांहीं लेखन केल्याचें मला आठवत नाहीं. म्हणून तीं हस्तलिखितें तशीच पडून राहिलीं होतीं. श्री. फाटक व 'मौज' छापखान्याचे मालक श्री. भागवत यांनीं तीं पुस्तकें वाचून छापवण्याचें ठरवलें, याबद्दल मी त्यांचा विशेष आभारी आहें. पुस्तक प्रसिद्ध झाल्यानंतर त्याविषयीं अनुकूल व प्रतिकूल टीका येणें स्वाभाविक आहे. मला त्याबद्दल कांही वाटणार नाहीं. स्वामी आनंद व छापखान्याचे मालक व श्री. फाटक यांना तीं छापवणें योग्य वाटलें यांत मी समाधान मानतों.

माझें वय झालें आहे हें तुम्हाला माहीत आहे व आतां प्रकृतीहि बरी नाहीं. दिवसांतून व रात्रींतून पुष्कळ वेळ पडून रहावें लागतें. झोपहि फारशी येत नाहीं. अशक्तपणाहि वाढला आहे. पुस्तकाचें भाषांतर कानडींतून होऊन तें छापवून प्रसिद्ध झाल्याचें मला पहायला मिळेल असें वाटत नाहीं. तथापि प्रथम मराठींतून तें प्रसिद्ध होत आहे याबद्दल मला आनंद वाटतो. तुमच्यामार्गेहि दुसरीं अनेक कामें असून या पुस्तकाबद्दल तुम्ही बरेच श्रम घेतले म्हणून तुमचे आभार मी मानणें अप्रशस्त दिसत असलें तरी मी मानतों. ४-८ दिवसांत काम संपवून तुम्ही कांहीं पुस्तकें घेऊन इकडे यावें. मुंबईत व पुण्यांत पुस्तकें कोणाकोणास द्यावयाचीं त्याची यादी तुमच्याजवळ आहेच. बाकीचीं पुस्तकें येथून पाठवितां येतील. तरी लवकर यावें. येतांना पुस्तकें आणावीं. तीं येथून पाठवितां येतील. सर्व छापील फॉर्म्स् एकत्रित बांधवून तुम्ही माझ्याकडे पाठविले तें आतांच पोहोंचलें. मी एकदां पुस्तक पाहिलें असें झालें. आतां डॉ. राजेंद्रबाबू राष्ट्रपति व बापूजी अणे यांच्या प्रस्तावनांसहित बांधविलेलें पुस्तक मला पहावयास मिळणारच असा विश्वास वाटूं लागला आहे. पण तें घडून येईल तेव्हांच खरें! कळावें, हा आशीर्वाद.

आपला
गंगाधर देशपांडे

ता. क.:—हें सर्व लिहिल्यानंतर पुन्हा मनांत आल्यामुळें. 'आभार' मीच लिहून सोबत पाठविले आहेत. तोच मजकूर माझ्या सहीनें पुस्तकांत घालावा. ज्या दिवशीं हा मजकूर छापखान्यांत द्याल ती तारीख त्यावर घालावी.

गंगाधर देशपांडे

परिशिष्ट १

[ती. गंगाधरराव यांच्या एका खाजगी पत्रांतील हा उतारा आहे. या पत्रावरून सरदार वल्लभभाई पटेल यांच्याशीं गंगाधररावांचा किती आत्मीयतेचा संबंध होता हें व्यक्त होत आहे. म्हणून हा उतारा येथें दिला आहे. —पुंडलीकजी]

## माझा एकच एक मित्र गेला !

कुंदगोळ,

ता. १८-१२-५०

"सरदारांच्या मृत्युमुळें देशाची भयंकर हानि झाली असें मला वाटतें. राष्ट्र संकटांत आहे. बाहेरून देशाला अनेक बाजूंनीं धोका उत्पन्न होत आहे. पण, त्यापेक्षांहि देशांतील अंतर्गत परिस्थिति जास्ती भयंकर होत चालली आहे. स्वार्थ व सत्तालोलुपता यांचा भयंकर लोभ सुटला आहे. तो दूर झाला नाहीं तर या दुर्दैवी देशाचें काय वाटोळें होईल हें समजत नाहीं. गांधीजी, सरदार, लोकमान्य वगैरे नेत्यांनीं आपली सर्व पुण्याई खर्च केली व मेल्याप्रमाणें झालेल्या या देशांत चैतन्य ओतलें. त्याचा परिणाम होऊन आज देश स्वातंत्र्य उपभोगीत आहे. या वेळीं तरुण पिढीनें आपली जबाबदारी ओळखून स्वातंत्र्य म्हणजे काय, त्यांत माझें कर्तव्य काय, वगैरेंची जाणीव ठेवून वागलें पाहिजे. या दृष्टीनें मार्गदर्शन करणाऱ्या खंबीर, धूर्त, मुत्सद्याची राष्ट्राला अपेक्षा आहे. सरदार या सर्व गुणांचा पुतळा होते. परमेश्वरानें त्यांना कां नेलें समजत नाहीं! २-३ दिवस मी सारखा विचार करीत आहें. सरदारांनीं केलेल्या कामाचें चित्र माझ्या डोळ्यांपुढून जात नाहीं. त्यांचें काम मागें राहिलेल्या लोकांना स्फूर्तिदायक होईल काय, हा विचार मनांत येतो व मन अस्वस्थ होतें.

व्यक्तिशः माझे व त्यांचे संबंध जिव्हाळ्याचे होते. माझ्यावर त्यांचा विश्वास होता असें मला वाटतें व त्या दृष्टीनें मला दुःख होणें स्वाभाविक आहे. १९१८ पासून आतांपर्यंत माझा व त्यांचा संबंध; अलीकडे तर तो अगदीं निकटचा आहे असें मला वाटत होतें. मीं कांहीं विचारलें व लिहिलें तरी त्याचा योग्य विचार होत असे, त्यामुळें मला एक मोठा आधार आहे असें वाटत होतें. इतक्या जिव्हाळ्याचा स्नेही आतां मंत्रिमंडळांत नाहीं. माझा स्वतःचा मीं कधीं फायदा करून घेतला नाहीं. पण

सार्वजनिक कामांत ती एक माझ्या विश्वासाची जागा होती. माणसाला-व ज्या स्थितींत मी आहें त्या स्थितींतील माणसाला-कांहीं विश्वासाच्या जागा असाव्या लागतात. सार्वजनिक कामांतील ती जागा गेली असें वाटून मन उद्विग्न होतें !

परमेश्वर ठेवील तितके दिवस राहणें भाग आहे. त्यांच्याच प्रसादानें माझा व तुमच्या घराण्याचा संबंध आला व मला स्नेह म्हणजे काय वस्तु आहे याचा अनुभव आला. त्यामुळेंच माझें आयुष्य वाढण्याला मदत झाली. पण, माझ्यासारख्याचें आयुष्य वाढावें व सरदारांना एवढ्यांत मरण यावें हा न्याय कोठला ? हा विचार मनांतून जात नाहीं !

नाशिक कॉंग्रेसला त्यांच्या भेटीकरितांच गेलों. व्यासपीठावर भेट झाली. सर्वांसमक्ष कडकडून मिठी मारली. प्रेम ओसंडत होतें हें मी कसें विसरणार ! तीच अखेरची भेट झाली. अपरिचित लोकांना सरदारांची त्या वेळची ही वागणूक चमत्कारिक वाटली व मी कोण याची चर्चा सुरू झाली ! असो. लिहावें तितकें कमी आहे."

गंगाधर देशपांडे

परिशिष्ट नं २

[पत्र नं. ४५ मध्यें ज्या अरविंदबाबूंच्या पत्राचा उल्लेख आला आहे, तें मूळ इंग्रजी पत्र व त्याचा मराठी अनुवाद येथें दिलेला आहे. —पुंडलीकजी]

# योगी अरविंदांचें अस्सल 'राजकीय मृत्युपत्र'

Pondicherry,
Jan. 5, 1926.

Dear Baptista,

Your offer is a tempting one, but I regret that I cannot answer it in the affirmative. It is due to you that I should state explicitly my reasons. In the first place I am not prepared at present to return to British India. This is quite apart from any political obstacle. I understand that up to last September the Government of Bengal (and probably the Government of Madras also) were opposed to my return to British India and that practically this opposition meant that if I went back I should be interned or imprisoned under one or other of the beneficient Acts which are apparently still to subsist as helps in ushering in the new era of trust and co-operation. I do not suppose other Governments could be any more delighted by my appearance in their respective provinces. Perhaps the King's Proclamation may make difference, but that is not certain, since as I read it, it also does not mean an amnesty, but an act of gracious concession and benevolence limited by the discretion of the Viceroy. Now I have too much work on my hand to waste my time in the leisured ease of an involuntary Government guest. But even if I were assured of an entirely free action and movement, I should yet not go just now. I came to Pondicherry in order to have freedom and tranquillity for a fixed object having nothing to do with present politics—in which I have taken no direct

part since my coming here, though what I could do for the country in my own way I have constantly done—and until it is accomplished it is not possible for me to resume any kind of public action. But if I were in British India, I should be obliged to plunge at once into action of different kinds. Pondicherry is my place of retreat, my cave of Tapasya,—not of the ascetic kind, but of a brand of my own invention. I must finish that, I must be internally armed and equipped for my work before I leave it.

Next in the matter of the work itself. I do not at all look down on politics or political action or consider I have got above them. I have always laid a dominant stress and I now lay an entire stress on the spiritual life, but my idea of spirituality has nothing to do with ascetic withdrawal or contempt or disgust of secular things. There is to me nothing secular, all human activity is for me a thing to be included in a complete spiritual life, and the importance of politics at the present time is very great. But my line and intention of political activity could differ considerably from anything now current in the field. I entered into political action and continued it from 1903 to 1910 with one aim and one alone, to get into the mind of the people a settled will for freedom and the necessity of a struggle to achieve it in place of the futile rubling Congress methods till then in vogue. That is now done and the Amritsar Congress is the seal upon it. The will is not as practical and compact nor by any means as organised and sustained in action as it should be, but there is the will and plenty of strong and able leaders to guide it. I consider that in spite of the inadequacy of the Reforms the will to self-determination, if the country keeps its present temper, as I have no doubt it will, is bound to prevail before long. What pre-occupies me now is the question what it is going to do with its self determination, how will it use its freedom, on what lines is it going to determine its future?

You may ask why not come out and help myself so far as I can in giving a lead? But my mind has a habit of

running inconveniently ahead of the times,—some might say, out of tune altogether into the world of the ideal. Your party, you say, is going to be a social democratic party. Now I believe in something which might be called social democracy, but not in any of the forms now current, and I am not altogether in love with the European kind, however great an improvement it may be on the past. I hold that India having a spirit of her own and a governing temperament proper to her own civilization, should in politics as in every thing else strike out her own original path and not stumble in the wake of Europe. But this is precisely what she will be obliged to do, if she has to start on the road in her present chaotic and unprepared condition of mind. No doubt people talk of India developing on her own lines, but nobody seems to have very clear or sufficient ideas as to what those lines are to be. In this matter I have formed ideals and certain definite ideas of my own, in which at present very few are likely to follow me, since they are governed by an uncompromising spiritual idealism of an unconventional kind and would be unintelligible to many and an offence and stumbling block to a great number. But I have not as yet any clear and full idea of the practical lines; I have no formed programme. In a word, I am feeling my way in my mind and am not ready for either propaganda or action. Even if I were, it would mean for some time ploughing my lonely furrow or at least freedom to take my own way. As the editor of your paper, I shall be bound to voice the opinion of others and reserve my own, and while I have full sympathy with the general ideas of the advanced parties so far as concerns the action of the present moment and, if I were in the field would do all I could to help them, I am almost incapable by nature of limiting myself in that way, at least to the extent that would be requisite.

Excuse the length of this screed. I thought it necessary to explain fully so as to avoid giving you the impression that I declined your request from any affectation or reality of spiritual aloofness or wish to shirk the call of the country or want of sympathy with the work you and others

कल्पनेप्रमाणें या तपस्येचें स्वरूप राहील. हें स्थान सोडण्यापूर्वी आध्यात्मिक दृष्टीनें अवश्य ती साधनसामुग्री आपणाजवळ असली पाहिजे असें मला वाटतें.

आतां तुम्ही लिहिलेल्या कामाविषयीं लिहितों. राजकारणाकडे–राजकीय चळवळीकडे–मी तुच्छतेनें पाहतों असें मुळींच नव्हे. असलीं कामें करण्याच्या पलीकडे मी गेलों आहें, असाहि अर्थ नव्हे. आध्यात्मिक जीवनावर मी वारंवार जोर देत आलों आहें; आणि आतां तर मी त्यावर संपूर्णच जोर देत आहें. परंतु संन्यासाच्या निवृत्तीपेक्षां माझी आध्यात्मिक जीवनाची कल्पना निराळी आहे. त्यामध्यें ऐहिक गोष्टींविषयीं तिरस्काराचाहि अंतर्भाव होत नाहीं. किंबहुना माझ्या दृष्टीनें ऐहिक असें कांहींच नाहीं. प्रत्येक मानवी कृतीचा संपूर्ण आध्यात्मिक जीवनामध्यें समावेश केला गेला पाहिजे असें मला वाटतें. सध्यांच्या काळांत राजकारणाचें महत्त्व फार आहे. पण आज चालू असलेल्या राजकारणाहून राजकीय चळवळींविषयींची माझी कल्पना फार निराळी आहे.

इ. स. १९०३ मध्यें मी राजकीय चळवळींत पडलों आणि १९१० पर्यंत राजकारण चालविलें. त्यावेळेपर्यंत कॉंग्रेसनें स्वीकारलेल्या निरर्थक मार्गाऐवजीं जनतेमध्यें स्वातंत्र्याची दृढ लालसा उत्पन्न करणें आणि तें मिळविण्यासाठीं लढा देण्याची आवश्यकता पटवून देणें हा एकच एक हेतु त्यावेळीं माझ्या डोळ्यासमोर होता. तो हेतु आतां सिद्धीस गेलेला आहे. अमृतसरच्या कॉंग्रेसनें या इच्छापूर्तीवर आपलें शिक्कामोर्तब केलें आहे. स्वातंत्र्याच्या या लालसेला असावें तेवढें व्यावहारिक आणि एकजीवी स्वरूप अद्यापि आलेलें नाहीं किंवा तिच्या पूर्तीसाठीं करावयाच्या कृतीला असावें तेवढें संघटित आणि चिकाटीचें स्वरूप आलेलें नाहीं. पण स्वातंत्र्याची लालसा उत्पन्न झाली आहे आणि मार्गदर्शनाकरितां पाहिजे तेवढें सामर्थ्य आणि लायख पुढारी लाभलेले आहेत. मला असें वाटतें कीं, मिळालेल्या राजकीय सुधारणा अपुऱ्या असल्या तरी स्वयंनिर्णयाविषयींचा आपला निर्धार देशानें कायम ठेवला तर–आणि तो कायम राखला जाईल याविषयीं मला संशय वाटत नाहीं—या निर्धाराला अल्प काळांत यश आल्यावांचून राहाणार नाहीं. सध्यां माझ्या डोक्यामध्यें एकच विचार घोटाळत आहे. तो असा कीं, हा स्वयंनिर्णयाचा हक्क आम्ही कशा रीतीनें उपयोगांत आणूं? स्वातंत्र्याचा उपयोग आम्ही कसा करून घेऊं, आणि आपल्या भवितव्याची रूपरेखा आम्ही कशा तऱ्हेनें निश्चित करूं?

यावर तुम्ही स्वाभाविकच असा प्रश्न विचाराल कीं, या प्रश्नांचें उत्तर देण्यासाठीं मी माझ्या एकांत स्थलांतून बाहेर येऊन देशाला मार्गदर्शन कां करूं नये? पण काळाच्या पुढें, कोणाची सोय न पहातां, धांवण्याची माझ्या मनाला खोड लागलेली आहे. कदाचित् कोणी याला व्यवहार सोडून ध्येयसृष्टींतील संचार असेंहि नांव देईल. तुम्ही लिहितां कीं तुमच्या पक्षाचे नांव सोशल डेमॉक्रॅटिक पक्ष असें राहणार आहे. ज्याला कदाचित् सोशल डेमॉक्रसी म्हणतां येईल अशा कांहीं तत्त्वांवर माझा विश्वास आहे. पण सध्यां प्रचलित असलेल्या कोणत्याहि राज्यपद्धतीवर माझा विश्वास नाहीं. युरोपांत

चालू असलेल्या तर कोणत्याच राज्यपद्धतीविषयीं मला प्रेम वाटत नाहीं; मग भूतकाळांतील कोणत्याहि पद्धतीची ती सुधारलेली आवृत्ति असो.

आपल्या संस्कृतील अनुरूप अशी "अस्मिता" आणि प्रकृति असलेल्या हिंदुस्थानानें इतर प्रत्येक गोष्टीप्रमाणें राजकारणांत स्वतःचा असा स्वतंत्र मार्ग चोखाळावा. युरोपच्या पाठीमागून पाऊल टाकीत ठेचाळूं नये असें मला वाटतें. पण सध्यांच्या गोंधळलेल्या आणि तयारी नसलेल्या मनःस्थितींत या रस्त्यानें पाऊल टाकावयाचें झालें तर नेमकी तीच गोष्ट हिंदुस्थानाला करावी लागेल. हिंदुस्थान आपल्या स्वतःच्या मार्गानें जात आहे अशी भाषा कांहीं लोक वापरीत असतात यांत संशय नाहीं; परंतु हा स्वतःचा मार्ग म्हणजे काय याची कोणालाच स्पष्ट आणि पुरेशी कल्पना असल्याचें दिसत नाहीं. या बाबतींत मी स्वतः कांहीं ध्येयें व कल्पना निश्चित केल्या आहेत. पण सध्यां फारच थोडे लोक त्यांचा स्वीकार करतील. कारण या कल्पना सध्यां रूढ नसलेल्या, आध्यात्मिक ध्येयवादावर आधारलेल्या असून त्या बाबतींत तडजोडीसाठीं कोणाशींहि मिळतें घेण्याइतक्या लवचिक नाहींत. या कल्पना कांहीं लोकांच्या बुद्धीला ग्राह्य होणार नाहींत तर कित्येक लोकांना उपमर्दकारक व अडचणीच्याहि वाटतील. तथापि व्यावहारिक मार्गाविषयीं मला अद्यापि स्पष्ट आणि संपूर्ण कल्पना करतां आलेली नाहीं. माझेजवळ तयार असा कार्यक्रम नाहीं. एका शब्दांत सांगावयाचें म्हणजे माझ्या मनांतल्या मनांत मी मार्गाचा शोध घेत आहें. आणि प्रचाराला किंवा प्रत्यक्ष कृतीला अद्यापि माझी तयारी नाहीं. आणि तशी तयारी असली तरी, कांहीं दिवस तरी मला एकट्यानेंच त्या मार्गानें जावें लागेल किंवा माझ्या मार्गाचें स्वातंत्र्य मला ठेवावें लागेल. तुमच्या पत्राचा संपादक व्हावयाचें म्हणजे मला माझीं मतें बाजूला ठेवून दुसऱ्यांचीं मतें मांडावीं लागतील. आणि सध्यांच्या क्षणीं करावयाच्या कार्यासंबंधीं पुढारलेल्या पक्षांच्या सर्वसामान्य कल्पनांशीं माझी पूर्ण सहानुभूति असली तरी—आणि मी प्रत्यक्ष आखाड्यांत असतों तर मी त्यांना शक्य ती मदत केली असती तरी-प्रकृतितः मी तशा प्रकारें स्वतःला अवश्य ती मर्यादा घालून घेण्यास जवळजवळ असमर्थ आहे.

माझें हें वेचक लिखाण बरेंच लांबलें, याबद्दल क्षमा करावी. तुम्ही किंवा दुसरे जें स्तुत्य काम करीत आहा त्याबद्दल मला कसलीच सहानुभूति नाहीं, देशाच्या हांकेला 'ओ' देण्याची मी टाळाटाळ करीत आहें, किंवा खऱ्या अथवा खोट्या आध्यात्मिक अलिप्ततेमुळें मी आपल्या विनंतीचा अव्हेर करीत आहें असा तुमचा गैरसमज होऊं नये म्हणून पूर्ण विस्तार करण्याची मला जरुरी वाटली. तुमची निराशा करावी लागत आहे याबद्दल पुन्हा मी दुःख व्यक्त करतों.

आपला
अरविंद घोष

परिशिष्ट नं. ३

[ती. गंगाधरराव देशपांडे यांचें देहावसान दि. ३० जुलै १९६० रोजीं पहाटे ४-५० वाजतां झालें. त्यापूर्वी म्हणजे आदल्या दिवशीं रात्रीं ७ ते ९। पर्यंत मी गंगाधररावांशीं सहज बोलत बसलों होतों. त्यांच्याशीं झालेली ही माझी शेवटचीच मुलाखत ठरली. त्याचा सारांश त्यांच्या देहावसानानंतर दोन दिवसांनी मी स्मरणानें लिहून काढला आहे. तोच–त्यांतील घरगुती खाजगी कांहीं गोष्टी गाळून—मी या ठिकाणीं दिला आहे. —पुंडलीकजी]

## 'कर्नाटक–सिंहा'चे अखेरचे क्षण

"मला कशासाठीं बोलाविलें? कांहीं काम आहे काय?"

"ये, बस. आतां मरणांत कोठेंतरी जाऊं नकोस. मी आतां फार काळ टिकणार नाहीं. मुंबईला वगैरे जाण्याचा बेतहि रहित कर. नाहींतर अगदीं आयत्या वेळीं गैरहजर रहाशील."

"ज्योतिषांचें म्हणणें आहे कीं, आणखी दोन वर्षे तुमच्या जीवाला कांहीं धोका नाहीं."

### भविष्यावर कसला विश्वास ठेवतोस?

"काय त्या ज्योतिषावर विश्वास ठेवतोस? तुला हा नाद काय लागला आहे? तुझ्या विचारांना हें शोभत नाहीं."

"कित्येक वेळां भविष्यें खरीं येतात तीं कशीं?"

"कांहीं चांगलीं व कांहीं वाईट अशीं भविष्यें सांगत सुटावयाचें! कांहीं तरी व्हावयाचें असतेंच. तूं माझ्याजवळ इतकीं वर्षे राहिला आहेस. शेवटीं चुकूं नकोस एवढेंच मला सांगावयाचें आहे. तूं आपलें सर्व आयुष्य माझ्यासाठीं व मी करीन त्या चळवळीसाठीं खर्च केलें आहेस. मी मात्र तुझ्यासाठीं कांहींहि व्यवस्था करून ठेविलेली नाहीं. मला तूं क्षमा केली पाहिजेस. तुला परिस्थिति माहीतच आहे. कांहीं देण्याची वृत्ति माझ्यामध्येंच नाहीं असें तूं समजलास तरी तें सर्वस्वी खोटें आहे असें नाहीं."

'मी कांहीं तुमची विधवा नव्हे. मी पैशासाठीं तुमच्याकडे आलोंच नाहीं! तुम्ही

मला जो अनुभव दिला आहे त्याची किंमत फार मोठी आहे. इतक्या साधन-सामुग्रीवर मला जगतां आलें नाहीं तर मी मरण्यालाच लायक नव्हे काय? शिवाय परिस्थिति मलाहि माहीत आहे. याचा ऊहापोह पूर्वी एकदां असाच झालेला आहे. पुन्हा हा विषय डोक्यामध्येंसुद्धां येऊं देऊं नका."

"तुला देण्यासारखें माझ्याकडे काय आहे?"

"तुम्ही प्रश्नच काढलात म्हणून मी तुम्हांला सांगूं इच्छितों. मला कांहीं द्यावयाचेंच असेल तर तुम्हीं गेल्या बारा वर्षांमध्यें रोज जी डायरी लिहीत आलां आहांत, तीं डायरीचीं पुस्तकें मला द्या, मी त्यांचा उपयोग करीन. नाहीं तर त्या वह्या अशाच पडून नाहींशा होणार आहेत. त्यांत घरगुती ज्या गोष्टी असतील त्या मी जाहीर कशाला करूं? एवढा विवेक मला नाही काय? मावळणकरांच्या ज्या डायऱ्या प्रकाशित झाल्या आहेत त्यांपेक्षां तुमच्या डायऱ्या किती तरी पटींनीं उत्तम आहेत."

"त्या डायऱ्यांच्या वह्या घेऊन जा. त्याचें तुला वाटेल तें कर."

"मग तसें कांहीं तरी लिहून ठेवा."

"मला त्याची जरुरी वाटत नाहीं. मोहन तुला त्या डायऱ्या खात्रीनें देईल.'

## आत्मचरित्राबद्दल

"भागवतांनीं आपल्या पत्रामध्यें आणखी काय लिहिलें आहे? पुस्तक (जीवन कथा) कधीं तयार होणार म्हणे! बाजारांत पुस्तक विक्रीला आलेलें मी पाहणार किंवा नाहीं? कानडी भाषांतर छापलेलें मी पाहीन असें मला वाटत नाहीं. तो वडवी काय करतो आहे? त्याच्या हातून तें समग्र कानडी भाषांतर होणार आहे ना? नाहींतर अल्ड्रांची मदत घे म्हणावें. मी त्याला परवां बोललों थोडें! एकदां लवकर कानडी भाषांतर करून संपव असें मी त्याला सांगितलें आहे. तूंहि सांग."

"तें समग्र भाषांतर मी स्वतः वडवीजवळ बसून तपासल्याशिवाय मी तें छापवूं देणार नाहीं. आतां आम्ही दोघे एक महिनाभर धारवाडांत बसणार आहोंत. एक खोली धारवाडांत भाड्यानें घेतली आहे. तेथें राहून तें भाषांतराचें काम या महिन्यामध्यें संपविणार आहोंत."

## अक्षराचाहि बदल नको!

"कालच दिवाकरांचें या कानडी भाषांतरासंबंधांत एक पत्र आलें असून, मीं तुम्हाला तें दाखविलेंच आहे. त्याबद्दल तुमचा काय विचार आहे?"

"त्यांचीं दोन पत्रें आलीं आहेत. तीं माझ्या ध्यानांत आहेत. एका पत्रानें कानडी पुस्तक छापण्याचें त्यांनीं मान्य केलें आहे. दुसऱ्या पत्रामध्यें The Book should be cast in the best form असें त्यांनीं लिहिलें आहे. मला त्याचा अर्थच कळत नाहीं. मी जें लिहिलें आहे त्यांत अक्षराचाहि बदल करावयाचा नाहीं आणि त्यांत त्यांनीं 'हुकेरीकर हें काम करतील' असेंहि लिहिलें आहे. माझ्या लिखाणांत हुकेरी-

कर कोण बदल करणार? मला कांहीं हें कळत नाहीं. एक कागद घेऊन ये. दिवाकरांना एक पत्र लिहूं या. मी सांगतों तें लिही."

"दिवाकरांनीं तुमच्या पत्रामध्यें I have just written to Pundlikji असेंहि लिहिलेलें आहे. त्यांचें तें पत्र मला उद्यां येईल. तें पाहून मगच त्यांना लिहा. कर्नाटकाच्या दृष्टीनें कांहीं घटनांचा व कांहीं कार्यकर्त्यांचा त्यांत उल्लेख व्हावा असें त्यांना वाटत असल्यास त्याचा विचार तुम्हीं करावा. त्यांत काय बिघडलें?"

## या आठवणी आहेत

"शहाणाच दिसतोस कीं! अरे, मीं ज्या आठवणी तुरुंगांत मित्रांना सांगितल्या त्यांचेंच हें टिपण आहे असें मी त्यांत स्पष्ट लिहिलें आहे. मग ज्या गोष्टी मी तुरुंगांत सांगितलेल्या नाहींत किंवा सांगण्यास विसरलों, त्या गोष्टींचा उल्लेख आतां यांत कसा करतां येईल? आणि तेथें ज्या गोष्टी सांगितलेल्या आहेत त्यांतील कांहींहि वगळतां किंवा गाळतांहि येणार नाहीं. एवढी साधी गोष्ट तुला समजत नाहीं का?"

"मी तुमच्याच मताचा आहें. पण त्यांची बाजू अधिकांत अधिक उत्तम काय असूं शकेल याचा मी अंदाज घेत होतों इतकेंच!'

## परीक्षणें पाहूं देत

"माझ्या पुस्तकावर महाराष्ट्रामध्यें अनुकूल प्रतिकूल परीक्षणें येणारच. मला तीं पहावयाचीं आहेत. म्हणून मी गडबड करीत होतों. पण तुला कामें फार! माझ्या पश्चात् प्रा. न. र. फाटक, नवरे, आप्पा खाडिलकर हे लोक टीकाकारांना उत्तरें देतील. अत्रे देखील माझें लिखाण उचलून धरतील असें मला वाटतें. त्यांनाहि एक प्रत भेट म्हणून दे. हो, बरी आठवण झाली. परवां केलेली यादी घेऊन ये पाहूं. एकदां ती वाच. त्यांत आणखी कांही नांवें अधिक घालावयाचीं आहेत. आप्पा खाडिलकर व अत्रे यांचीं नांवें त्यांत आहेत ना?

"तीं नांवें त्यांत आहेत. उद्यां पुन्हा एकदां तीं नांवें मी वाचून दाखवीन. हें कानडी पुस्तक आपल्या पश्चात् छापविण्याचा प्रसंग आल्यास दिवाकर काय करतात पहावें!"

"मुंबईहून येतांना तीं पुस्तकें चांटीतच इकडे ये. ज्यांना पोस्टानें पाठवावयाचीं आहेत, तीं त्यांना मुंबईहूनच पाठीव. कर्नाटकांतील जीं नांवें आहेत त्यांना बेळगांवहून पाठवूं या."

"प्रा. न. र. फाटक "नवभारत" मध्यें तुमच्या या पुस्तकाचें परीक्षण लिहिणार आहेत. मीं गेल्या खेपेलाच तुम्हाला हें सांगितलें होतें. तुमच्या ध्यानांत नाहीं!"

"ध्यानांत काय नाहीं म्हणतोस? माझ्या सर्व ध्यानांत आहे. 'नवभारत' म्हणजे लक्ष्मणशास्त्री काढतात तेंच ना? चांगलें चाललें आहे काय?'

"त्याचें एक संपादक मंडळ आहे. बाहेरच्या लेखकांचे लेखहि त्यांत येत असतात. मोठें गंभीर व भारदस्त मासिक आहे तें!'

## मग तें चालणें कठीण!

"असं का? मग तें महाराष्ट्रांत चालणें कठीण आहे. किती भारदस्त मासिकें महाराष्ट्रांत बंद करावीं लागलीं आहेत. यादी सांगूं काय? तो जांभेकर आतां काय करीत असतो रे? तोहि आतां म्हातारा झाला असेल. त्याचीं कांहीं पुस्तकें, तीनचार भाग माझ्याकडे आले होते तेंच ना? आम्ही त्याला त्याची किंमत तरी पाठवली आहे काय?"

"कांहीं पाठविलेलें नसावें. पुष्कळांनीं कांहींहि पाठविलेलें नाहीं असें एकदां ते सहज माझ्याकडे म्हणत होते."

## सम्मेलन करून काय मिळवलेंस?

"तुझ्या मिरजेच्या मराठी साहित्य संमेलनाच्या वेळीं त्यांची कांहीं गडबड मीं वाचली होती. मराठी-साहित्य समेलन करून काय मिळविलेंस?"

"दोनतीन शत्रू वाढवून घेतले आहेत! पण त्याला कांहीं इलाज नव्हता."

"आमच्या प्रमिलेसाठीं 'जीवनकथे'ची एक प्रत विशेष चांगली कातडी बाइंडिंगची करवून त्यावर सोनेरी नाव घालून तयार करून घेऊन घे, ती माझ्या हातानें मी तिला देईन. तो वडवी गेला कोठें?

## बेळगांव आणि कानडी लोकसंख्या

"वडवील आता येथें घरें फार झालीं आहेत. त्याच्या पत्नीचे दोन भाऊ, दोघांचीं बिऱ्हाडें बेळगांवांतच झालीं आहेत. शिवाय त्याच्या जांवयाची बदलीहि येथेंच झाली आहे. येत्या खानेसुमारीच्या वेळीं बेळगावांतील कानडी लोकांची सख्या वाढवून दाखवावयाची आहे ना? त्यापैकींच या सर्व बदल्या आहेत."

"तुझें एक भलतेंच कांहीं तरी! अशी वाढवून कानडी लोकसंख्या किती वाढणार आहे? ४।५ टक्क्यापेक्षां अधिक वाढूं शकणार नाहीं. शिवाय या प्रश्नाचा विचार होईल तो १९५१ सालच्या खानेसुमारीप्रमाणेंच होईल असे मला वाटतें. यशवंतराव चव्हाण काय म्हणतात? त्यांना कधीं भेटला होतास काय? परवांच्या संपाला, गुजरात व महाराष्ट्र राज्यांनी कसा बंदोबस्त ठेविला होता, त्याची न सांगतां तुलना होऊन गेली. त्यांत जीवराजपेक्षां यशवंतराव अधिक चांगले दिसले. यशवंतरावानें छडीशिवाय कांहीं वापरलेलें दिसत नाहीं. गुजरातमध्यें गोळीबार व लाठीचार्ज झाला होता. अन्यांची टीकाहि यशवंतरावांनीं पचवून टाकिली. अन्यांना कधीं भेटतोस काय? त्यांच्या लिखाणाचा तुला मोह आहे हें मला माहीत आहे."

"एकदोन वेळां भेटलों होतों. विशेष कांहीं बोलणें झालें नाहीं. कॉफी घेऊन आलों इतकेंच. तुमचें नांव निघालें होतें. तुमच्याविषयीं त्यांना आदर आहे पण तुमचीं प्रांतरचनेच्या बाबतींतील मतें त्यांना पसंत नाहींत."

'तुझें कर्ज किती राहिलें आतां?'

## कर्ज करून देशभक्ति नको

"सातआठ हजार रुपये लोकांचें द्यावयाचे आहेत पण ज्यांचे पैसे मी द्यावयाचे आहेत, त्यांपैकीं कोणीहि मला कोर्टांत खेंचणारे नाहींत."

"कर्ज करून देशभक्ति कधींहि करूं नये. आपल्याजवळ असेल तें सर्व वाटल्यास देऊन टाकावें. पण कर्ज काढून चळवळी करूं नयेत. कामें कधींच अडून बसत नसतात. या बाबतींत तुझी चूक झाली आहे."

"सेनापति बापट काय करतात? त्यांचें अरविंदाच्या 'लाईफ डिव्हाइन'चें मराठी भाषांतर प्रकाशित झालें काय? तूं पाहिलें आहेस काय? माझ्या मतें तो खरा वेदांती प्राणी आहे. त्याच्या वाढदिवसाला त्याना भेटून माझ्या पुस्तकाची एक प्रत माझ्या वतीनें दे.

"माझ्याकडे तें आलें आहे. उद्यां सकाळीं दाखवीन. कांहीं भाग वाचूनहि दाखवीन. एकच भाग प्रसिद्ध झाला आहे. आणखी दोन भाग प्रकाशित व्हावयाचे आहेत. तीन भागांची किंमत ३५ रुपये आहे, पण आज २५ रुपये दिले म्हणजे तिन्ही भाग यथाकाल मिळत रहातात."

## आधीं कोण जातं पाहूं ?

"ते आणवून घे. मोतीबिंदूचें ऑपरेशन होऊन मला पुन्हा दिसूं लागलें म्हणजे ते वाचून पाहूं. ऑपरेशन झाल्यावर मला दृष्टि येणार आहे किंवा नाहीं कोणास ठाऊक!! पण आधीं डोळे जातात का आधीं मीच जातों पाहूं या. गेल्या आठवड्यापासून माझें पोट बिघडल्यामुळें मला शंका येऊं लागली आहे. एकदां पोटाचे एक्स रे काढवून पाहिलें पाहिजे."

"हं. मग काय ठरलें? कानडी भाषांतराचें काय करतां?"

"कोणीहि छापलें नाहीं तर आम्ही—मी व वडवी तरी जीवंत आहोंत? आम्ही तें छापूं. त्याची तुम्हांला काळजी नको."

"मोहनला विचारूं, तो देईल कीं पैसे! तो नाहीं म्हणणार नाहीं. उद्यां मला आठवण कर. मी वर्षाला केसरीकडे शंभर रुपये पाठवीत असतों. मोहनला ते पाठवावयास सांगितलें होतें. त्यानें काय केलें तें मला अद्यापि कळलेलें नाहीं. उद्यां त्याला विचारूं. दुसरी एक गोष्ट ध्यानांत ठेव. आपण ऑपरेशनसाठीं मुंबईस जाऊं. त्यावेळीं भागवतबंधूंना व न. र. फाटकांना भेटूं. त्यांच्या घरींच जाऊं या. काय रे, माझें पुस्तक त्यांच्या अंगावर तर येणार नाहीं?"

"तें अंगावर येईल असे फाटक किंवा भागवत यांना आज तरी वाटत नाहीं. एकदां सहज हें बोलणें मीच काढलें असतांना, त्यांच्यापैकीं श्री. पु. भागवत म्हणाले कीं, तें अंगावर आलें तरी, भागवत तसे कधीं तक्रार म्हणून उद्‌गार काढणार नाहींत."

## औषधें खाऊन कंटाळा आला

"आज तुमची प्रकृति बरी दिसते. मी आतां जेवावयास जाऊं का?"

"बस जरा. आतां बोलावतीलच. माझी प्रकृति तशी बरी नाहीं. त्रास होतो. औषधें खाऊन तर अगदीं कंटाळा आला आहे."

"तुमचा हा सर्व त्रास पाहून तर मला वाईट वाटतें. पण हें सर्व पाहून माझ्या पोटांत दुसरीच एक भीति वाटते. तुमच्याकडे पैशाची भरपूर अनुकूलता आहे, सेवा करणारीं इतकीं माणसें आहेत, सर्व कांहीं ठीक आहे. पण मी जर असा अंथरुणावर लोळत पडलों तर माझें कसें होईल? माझ्याकडे कोण पाहील? याची मला भीति वाटते."

"असें भिण्याचें कांहींच कारण नाहीं. घरचीं माणसें देखील सेवा करण्यास कंटाळतात, नाहीं असें नाहीं. झटपट सर्व काम आटोपलें तर ठीक, नाहींतर सतत पुष्कळ काळ एकसारखी सेवा होणें कठीण असतें. आई किंवा पत्नी मात्र सहसा कंटाळत नसतात. पण मला वाटतें कीं, तूं चालता फिरताच मरणार आहेस. तूं अंथरुणावर लोळत पडणारच नाहींस."

"एवढा आपला आशीर्वाद खरा झाला म्हणजे मिळविली. काय जें नशिबांत असेल तें होईल. काळजी करून तरी काय बदल त्यांत होणार आहे?"

"महादेवभाईंचा नारायण व नरहरभाईंचा मोहन हीं मुलें चांगलीं निघालीं. नाहीं का? ते दोघेहि चांगलें काम करतात. गेल्या वर्षीं तो मोहन येथें आला होता. एक दिवस येथें होता."

"तीं दोन्ही मुलें चांगलीं निघालीं. त्या दोघांत नारायण अधिक ध्येयवादी आहे आणि उत्तम प्रचारक आहे. त्यानें भूदानयज्ञावर उत्तम पुस्तकें लिहिलीं आहेत. माझ्याकडे तीं पुस्तकें आहेत. केव्हां तरी मी तुम्हांला त्यांतील कांहीं भाग वाचून दाखवीन."

## पुन्हा पहांटे ये...

"तुला सवड कोठें आहे? स्वस्थ हुदलीमध्यें कां बसत नाहींस? माझ्या डोळ्याचें ऑपरेशन झाल्यानंतर पुनः तुझ्याविषयीं विचार करूं. त्यावेळीं तुला काय वाचून दाखवावयाचें आहे तें मला वाचून दाखीव. आपल्या बाबुरावाचा मुलगा शरदहि चांगला निघाला. तो चांगल्यापैकीं लेखक आहे ना?'

"हो, शरदहि चांगला मुलगा आहे. माझें त्यांचें चांगलें जुळतें. मी त्यांच्याकडे केव्हां केव्हां जात असतों. आतां मी जेवावयास जाऊं काय? बोलावणें आलें आहे. जेवण करून पुन्हा येतो."

"जा, जेवावयास जा. आतां पहांटे पांच वाजतां पुन्हा ये."

मी निघून गेलों. जेवण करून पुन्हा आलों त्यावेळीं गंगाधरराव निद्रा घेत पहुडले होते.

परिशिष्ट नं ४

[ती. गंगाधरराव देशपांडे यांनीं आपले पणतू श्री. नारायण व्यंकटेश देशपांडे ऊर्फ नानासाहेब B. A. LL. B. यांना लिहिलेलें हें पत्र आहे. आपल्या देशाचे दोन तुकडे—भारत व पाकिस्तान—पडल्यानंतर त्यांच्या मनाची स्थिति काय झाली होती आणि आपल्या भारताला स्वातंत्र्य मिळाल्याच्या आनंदाबरोबरच, त्यांच्या मनांत अन्य कोणत्या ऊर्मी येत होत्या हें या पत्रांत व्यक्त झालें आहे. म्हणून हें पत्र मुद्दाम मिळवून या ठिकाणीं परिशिष्टरूपानें दिलें आहे......पुंडलीकजी.]

श्री

बेळगांव ता. २१-८-४७

चि. नानाला आशीर्वाद.

तुझें पत्र पोहोंचलें. खरोखरच स्वातंत्र्याचा सोहळा पहाण्याचा व त्यानिमित्त उत्सवांत भाग घेण्याचा योग मला लाभला ही परमेश्वराची कृपाच आहे. आतां पुढील कार्य तुमच्यासारख्या तरुणांचें आहे.

आमच्या देशाच्या प्रगतीच्या वाटेंत आमचें दास्य ही मोठी अडचण होती. त्या दास्यांतून मुक्त होण्याकरितां अनेक पुण्यपुरुषांनीं व स्त्रियांनीं प्रयत्न केले, व कांहींना तर प्राणार्पण करावें लागलें. या सर्वांच्या पुण्याईचा परिपाक ता. १५ ऑगस्ट हा दिवस आहे.

या आनंदाच्या प्रसंगीं आमच्या पवित्र देशाचे तुकडे झाले, त्यामुळें आमच्या आनंदांत दुःखाचें मिश्रण झालें आहे. या दुःखाचें परिमार्जन करून आपला देश पुन्हा अखंड करणें व त्यांतील जनता बलशाली व सुखी करणें हें यापुढील कार्य आहे. या कार्याचा भार तरुण पिढीनें उचलला पाहिजे; व त्याकरितां तुझ्यासारख्यानें आतांपासूनच तयारी करण्यास प्रारंभ केला पाहिजे. तुझ्यासारख्या तरुण व होतकरू विद्यार्थ्यानें प्रत्यक्ष राजकारणांत, पक्षोपपक्षांच्या भांडणांत न पडतां, देशाच्या स्थितीचें सूक्ष्म अवलोकन करावें व नवीन घडी कशी बसवितां येईल याचा अभ्यास व विचार करावा. समाजांतील उचनीच भावना—मग त्या आर्थिकदृष्ट्या उत्पन्न झालेल्या असोत किंवा जातीयतेच्या कल्पनांनीं आलेल्या असोत—घालवून, समतेचें साम्राज्य स्थापण्याचें महान् कार्य करावयाचें आहे. आपल्या देशांत निरनिराळ्या धर्मांचे,

पर्यांचे व वंशांचे लोक आहेत. त्या सर्वांना एकजीव करावयाचें आहे. हें कसें करावयाचें हा मुख्य प्रश्न आहे. हें साध्य होणें शक्य नसल्यास दुसरा आपल्यापुढें कोणता मार्ग आहे याचा विचार झाला पाहिजे. देशांत आज धर्माच्या नांवाखालीं, संस्कृतीच्या नांवाखालीं, पाकिस्तान अस्तित्वात आलें आहे. त्याची प्रतिक्रिया हिंदूंवर काय होईल याचा विचार झाला पाहिजे. अशा प्रकारचे अनेक प्रश्न आहेत. तुला हे कांहीं प्रश्न मी सुचविले आहेत इतकेंच.

तें कांहीं असलें तरी तरुणांनीं आपली शरीरप्रकृति चांगली ठेविली पाहिजे व आपल्या शीलाकडे लक्ष पुरविलें पाहिजे. पारतंत्र्यांत या दोन्हीहि क्षेत्रांत आम्ही मागें पडलों. तें पुन्हा मिळविलें पाहिजे.

तूं इतकेंच लिहीत आहें, तुला काय सुचतें तें मला लिहीत जा. म्हणजे मी तुला उत्तर लिहीत जाईन. चि. अच्युत वडवीचें पत्र पोहोंचलें. त्याच्या पत्रालाहि हेंच उत्तर आहे.

येथें ५-६ दिवसांपासून पावसानें हवा बिघडली आहे. मी पुन्हा उद्यांच अमळनेरला जाण्याकरिता निघणार आहें. चि. सौ. प्रमिला व मुलें तिकडेच आहेत. माझी प्रकृति बरी आहे. कळावें, हा आशीर्वाद.

गंगाधर देशपांडे

ता. क. :—चि. सौ. ठकुताईला आशीर्वाद. अमळनेरच्या पत्त्यावरच पत्र लिही. हुबळीला आचार्य भागवत आहेत. त्यांना भेट व निवडक पुस्तकांची यादी त्यांच्याकडून घे.

## परिशिष्ट नं. ५

[पत्र नं. ५० मध्यें ती. गंगाधररावांना आलेल्या गांधीजींच्या पत्राचा उल्लेख आलेला आहे. तेंच हें गांधीजींचें महत्त्वाचें पत्र होय. डॉ. डी. जी. तेंडोलकरकृत इंग्रजी 'गांधी–चरित्रामध्यें या पत्राच्या मूळ हस्ताक्षराचा ब्लॉक छापलेला आहे. भारताच्या सरहद्द भागांत गांधीजी दौऱ्यावर असतांना अबोटाबादहून हें पत्र ता. १० फेब्रुवारी १९३१ मध्यें लिहिलेलें आहे ....पुंडलीकजी.]

My dear Gangadharrao,

Your letters. Confusion is worse confounded. Motilalji's death has upset my apple cart. What cruel fate has in store for me, I do not know. One step enough for me. I am here till 15th perhaps. Everything uncertain here. If even a truce is declared restoration of property like yours is a certainty. Meanwhile it is well that we become homeless, landless and luckless. Under organised despotism lucklessness is luck, poverty a blessing, riches a curse, evil is enthroned, goodness nowhere, in one clause, all values are, transposed.

We have only felt from afar the heat of the fire one must pass through. Let us be ready for the plunge. That is my reading just now. And it fills me with joy. A halting peace will be dangerous. I can see no sign of real peace coming.

Abbotabad                                                  Yours
10-2-31                                                    BAPU

## सूचिपत्र

# पू. काकासाहेब कालेलकर यांचा 'अनुग्रहा'वरील अभिप्राय

•

टिळकयुगांत आणि गांधीयुगांत ज्यांची देशभक्ति सारखीच तळपली आणि एकाकाळीं जे महाराष्ट्रांत आणि कर्नाटकांत सारखेच लोकप्रिय होते असा देशभक्त गंगाधरराव देशपांडे यांची आत्मकथा थोड्याच दिवसापूर्वी मराठींत प्रकाशित झाली आहे. ही आत्मकथा प्रकाशित करावी किंवा न करावी या विषयीं मनाचा निर्णय होईना, म्हणून गंगाधररावांनीं दहापंधरा वर्षे ती तशीच ठेवून दिली होती. आयुष्याच्या अगदीं शेवटच्या दिवसांत मात्र, ती प्रकाशित झालेली पहावी अशी गंगाधररावांना उत्कंठा होती. पूज्य गंगाधररावांचे अंतेवासी श्री. पुंडलीकजी कातगडे यानीं हें काम मनावर घेऊन, रात्रीचा दिवस करून, जन्मकथा प्रकाशित केली. अखेरची इच्छा तृप्त झाल्यानंतर गंगाधरराव चार आठ दिवस देखील अधिक जगले नाहींत. त्यांची काठी मळकट म्हणून त्यानीं स्वराज्याची चळवळ अगदीं प्रारंभापासून पूर्णाहुतीपर्यंत पाहिली आणि त्यांत हिरिरीनें भाग घेतला. जुन्या प्रकारचे पिढीजाद जमीनदार असून हि त्यांनीं लोकशाहीचे नवे सिद्धांत पचविले होते. एवढेंच नव्हे पण नव्या पिढींतील, अगदीं कालच्या तरुणानां देखील आपुलकीनें आणि समानभावानें वागवून आपला स्वभाव नव्यायुगाला किती अनुकूल बनला आहे हें सिद्ध करून दिलें.

श्री. गंगाधररावांची आत्मकथा प्रसिद्ध होतांच, महाराष्ट्रानें ती गोडीने वाचली. आणि चरित्रसाहित्यांत त्या ग्रंथानें, आपल्या शैलीच्या प्रांजळपणानें उच्च स्थान मिळविलें.

एखाद्या थोर व्यक्तीला ओळखण्याची साहित्यिक साधनें तीन. त्यांची आत्मकथा, त्यांनीं लिहिलेलीं पत्रें, आणि जर लिहिली आणि संभाळून ठेविली असेल तर त्यांची वासरी (दैनंदिनी अथवा डायरी). गंगाधररावांनीं अनेक लोकांनां पुष्कळ पत्रें लिहिलीं असतील. पण त्यापैकीं श्री. पुंडलीकजी यानां लिहिलेलीं सगळीं पत्रें त्यानीं भक्तिभावानें सांभाळून ठेविलीं आहेत. एकंदर ४०० पत्रापैकीं जवळजवळ पावणेदोनशेंहून अधिक पत्रें 'अनुग्रह' या नांवाखालीं त्यानीं नुकतीच प्रकाशित केलीं आहेत. आत्मकथा हल्लींहल्लींच वाचली असल्यामुळें, 'अनुग्रह' हा संग्रह मी मोठ्या गोडीनें वाचला. ही गोडी साहित्यिक नसून, गेल्या पिढीतील एका थोर देशभक्ताच्या जीवनाच्या अंतरंगावर प्रकाश पाडणारा दस्तऐवज म्हणून होती.

आपल्या देशांत ज्याप्रमाणें व्यवस्थित इतिहासग्रंथ थोडे, त्याचप्रमाणें ज्याला संतोषप्रद चरित्र म्हणतां येईल असे ग्रंथही विरळा. पत्रसाहित्याची तर आपल्याकडे अपेक्षादेखील नाहीं. पश्चिमेकडे या प्रकारच्या साहित्याला चांगलेंच प्रोत्साहन मिळालेलें

आहे, तें इतकें कीं कित्येक लोक आपल्या साहित्यलेखनालाच—विशेष गोडी यावी म्हणून—पत्राचें रूप देत असतात.

पण असें कृत्रिम पत्रसाहित्य वेगळें; आणि हें छापलें जाईल किंवा चार स्नेही वाचतील अशी कल्पना देखील नसून केवळ विचारविनिमयासाठीं आणि माहिती कळविण्यासाठीं लिहिलेलें खरेंखुरे पत्रसाहित्य निराळें. 'अनुग्रह' हा संग्रह या दुसऱ्या प्रकारचा आहे.

प्रेरणा मिळविण्यासाठीं अंतेवासी होऊन राहिलेल्या पुंडलीकांना लिहिलेलीं प्रारंभींचीं पत्रें कांहीशीं निराळीं आहेत. देशभक्तीसाठीं तुरुंगवास घडण्याची पाळी आली त्यावेळचें मनोमंथन व्यक्त करणारीं पत्रें निराळीं, आणि गंगाधररावांच्या व्यक्तीगत आणि कौटुंबिक जीवनाशीं समरस झालेल्या पुंडलीकानां लिहिलेलीं आणि मनोवृत्तीचे हेलकावे व्यक्त करणारीं प्रेमळ पत्रें निराळी. या सर्व प्रकारामध्यें आपुलकी, उदारता आणि प्रांजळपणा हे गुण थबथबलेले दिसतात. आणि हेंच या पत्रांविषयींचें मुख्य आकर्षण होय.

अशा पत्रांचें संपादन करणें हें सोपें काम नव्हे. ज्या गोष्टी केवळ घरगुती किंवा खाजगी असतील त्या प्रकाशित करण्यांत अनौचित्य असते, केव्हां केव्हां पैशून्यही पदरीं पडावयाचें. आणि पत्र लिहिणाऱ्या आणि पत्र मिळविणाऱ्या उभयतांचें व्यक्तित्व प्रगट होणारा भाग जर पत्रांतून आला नाहीं तर प्रकाशनांत कांहीं अर्थच उरावयाचा नाहीं. या दुहेरी पेचांतून रस्ता काढण्याला उच्च कोटीची आर्यता, मानवनिष्ठा आणि अभिजात अभिरुचि असावी लागते.

स्वतःची पत्रें स्वतः संपादून देण्याची पाळी आली तरी तें काम सोपें होत नाहीं. मी स्वतः पुष्कळ पत्रें लिहिलीं आहेत, हल्ली हल्ली लेखांपेक्षां पत्रेंच अधिक लिहितो. हीं पत्रें छापलीं जातील अशी कल्पना किंवा अपेक्षा लिहितांना मुळीच नसते, आणि म्हणूनच पत्रांतील स्वाभाविकता टिकूं शकते. अशा पत्रांचा संग्रह आपल्या समोर आला म्हणजे आश्चर्य आणि कौतुक वाटतें. तीं छापण्याची परवानगी देतांना संकोच वाटतोच. पण खरी मुष्केली उत्पन्न होते संपादन करतांना. कित्येक गोष्टी पत्र लिहिणाऱ्याला आणि मिळविणाऱ्याला महत्त्वाच्या वाटतात. ज्यांना संदर्भ ठाऊक आहे त्यांना देखील त्या महत्त्वाच्या वाटाव्या. पण सामान्य वाचकांना किंवा पुढच्या पिढीच्या समाजाला त्यांचें महत्त्व काय असणार ! इतिहास संशोधकाच्या दृष्टीनें सगळ्याच गोष्टींना महत्त्व असतें. दस्तऐवज जितका जुना तितकें त्याचें ऐतिहासिक महत्त्व अधिक. अनेक तऱ्हेनें त्याचें दोहन ही होऊं शकतें. पण पत्रसंग्रह वर्तमान काळच्या वाचकांसाठीं प्रकाशित करतांना संशोधकी वृत्ती बाळगून चालायचें नाहीं. पत्रांत जीवनरस किती आहे, वाचकाला तो कोठें आणि कसा मिळेल, एवढ्याचाच विचार करून पत्रांचें संपादन करणें योग्य होईल. आणि जो भाग आपण प्रकाशित करतो, त्याच्यावर, जीवनाचा प्रकाश पाडण्यासाठीं आवश्यक संदर्भ देणें ही जरूरीचें असतें. आणि येथेंच संपादकाची खरी कसोटी होते.

मी आतापर्यंत माझ्या पत्रांचे तीन संग्रह प्रकाशित होऊं दिले. माझ्या कल्पनेप्रमाणें माझें संपादन यथायोग्य होतें. पण त्यानंतर मी इंग्रजी, मराठी, हिंदी आणि गुजराती असें विविध पत्रसाहित्य अवलोकिलें, आणि आतां वाटतें कीं, संपादनाची माझी दृष्टी बरीच कची होती. वाचक-समाजावर ओझें होणार नाहीं, साहित्यक्षेत्रांत निष्कारण गर्दी होणार नाहीं आणि पत्रांशीं संबंध असलेल्या व्यक्तींचा परिचय यथार्थ होईल.—हे तीन हेतू साधण्याला उच अभिरुचि आणि अनुभवी दृष्टीच असावी लागते.

प्रस्तुत संग्रहांत पत्रांच्या प्रारंभीं संदर्भ देण्याचा प्रयत्न झाला आहे. पण तो बराच अपुरा वाटतो. निदान ज्या व्यक्तींचीं नांवें पत्रांत आलीं आहेत त्यांचा परिचय आणि संबंध एक-दोन एक-दोन वाक्यांत द्यायला हवा होता. अशा सोयीच्या अभावीं कित्येक पत्रें सामान्य वाचकाला नीरस वाटण्याचा संभव आहे.

माझी गोष्ट मात्र निराळी. माझ्या जीवनांत गंगाधररावांचें स्थान विशेष होतें; व त्यामुळें प्रस्तावना लेखक रावसाहेब पटवर्धनां प्रमाणेंच गंगाधररावांविषयीं अगदीं वडिला सारखा आदर माझ्या मनांत वसत असे.

माझें उच शिक्षण संपलें आणि त्याचवेळीं माझ्या डोक्यावरील माझ्या वडिलांचें शिरछत्र बाजूला झालें. एका बाजूनें आपण पोरके झालों असें वाटत होतें; दुसऱ्या बाजूनें जबाबदारपणें समाजसेवा करण्याचें आणि पारतंत्र्याविरुद्ध लढण्याचें कर्तव्य जाणवूं लागलें होतें. अशा परिस्थितींत आमच्या प्रदेशाचे पुढारी म्हणून मीं गंगाधररावांचा परिचय साधला. आणि अशा ऐनवेळी त्यांचेकडून मला अनपेक्षित पण आवश्यक असें वात्सल्य मिळालें आणि प्रोत्साहनहि मिळालें.

पुढें त्यांच्या प्रोत्साहनानें मी बडोद्याला पू. केशवराव देशपांडे यांच्याकडे गेलों. त्यांच्या देखरेखीखालीं सेवेचीं आणि साधनेचीं तीन चार वर्षें घालविण्याची संधी मिळाली. आणि त्यानीं मला कर्मवीर महात्मा गांधीकडे पोहोंचविलें. गंगाधरराव, केशवराव, आणि बापूजी—यांचें शिरछत्र क्रमशः मिळाल्यामुळें माझें जीवन धन्य झालें.

अशा या पवित्र संबंधामुळें गंगाधररावांची आत्मकथा आणि त्यांचा हा 'अनुग्रह' मीं भक्तिभावानें वाचला. आता शेवटचीं बारा वर्षें त्यानीं लिहून ठेविलेली त्यांची वासरी वाचायला केव्हां मिळेल अशी उत्कंठा उत्पन्न झाली आहे.

श्री. पुंडलीकजीनीं गुरुसेवा, गुरूंच्या कुटुंबीयांची आणि स्नेही सोबत्यांची सेवा, स्वराज्य सेवा, देशसेवा, साहित्य आणि संस्कृतीसेवा—यांच्यामध्यें अभेद साधला आहे. यामुळें त्यांच्या कोणत्या सेवेला महत्व अधिक द्यावें हें ठरविणें कठीण आहे. तरीही भावी पिढी त्यांना गंगाधररावांचे अंतेवासी आणि त्यांच्या विविध साहित्याचे संपादक म्हणूनच विशेषेकरून ओळखील यांत शंका नाहीं

गंगाधररावांची वासरी प्रकाशित करण्याचें काम पुंडलीकजीनीं आतां दिरंगाईवर टाकूं नये. तें काम हातावेगळें झाल्यानंतर गंगाधररावांचें एक श्रयोपदीर चरित्र लिहून त्यानीं कर्नाटक-महाराष्ट्र आणि अखिल भारत याचा स्वराज्याचा इतिहास त्यांत

गोवला पाहिजे. गंगाधररावांचें साहित्य जगापुढें स्वतंत्रपणें असेलच, पण त्याचा मुबलक उपयोग करून आणि गंगाधररावांना केंद्रांत बसवून, स्वतःला ठाऊक असलेला स्वराज्याचा इतिहास त्यांनीं स्वतंत्रपणें दिला पाहिजे. कारण त्यांत त्यांनीं स्वतः यथाशक्ति आजन्म भाग घेतला आहे. गंगाधररावानां ज्यांच्या संबंधानें पूज्यभाव होता अशा लोकमान्य आणि महात्माजी यांच्या निकट परिचयांत येण्याचें भाग्य ही पुंडलीकजींनां लाभलेलें आहे. श्री. पुंडलीकजी साहित्यसेवेचें महत्व जाणतात. तेव्हां त्यांनीं आपलें हें जीवनकार्य एकाग्रपणें पुरें केलें पाहिजे.

'अनुग्रहा' सारख्या बहुमोल संग्रहाला श्री. रावसाहेब पटवर्धनांनीं सुंदर आणि प्रेमळ प्रस्तावना लिहून सगळा संग्रह अधिकच रोचक बनविला आहे. रावसाहेबांच्या प्रस्तावनेंत माझ्या सारख्या अनेक व्यक्तींच्या हृदयांतील भाव व्यक्त झाले आहेत. म्हणून त्यानां ही धन्यवाद द्यावेसे वाटतात.

'मंगलप्रभात' हिंदी पाक्षिकावरून